# मायबोलीचा विश्वसेतू

भाग १

संपादक :

**दिवाकर कारखानीस**

सह संपादक :

**सौ. मोनाली फाटक** - पेन्सिलव्हेनिया

**प्रमोद तेंडुलकर** - कॅलिफोर्निया

अमोल पब्लिशिंग हाऊस, पुणे.

## मायबोलीचा विश्वसेतू
**भाग १**

: प्रकाशक :
**अमोल भुतडा**
**अमोल पब्लिशिंग हाऊस,**
२०/१, शिवशक्ती बिल्डींग, पुण्याई नगर,
धनकवाडी, पुणे- ४११ ०४३. दूरध्वनी : ९८२२० ५७२६३ (M)
e-mail: amolpublishinghouse@rediffmail.com

ISBN 978-81-920124-4-5

प्रथमावृत्ती : जानेवारी २२, २०११



: मुद्रक :
**श्री. बालाजी एन्टरप्रायजेस,**
तलाठी कार्यालयासमोर, धायरी फाटा, वडगांव, बु., पुणे.

: अक्षर जुळणी :
**सौ. रेवती कनगुटकर, सौ. स्नेहा नेवाळकर**

: मुखपुष्ठ :
**सौ. रेशम पुत्रन /भिसे,** नोयडा - दिल्ली

किंमत : २२५/- रुपये

: ई वितरण :
ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटरनिटी, ठाणे ४०० ६०४, महाराष्ट्र.
मोबाईल: +९१ ९८६९६७४८२०
ईमेल: esahity@gmail.com

: ई-पुस्तक जुळणी :
**सुरेश शिरोडकर,** मुंबई (ई साहित्य प्रतिष्ठान)

मातृभूमीचा किनारा कित्येक वर्षापूर्वी सोडूनही
मायबोलीवर नितांत श्रद्धा ठेवणारे
आणि प्रेम करणारे..
मराठी साहित्याला समृद्ध करण्यासाठी
सदैव प्रयत्नशील असणाऱ्या आमच्या
अमेरिकेतील आणि कॅनडातील
साहित्यिक मित्र, मैत्रिणींना..
"**मायबोलीचा विश्वसेतू**"
सविनय अर्पण.

विनित,
दिवाकर कारखानीस
सौ. मोनाली फाटक
प्रमोद तेंडुलकर

## अनुक्रमणिका

# ऋणानुबंध

हिवाळ्याच्या ऐन मोसमांत आणि जीवघेण्या कडाक्याच्या थंडीत, २३ डिसेंबर १९६९च्या मध्यरात्रीला लंडनहून आम्ही न्यूयॉर्कच्या केनडी विमानतळावर पोहोचलो. ढगाळलेले आकाश आणि मिट्ट काळोखी रात्र. एअरपोर्टच्या गडबडींतून बाहेर आलो आणि सारं जग गाढ निद्रेच्या कुशीत झोपलेलं होतं. गेल्या बेचाळीस वर्षांपासून अमेरिका ही माझी कर्मभूमी ठरली.

भ्रमंती बरीच झाली होती. देश विदेश पाहायला मिळाले होते. बराच अनुभव गांठी बांधला गेला होता. तरी सुद्धां डोळ्यासमोर अनेक अनुत्तरीत प्रश्नचिन्हे होती आणि आयुष्याचा बराच मोठा प्रवास व्हायचा होता. अनेक प्रवासी भेटायचे होते.. अनेक ओळखी व्हायच्या होत्या.. अनेक ऋणानुबंध प्रस्थापित व्हायचे होते. आयुष्याच्या मध्यरेषेवर मी उभा होतो. काळाचा कांटा पुढेपुढे सरकत होता. मला अनेक कामे उरकायची होती. अनेक प्रश्न सोडवायचे होते. नियतीचा वेग थांबत नसला तरी निराश होऊन चालणारे नव्हते. आयुष्यांतून पळ काढण्यासाठी मी जन्मलो नव्हतो.

माझ्या जन्मभूमीपासून जरी मी दूर गेलो असलो तरी माझी नाळ तुटलेली नव्हती.. माझ्या मातीची ओढ कायम होती. जसे जन्मदात्रीला माणूस विसरूं शकत नाही, तसेच मातृभूमीही विसरली जात नाही. अमेरिकेतसुद्धा अनेक देशांतील निरनिराळ्या वंशाच्या, धर्माच्या आणि पौर्वात्य पाश्चिमात्य मिश्र संस्कृतीच्या लोकांचा भरणा असूनसुद्धां मातृभूमीची आंस नसलेला माणूस मिळणं कठीण आहे.

माझ्या सारखी अशी बरीच मराठी मंडळी १९७०च्या आसपास अमेरिकेत येऊन स्थायिक होण्याच्या इच्छेने नोकरी धंदा शोधीत होते. उच्च शिक्षणाच्या शिदोरी बरोबर महत्त्वाकांक्षा आणि जिद्द घेऊन ही पिढी येथे आली होती. इंजिनियरींग, स्थापत्यशास्त्र, वैद्यकीयशास्त्र, कायदेशास्त्र, गणितशास्त्र अशा अनेकविध क्षेत्रांत ही पहिली पिढी पाय रोवून बसत होती.

याच गर्दीमध्ये मराठी भाषेची, साहित्याची जाण असलेली आणि ओलावा ठेऊन असलेली काही तरूण मंडळी होती. त्यांना नुसती मराठी भाषा जपायची नव्हती तर ती पुढच्या पिढीसाठी रूजवायची होती. दुवा सांधायचा होता मैत्रीचा.. आपुलकीचा.. जिव्हाळ्याचा. याच गरजेतून निर्माण झाली गावोगाव मराठी मंडळे आणि मासिके. न्यूयॉर्क, शिकागो, टोरांटो या शहरी हस्तलिखिते निर्माण झाली. एकता, रंगदीप, स्पंदन, स्नेह, रूचिरा, अभिरूची, सावली इत्यादी मराठी माध्यमांतून दर्जेदार लिखाण वाचायला मिळू लागले. टोरांटोचे श्री. विनायक गोखले, कॅलिफोर्नियाचे श्रीनिवास माटे, संध्या कर्णिक, डॉ. ललिता गंडभीर, डॉ. प्रकाश लोथे, जयश्री हुपरीकर, डॉ.विजय ढवळे, डॉ. विजया बापट, विजय पाठारे यांनी

मराठीची ज्योत प्रज्वलित ठेवली. गेली चाळीस वर्षे मराठी भाषा जिवंत ठेवण्यासाठी या लेखकांनी केलेले योगदान नुसते अपूर्वच नाही तर ते ऐतिहासिक महत्त्वाचे आहे. कदाचित् भविष्यांत कालौघामध्ये ही नांवे विस्मरणांतही जातील. असं होऊ नये म्हणून या काळांतील काही लेखकांच्या परिचयाचा हा सायास केला आहे.

दुसरा एक उद्देश या ग्रंथामागे आहे. तो म्हणजे या नंतरच्या येणाऱ्या पिढ्यांत मराठी भाषेची किती जाण असेल ते सांगता येणार नाही. पण काही जिज्ञासू नातवंडांनी जर ही आधीच्या पिढीची ग्रंथसंपदा पाहिली अगर वाचली तर कदाचित् आपल्या आजोबा आजीने, त्यांच्या कालांत जी सुख दु:खे भोगली, जे कष्ट उपसले, निराशेच्या अंध:कारांतून जो मार्ग काढला आणि आयुष्याच्या प्रत्येक वळणावर कसे निर्णय घेतले याची थोडीफार कल्पना येऊ शकेल असा विश्वास आम्हाला वाटतो.

या पुस्तकाच्या निर्मितीमध्ये फार मोठा वाटा उचलला तो माझ्या सहसंपादकांनी. सौ. मोनाली फाटक आणि श्री. प्रमोद तेंडुलकर यांच्या बहुमोल सहकार्याबद्दल मी त्यांचा मनापासून आभारी आहे.  तसेच पुस्तकाच्या मध्यवर्ती कल्पनेवरून (Theme) प्रथम अरिझोनाचे श्री. आनंद दांडेकर यांनी चित्र तयार केले. त्या चित्रावरील विशिष्ट रंगसंगती साधण्याची आणि प्रभावी प्रक्रिया करून ते चित्र आकर्षीत करण्याचे श्रेय मुंबईच्या सौ. रेशम भिसे-पुत्रन यांचे आहे. या दोघांचा मी मनोमन आभारी आहे.

या पुस्तकाची अप्रतिम अक्षर जुळणी (DTP) करणाऱ्या ठाण्याच्या सौ. रेवती कनगुटकर आणि सौ. स्नेहा नेवाळकर, 'अमोल पब्लिशिंग हाऊस' चे जाणकार संचालक श्री. अमोल भुतडा यांनी हे पुस्तक प्रकाशित केलं, पुण्याच्या जाणकार लेखिका सौ. सुनिता नागपूरकरांनी वेळोवेळी लिखाणावर चर्चा करून सहाय्य केलं.  या सर्व सहृदांचा मी अत्यंत आभारी आहे.

आमचे अमेरिकेंतील आणि कॅनडांतील लेखक आणि लेखिकांनो..  तुमच्या बहुमोल सहाय्यामुळेच हा संकल्प आम्ही पुरा करू शकलो.  कृतज्ञता व्यक्त करायला शब्द अपुरे पडतात. तुमची मराठी लिखाणाची कळकळ मी प्रत्येक कथेत - लेखांत अनुभवली आहे. तुमच्या दुर्दम्य उत्साहाला आणि कष्टाला तोड नाही.  मी इतकेच म्हणू शकेन.. तो दिवा मालवू नका.. असाच प्रकाश फैलावीत जा..आशेचा..उत्साहाचा आणि ज्ञानाचा !

शेवटी श्री. कुमार केतकर यांनी, दैनिकाच्या आणि देशा-परदेशांच्या प्रवासांची व्यस्तता असतानासुद्धां शब्द दिल्याप्रमाणे, वेळांत वेळ काढून या पुस्तकासाठी प्रस्तावना लिहिली या बद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

दिवाकर कारखानीस
संपादक

# प्रस्तावना

हाहा म्हणता गेली ४०–५० वर्षे निघून गेली आहेत. जे ऐन उमेदीतले तरुण १९६० ते १९७० च्या दशकात अमेरिकेला वा कॅनडाला गेले, ते आता आजी–आजोबा झाले आहेत ! आनंदाची गोष्ट ही, की त्यांचे वय वाढले असेल, पण त्यांची उमेद तशीच टिकून आहे. काहींची दुसरी वा तिसरी पिढी अमेरिका–कॅनडातच जन्माला आली आहे. साठ–सत्तरीच्या आसपास जे नव्या आयुष्याच्या, नव्या जीवनाच्या, वेगळ्या दिशेच्या वा साहसाच्या शोधात बोटीत वा विमानात चढले, त्यांना अर्थातच माहीत नव्हते, की त्यांचे भविष्य कसा आकार घेणार आहे. त्या वेळेस 'एनआरआय' किंवा अनिवासी भारतीय ही संज्ञा रुढ झाली नव्हती. ते सर्व भारतीयच होते आणि त्यांचे ऐहिक निवास कुठेही झाले तरी त्यांची ओढ, जो किनारा सोडला त्याच्याकडेच होती. नव्या क्षितिजाच्या शोधातले हे प्रवासी त्यांचे प्रयाणस्थान विसरले नव्हते. लहानपणी मी 'धडपडणारी मुले' हे सानेगुरुजींचे पुस्तक वाचले होते. त्यांची 'धडपड' स्वातंत्र्यपूर्वकाळातली, स्वातंत्र्यासाठीची होती. स्वातंत्र्यानंतर देश बदलला. जग बदलले. लोकांच्या अपेक्षा आणि आकांक्षा बदलल्या. स्वातंत्र्याच्या अलीकडे– पलीकडे जन्माला आलेली पिढी साठी–सत्तरीच्या दशकात तारुण्यात आली होती, प्रौढ होत होती. ते दशकही सर्वंकष उलथापालथींचे होते. भारतातील नवसुशिक्षितांना– इंजिनिअर्स, डॉक्टर्स, आर्किटेक्ट्स–अवघे जग खुणावत होते– विशेषत: अमेरिका! प्रत्यक्षात अमेरिकेतही प्रचंड अस्वस्थता आणि अस्थिरता होती; पण भारतातील या जागतिक 'वारकऱ्यांना' त्यापलीकडच्या अमेरिकेचे आकर्षण होते. परंतु या स्वातंत्र्योत्तर वयात आलेल्या तरुणांना अमेरिकेचे आकर्षण होते, ते निदान काही प्रमाणात त्यांच्या जीवनात आलेली कोंडी तिकडे जाऊन फुटू शकेल या दुर्दम्य आशेमुळे. नाहीतर, ही सर्व मराठी तरुण मंडळी– बहुतेकशी पुण्या–मुंबईची–तशी कनिष्ठ मध्यमवर्गात आणि सवर्ण ब्राह्मणी वातावरणात वाढलेली. कित्येकांचा तो पहिलाच परदेश प्रवास. विमानाची सुद्धा नवलाई. कौटुंबिक सुरक्षिततेच्या सीमा ओलांडताना आणि तिकडे पोहोचल्यानंतर जीवाची घालमेल झाली नसती तरच नवल. काहींना तर लगेचच किंवा लवकरच परत जावे, असेही वाटत होते; परंतु त्या स्नेहाच्या 'पिंजऱ्या'तून आपण येथे इतक्या दूरवर आलो आहोत, तर इथेच आपले जीवन, स्वत:च्या हिमतीवर उभे करण्याचा निर्धारच बहुतेकांनी केला. तो निर्धार सोपा नव्हता.

भारतात फोन करणेही दुरापास्त होते. आजच्यासारखे मोबाईल फोन्स, ई-मेल्स, इंटरनेट वगैरे प्रकार अक्षरश: स्वप्नांतही नव्हते. आठवड्यातून वा महिन्यातून, विशिष्ट वेळेला, विशिष्ट दिवशी घरी फोन करायचा, दाटलेल्या गळ्यांनी आई-वडिलांशी बोलायचे, इकडे सगळे ठीक आहे, काहीही काळजीचे कारण नाही, असे सांगायचे आणि आई-वडिलांनीही घरी सर्व व्यवस्थित आहे, असे सांगून एकमेकांना आधार द्यायचा; इतपतच संपर्क ! प्रत्यक्षात आपल्या 'अनिवासी भारतीया'ला अनेक अडचणी असायच्या, डॉलर्स पुरायचे नाहीत, एखाद्या वेळेस नोकरीही जायची, बर्फाची थंडी झेपायची नाही, जेवणा-खाण्याचे हाल व्हायचे, फारसे मित्रवर्तुळ नसल्याने एकटेपणा वाटायचा, मनात काहूर माजायचे.

खरे म्हणजे 'घरी' पण सगळे काही सामसूम नसायचे. आईला दम्याचा ॲटॅक आलेला असायचा, जवळची मामी, मावशी व मामा सिरियस असायचे, चाळीतले वा सोसायटीतले अगदी घरातल्यासारखे कुणीतरी गेलेले असायचे; पण त्याचबरोबर अनेक चांगल्या बातम्याही असायच्या; पण फोनवर शक्यतो वाईट बातम्या टाळण्याकडे कल असे. सुरुवाती-सुरुवातीस अमेरिकेतील नवे अनुभव, गमती-जमती, नव्या ओळखी अशा अनेक गोष्टी अगदी सविस्तरपणे पत्र लिहून कळविल्या जात. पुढे पुढे पत्रांचा ओघ कमी होत असे आणि 'घरी' पत्राची वाट पाहून जीव कासावीस होत असे. शिवाय त्या काळी आई-वडिलांनी अमेरिकेला जाण्याची प्रथा सुरु झालेली नव्हती. त्यामुळेही त्यावेळी गेलेली पिढी बऱ्याच अंशी स्वावलंबी झाली. ज्यांना गॅसही पेटवायचा माहीत नव्हता ते चक्क स्वयंपाक करायला शिकले. ज्यांना फार तर सायकल येत होती ते कार (विकत घेऊन !) चालवू लागले. मुंबई-पुण्यातले घर लहान होते. अमेरिकेत मोठे अपार्टमेंट आणि बंगलेही त्यांच्या जीवनात आले. भातुकलीसदृश संसारातून खरे-खुरे संसार उभे राहिले. लग्न झाल्यावर पुण्या-मुंबईहून आलेली बायको, सुरुवातीला अमेरिकन जीवनशैलीला, त्या प्रकारच्या ऐहिकतेला बावरली, दचकली, हबकली; पण हळूहळू ती पण रुळली, कार चालवू लागली, कधी कधी चक्क वाईनही घेऊ लागली ! अमेरिका अशी मनात आणि जीवनात घुसत होती; पण सांस्कृतिक संस्कार पुसला जात नव्हता-ते निदान या पिढीला शक्य नव्हते त्यामुळे पु.ल.देशपांडे आणि गजानन वाटवे, सुधीर फडके, अरुण दाते आणि काहींच्या बरोबर विजय तेंडुलकर, मर्ढेकर आणि सत्यकथाही मानसिक सहवासासाठी असत. किंबहुना असेही म्हणता येईल, की पु.लं. चा, सुधीर फडकेंचा, तेंडुलकरांचा, भावगीत-नाट्यसंगीताचा, मराठी नाटकांचा भावनिक सहवास होता म्हणूनच पूर्णपणे

अनोळखी अमेरिकेत त्यांचे जीवन सुसह्य झाले, निभावून गेले आणि एक प्रकारचा सांस्कृतिक सेतू बांधू शकले. (अर्थातच तसा तो सेतू 'वन वे' होता. कारण तिकडे महाराष्ट्रात अमेरिकन लेखक - कवी - गायक त्या सेतूवरुन गेले नाहीत. पुढे सीडी- डी.व्ही.डी.- नेट-आयपॉड इत्यादी माध्यमातून अमेरिकन संगीत देशात - महाराष्ट्रात पोहोचले.) या रसिक मंडळींच्या नातवंडांच्या- पतवंडांच्या (होणाऱ्या) आवडीनिवडी मात्र अपरिहार्यपणे वेगळ्या असणार आहेत. माणिक वर्मांच्या गाण्यांनी, आवाजाने या नव्या अमेरिकन पिढीला गहिवरुन येत नाही, येणार नाही. 'बटाट्याची चाळ' वा 'असा मी असा मी' ची कॅसेट/सी.डी. ऐकून त्यांना हसू येणार नाही. पु.लं.च्या काळातच चाळजीवन कसे लयाला जात होते याचा (खेद !) त्यांच्याच निवेदनात येतो. मग तो या अमेरिकन पिढीला समजला नाही तर त्यांचा काय दोष ?

पण मराठी संस्कृती अमेरिकेत निष्ठेने रुजविलेल्या या सर्वांची जिद्द, ती भाषा, ती संस्कृती, ती जीवनशैली, ते भावबंध आणि तो सांस्कृतिक वारसा जपण्याची होती - आजही आहे. म्हणूनच तेव्हां त्या भूमीत गेलेल्या मराठी माणसांनी शोधून-शोधून इतर समविचारी - समप्रवृत्तींची माणसे शोधून काढली, त्यांची मंडळे स्थापन केली, त्यांची नियतकालिके सुरु केली ! ही नियतकालिके म्हणजे आजच्या परिभाषेत त्या काळचे 'फेसबुक' होते. अगदी प्राथमिक अवस्थेतले. इतके प्राथमिक, की सुरुवातीला तर हे उत्साही नवसाहित्यिक त्यांचे हे 'फेसबुक' हस्तलिखित स्वरुपात काढत असत. त्यानंतर आत्मविश्वास वाढू लागल्यावर ही मराठी सोनेरी टोळी, (चांगल्या अर्थाने !) छापील नियतकालिक प्रसिद्ध करण्याचा विचार करु लागली. मराठी भाषेवर, साहित्यावर, कला- लोककलेवर मन:पूर्वक प्रेम करणारी ही 'टोळी' आता त्यांचे जाळे अवघ्या अमेरिका-कॅनडात, युरोपात आणि जमले तर तमाम अनिवासी भारतीयांच्या मनावर पसरवू इच्छित होती. ही सर्व मंडळी, उच्चशिक्षण विद्याविभूषित आणि साहित्य- कलांमध्ये रस व अभ्यास असलेली होती. कोणी डॉक्टर तर कोणी वैज्ञानिक, कुणी इंजिनिअर तर कोणी कायदेतज्ज्ञ, कुणी संगिताचा जाणकार तर कुणी स्थापत्यशास्त्रज्ञ. अमेरिकेत गेल्यानंतर पहिल्या दशकातच हे सर्व लोक आपापल्या क्षेत्रात प्रतिष्ठा पाहू लागले. प्रतिष्ठेबरोबर आणि पदांबरोबर त्यांची आर्थिक स्थितीही हळूहळू 'उच्चस्तरीय' होत होती. संसारही स्थिरस्थावर होत होते; पण या नवसुबत्तेमुळे यापैकी कुणाच्यांतही औद्धत्य आले नाही, कुणीही सुखासीन झाले नाही. वा कुणालाही मानसिक मांद्य आले नाही. उलट स्वत:च्या खिशाला, अनेक

वेळा कौटुंबिक जबाबदाऱ्यांना आणि कधीकधी करियरलाही चार हात दूर ठेवून या सर्वांनी 'मराठी' ची सेवा करण्याचे ठरविले. त्यातूनच जे साहित्यिक आविष्कार प्रगट झाले त्यात एकता, रंगदीप, स्पंदन, स्नेह, रुचिरा, अभिरुची, सावली अशी नियतकालिके होती 'अलीबाबाची गुहा', 'सुंदरा मनामध्ये भरली' असे अप्रतिम रंगमंचीय प्रयोगही होते. त्यांच्या वार्षिक स्नेहसंमेलनांमध्ये वा द्विवार्षिक मेळाव्यांमध्ये किंवा त्रैमासिक मैफलींमध्ये (आणि अर्थातच अनेक वेळा होणाऱ्या सहली, गप्पाष्टकांमध्ये) कित्येक कल्पना सुचविल्या जात आणि काही काळानंतर सादरही होत असत. विशेष म्हणजे ही सर्व मराठीप्रेमी माणसे अमेरिकन- युरोपियन साहित्यातही रुचि बाळगत. (काहीजण तर अमेरिकन फुटबॉलमध्येही तज्ज्ञ झाले होते !) आणि न्यूयॉर्कमधल्या ऑपेरा वा नाट्यप्रयोगांमध्ये रस घेत असत. स्वाभाविकच त्यांच्या मराठी बाण्याला अमेरिकन झालर मिळू लागली. तो त्या अर्थाने एक वेगळाच सांस्कृतिक संगम म्हणावा लागेल.

या ग्रंथातील जवळजवळ बहुतेक साहित्यकर्मींना मी प्रत्यक्ष - अप्रत्यक्ष ओळखतो. गेली सुमारे २०-२२ वर्षे मी अमरिकेला विविध निमित्ताने, सातत्याने जात आहे. कधी पत्रकार म्हणून, कधी काही अमेरिकन विद्यापीठांमध्ये 'व्हिजिटींग लेक्चरर' म्हणून तर कधी कुठच्या मराठी मंडळांच्या (वा 'महाराष्ट्र फाऊंडेशन'च्या) सभा-संमेलनांमध्ये मुख्य पाहुणा म्हणून- वा व्याख्याता म्हणून, त्या सर्व अमेरिकाभेटींमध्ये यापैकी कुणाच्या ना कुणाच्या भेटी होत. त्यांच्यामधील सर्जनशीलता, ऊर्जा, उत्साह आणि कार्यक्रमांमधील चैतन्याची सळसळ पाहून मला नेहमीच कौतुकमिश्रीत आश्चर्य वाटत असे. अनेक 'माहेर' च्या आप्त - मित्रांपासून इतके दूर येऊन, पहिली काही वर्षे अतिशय कष्टाचे, जिकीरीचे आणि हलाखीचेही दिवस काढून त्याचा व्रणही त्यांच्या मनावर दिसत नसे. त्यांचे भाषाप्रेम आणि साहित्यप्रेम पाहून मला, त्यांच्या माहेरी म्हणजे महाराष्ट्रातच, मराठी भाषेची होणारी अवहेलना अस्वस्थ करीत असे. त्यांच्या हाताशी आजच्यासारखे तंत्रज्ञान नव्हते - आणि आता ते हाती आल्यावर त्यांनी मराठी भाषेचे 'स्फुटनिक' च उडवायला सुरुवात केली आहे. दिवाकर कारखानीसांनी त्यांच्या 'ऋणानुबंध' मध्ये म्हटले आहे, की ''पुढच्या पिढ्यांमध्ये मराठी भाषेची किती जाण असेल ते सांगता येणार नाही. पण आमच्या काही अमेरिकेत जन्माला आलेल्या नातवंडांनी जर आधीच्या पिढीची ग्रंथसंपदा पाहिली अगर वाचली तर कदाचित आपल्या आजोबा-आजीने, त्यांच्या काळात जी सुख-दु:खे भोगली, जे कष्ट उपसले, निराशेच्या अंधकारातून जो मार्ग काढला आणि आयुष्याच्या प्रत्येक वळणावर

कसे निर्णय घेतले याची त्यांना थोडीफार तरी कल्पना येऊ शकेल.''

कारखानीसांच्या भावनेशी मी सहमत आहे, पण त्याचबरोबर त्यांना हे (खेदाने) सांगू इच्छितो, की आज असंख्य (फक्त शहरी नव्हे, तर ग्रामीणही !) मराठी मुले, अमेरिकन मराठी मुलांच्याच भाषा स्थितीत आहेत; पण त्याचबरोबर दुसरेही सत्य आहे, जे आशादायी आहे. अजूनहि जगातील सुमारे दहा कोटी मराठी माणसांपैकी नऊ कोटी माणसांची संवादभाषा, व्यवहारभाषा आणि भावभाषा मराठीच आहे. बोली अनेक पण भाषा एकच. जेव्हां आजचे साधारणपणे तीस टक्के पूर्णनिरक्षर आणि नवीपिढी शाळेत जाईल, समाजात वावरेल तेव्हां ती मराठीतच बोलेल. गरज आहे ती न्यूनगंड दूर करण्याची. गरज आहे ती अभिमान बाळगताना दुराभिमान टाळण्याची. गरज आहे ती अस्मिता जपताना अभिनिवेश येऊन देण्याची आणि गरज आहे ती मराठी अस्मितेला ग्लोबल करण्याची. दृष्टी आणि दृष्टिकोन, दोन्ही विशाल करण्याची गरज आहे.

या पुस्तकातील प्रत्येक लेखकाची/लेखिकेची अतिशय आत्मीयतेने करुन दिलेली ओळख आणि त्यांचे निवडक लेखन इतके हृदयस्पर्शी आहे, की प्रत्येकाचा नांवानिशी उल्लेख करणे हे नुसत्या अनुक्रमणिकेप्रमाणे रुक्ष होईल, म्हणून तसे करीत नाही; परंतु एक मात्र नोंदवू इच्छितो. या पुस्तकाची मुद्रणप्रत वाचताना मला अभिमान आणि अश्रु दोन्ही आवरता आले नाहीत. इतर कितीतरी मराठी – अमेरिकन लेखक – कवी (कदाचित जागेअभावी) या ग्रंथात समाविष्ट होऊ शकले नाहीत–नसावेत; पण त्यांच्यापैकी अनेकांचे व्यासंग व सर्जनशीलता, संवेदनशीलता आणि शैली माझ्या परिचयाची आहे. त्यामुळे असाच तिसराही खंड लवकरच प्रसिद्ध व्हावा अशी शुभेच्छा देऊन हे प्रास्ताविक संपवितो.

२० डिसेंबर २०१०

**– कुमार केतकर**
मुख्य संपादक
दैनिक लोकसत्ता

# संस्कृत विदुषी साहित्यिका : विद्युल्लेखा अकलूजकर



उत्तर अमेरिकेतील, विशेषकरून कॅनडातील लेखकांच्या यादींत, विद्युल्लेखा अकलूजकर यांचे नांव अग्रभागी घालावे लागेल. अकलूजकरांनी मराठी साहित्यात आणि मराठीच्या इतर उपक्रमांत भरीव कामगिरी केली आहे. त्यांच्या मराठी लेखनाच्या यादींत आत्तापर्यंत पांच स्वतंत्र पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांत, दोन ललित लेख-संग्रह, एक प्रवास वर्णन लेख-संग्रह, एक भाषाविषयक लेख-संग्रह, आणि एक कादंबरी, यांचा समावेश आहे. त्या व्यतिरिक्त, त्यांचा एक नवीन कथासंग्रहही प्रसिद्धीच्या मार्गावर आहे. त्यांना मिळालेल्या पारितोषिके, पुरस्कार यांची यादीही अशीच लांबलचक आहे. अशा या सुविद्य लेखिकेचा या पुस्तकाद्वारे आमच्या वाचकांना थोडक्यात परिचय.....

आपलं बालपण, सुसंस्कृत, सुस्थित, बुद्धिवादी, मध्यमवर्गीय साहित्यिक, आणि बहुआयामी कलावंतांच्या घराण्यात गेलं, असं त्यांनी सांगितलं. "बालपण व शैक्षणिक काळातील वास्तव्य पुण्यातील क्यानटोनमेंट विभागात होते. घराभोवतीचे खेळगडी बहुतेक सगळे बोहरी, पारशी, ख्रिश्चन, गुजराथी वगैरे होते. त्यामुळे बहुभाषिकत्व सहजच अंगांत बाणलं गेलं. तऱ्हेतऱ्हेच्या वळणाच्या लोकांशी जुळतं घ्यायचं बाळकडू मिळालं." असं त्या म्हणाल्या. शाळा मात्र प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटीची, मराठी माध्यमातील मॉडर्न स्कूल होती. महाविद्यालयीन शिक्षण फर्ग्युसन व पुणे विद्यापीठातून त्यांनी पूर्ण केले. घरातल्या सर्वांना कुत्र्या-मांजरांचं, तसेच इतर जनावरांचं प्रेम होतं. प्रथम पांच वर्षे, विद्युल्लेखाताईंची जिवलग मैत्रीण 'बिजली' कुत्री होती व नंतर सात-आठ मांजरंही सोबतीला होती. त्यांच्या लहानपणीची सर्वात आवडीची आठवण म्हणजे, सुट्टीच्या दिवशी आई-बाबा आणि बहिणीबरोबर सकाळीच उठून, चालतचालत एम्प्रेस गार्डनमध्ये जाऊन सबंध दिवस पिकनिक करणे. बागेमधील झाडांवर चढून बसणे, चिंचा गोळा करून खाणे वगैरेचा मनसोक्त आनंद सर्वात आवडता होता.

आई वडील दोघेही साहित्यिक आणि कलावंत असल्यामुळे, त्यांचा साहित्याचा

आणि कलेचा वारसा आपसूकच विद्युल्लेखाताईंकडे आला. आई संस्कृतची स्कॉलर होती, तर वडील सहज सुंदर कविता करीत, नाटक हाही जिव्हाळ्याचा विषय होता. वडिलांनी लिहिलेल्या एका नाटकात त्यांच्या आईने व गायक संगीतकार सुधीर फडके यांनी भूमिका केल्या होत्या. त्यांचे एक काका नांवाजलेले शिल्पकार व दुसरे अव्वल दर्जाचे सर्जन असून उत्तम छायाचित्रकारही होते. तर अशी ही सर्व विरासत त्या आपल्या भावी आयुष्यात जपणार याचा त्यांना विश्वास होता. लहानपणापासून प्रवासाची खूप आवड होती. त्यामुळे संपूर्ण पृथ्वी पाहण्यास जायचे स्वप्नही विद्युल्लेखाताईंनी उराशी बाळगले होते.

आयुष्याची समज व जाण केव्हां आली ? या प्रश्नावर त्या म्हणाल्या.......

"साधारण पाचव्या वर्षापासून मला प्रश्न पडत असत आणि मी स्वतंत्र विचार करून ते ऐकवीत असे, अशी आठवण आहे. निरीक्षण करायची आणि मनात आलेले चिंतन बोलून दाखवायची सवय तेव्हांपासून आहे. पण समज बरीच भाबडी होती. आईवडिलांच्या सुरक्षित छत्राखाली काळजीमुक्त बालपण गेल्यामुळे, फक्त पुस्तकी विचारांशी तोंडओळख होऊन मी, तत्त्वज्ञानाचे विचार करीत असे, पण रोजची भाजीभाकरी मिळवायला कष्ट वगैरे ज्यांना करावे लागतात, त्यांच्या आयुष्यातील संघर्षाचा मला फारसा मागमूस नव्हता. माझे विचार निसर्ग, प्राणी आणि अध्यात्म यांच्याबद्दल असत. हायस्कूलमध्ये गेल्यावर बाकीच्या मुलांकडे पाहून, आजूबाजूची गरिबी पाहून, आणि पानशेतचे धरण फुटल्यावर झालेले लोकांचे हाल पाहून, मग एकाच गावांत शेजारी शेजारी जगणाऱ्यांचे आयुष्य किती वेगळ्या जगातले असते, त्याची नीट जाण जागी झाली. समृद्ध अमेरिकेत येऊन तुटपुंज्या स्कॉलरशिपवर विवाहित विद्यार्थी म्हणून जगतांना ती जाण अधिक आली, एवढंच. 'आलं अंगावर की घेतलं शिंगावर' ही वृत्ती उपयोगी पडली. कशालाही टकरा देतांना बिचकले नाही."

विद्युल्लेखाताईंनी आपली लेखनाची मुहूर्तमेढ शाळा-कॉलेजमध्ये असतांनाच रोवली. त्यावेळी सत्यकथा, किर्लोस्कर, स्त्री, वसुधा, ललना, संजय, अमृत, नवनीत इत्यादी मराठी मासिकांतून त्यांचे लिखाण प्रसिद्ध झाले होते. त्या संस्कृतमधील पदवीधर असून उज्जैन येथे १९६६ साली झालेल्या संस्कृत वक्तृत्वस्पर्धेत त्यांनी सुवर्णपदक मिळवले. तसेच एम. ए.च्या संस्कृत पदव्युत्तर परीक्षेतही त्यांनी परत दुसरे सुवर्णपदक मिळवले. अशा या दुहेरी सुवर्णपदकांच्या त्या मानकरी ठरल्या, ही विशेष अभिमानाची आणि गौरवाची बाब आहे. स्कॉलर असल्याशिवाय असे सन्मान प्राप्त होत नाहीत. एवढ्यावरच त्या समाधान मानून राहिल्या नाहीत, तर पती अशोक अकलूजकर यांच्याशी लग्न

करून आल्यावर कॅनडातील व्ह्यांकूवर येथील ब्रिटीश कोलंबिया विद्यापीठाची तत्त्वज्ञान विषयातून पी.एच.डी. ही त्यांनी प्राप्त केली. सध्या त्यांचे वास्तव्य व्ह्यांकूवरजवळील रिचमंड या शहरी आहे व अजूनही त्यांचे ब्रिटीश कोलंबिया विद्यापीठात संशोधन चालू आहे. याच विद्यापीठात त्यांनी तत्त्वज्ञान, हिंदी भाषा आणि भारतीय साहित्य वगैरे विषयांचे अध्यापन केले. तसेच जगप्रसिद्ध हार्वर्ड विद्यापीठात संस्कृतही शिकवले. शिवाय पती, प्राध्यापक अशोक अकलूजकर यांच्या संस्कृत स्वाध्याय-पुस्तकाच्या प्रकाशनाचे व जागतिक वितरणाचे कामही त्या पाहत आहेत. याशिवाय, विद्युल्लेखाताईंचा 'एकता' या टोरोंटोहून प्रसिद्ध होणाऱ्या त्रैमासिकाच्या संपादनांत अनेक वर्षे सहभाग आहे. 'एकता'च्या गेली जवळ जवळ २० वर्षे त्या सहसंपादक, संपादक आणि सल्लागार संपादक आहेत. 'एकता'तून विविध विषयांवर त्यांनी मौलिक आणि चिकित्सक लिखाण व समस्यापूर्ती सदराचे नियमित आयोजन केले आहे. त्याशिवाय, काव्यवृत्तांचे विवेचन आणि भारतातील व भारताबाहेरील अनेक मासिकांतून लिखाणही त्यांनी प्रसिद्ध केले आहे. या सगळ्यावरून त्यांच्या विद्वत्तेची आपणांस कल्पना येईल. फावल्या वेळात त्या चित्रकला, छायाचित्रण, बागकाम, सायकलसंचालन, पर्वतारोहण, विणणे, मराठी साहित्य सेवा आणि इतर सेवाभावी कामे असे अनेक छंद जोपासत आहेत. सर्वसाधारण व्यक्तींकडून आपण नेहमी ऐकत असतो ... "वेळ कोठे आहे?.." .. "अजिबात वेळ मिळत नाही" इत्यादी.. अशा व्यक्तींनी विद्युतताईंकडून धडा शिकावा, असे मला वाटते.

विद्युल्लेखा अकलूजकर यांच्या मराठी साहित्य-लेखनाची आणि सन्मानांची नामावली खालील प्रमाणे आहे.

**स्वतंत्र :**

१.मेरा जूता है जापानी - ललित लेख-संग्रह (ग्रंथाली प्रकाशन, मुंबई-१९९०)
२.यथा काष्ठं च काष्ठं च - प्रवास वर्णन लेख-संग्रह (देशमुख प्रकाशन, पुणे - १९९१)
३.मेपलची पानें - ललित लेख-संग्रह (ग्रंथाली प्रकाशन, मुंबई - १९९७)
४.कहाणी - कादंबरी (देशमुख प्रकाशन, पुणे - १९९८)
५.शब्दवेध - भाषाविषयक लेख-संग्रह (मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई- २००५)

**कथानुवाद-संग्रह :**

१.अठरा धान्यांचे कडबोळे (मेनका प्रकाशन, पुणे -२००४)

**इतर संपादित साहित्य :**

१.आजीच्या सुपातील मोती...गोमंतकीय म्हणींचा कथारूप परिचय (प्रस्तावना व म्हणींसह) - लेखिका कमला ग. वाघ (स्वाध्याय पब्लिकेशन्स, रिचमंड, कॅनडा -१९९५)

२.विदेशिनी - 'एकता' या टोरोंटोहून प्रसिद्ध होणाऱ्या त्रैमासिकात प्रसिद्ध झालेल्या ३१ निवडक कथांचा संग्रह (एकता प्रकाशन, टोरोंटो, कॅनडा - २००१)

**आगामी :**

दर्पणी पाहता रूप - कथा संग्रह

**पारितोषिके पुरस्कार :**

विद्यार्थीदशेत अनेक पारितोषिके आणि पुरस्कार. अभ्यास, वक्तृत्व यात सुवर्णपदके, शिष्यवृत्त्या, भारतात राष्ट्रीय शिष्यवृत्ती, अमेरिकन विद्यापीठात शिष्यवृत्ती. बृहन् महाराष्ट्र मंडळ २००५ अटलांटा, जॉर्जिया अधिवेशनांत सर्वोत्कृष्ट मराठी लेखनाबद्दल व सेवाभावी कार्याबद्दल मानचिन्ह देऊन गौरव. दोन वर्षापूर्वी म्हणजे, २००८ मध्ये वर उल्लेखलेल्या अठरा धान्यांचे कडबोळे' या पुस्तकाला साने गुरुजी राष्ट्रीय स्मारक केंद्राचा "बाळशास्त्री जांभेकर" पुरस्कार लाभला. हा पुरस्कार २००४-२००७ मधील उत्कृष्ट अनुवादाच्या पुस्तकासाठी दिला गेला.

तुमच्या लिखाणाचा मूलभूत हेतू, उद्देश काय आहे व त्यांतून तुम्हाला कोणता संदेश वाचकांपर्यंत पोहोचवायचा आहे ? या प्रश्नाला उत्तर देतांना त्या म्हणाल्या :

"मी कविता लिहिते, तो माझ्या आत्यंतिक उत्कटतेचा अनिवार उद्गार असतो. तो उचकीसारखाच उत्सफूर्त असतो. आपला अनुभव जसाच्या तसा सहृदय रसिकांपर्यंत जावा, असे वाटते, म्हणूनच कविता कागदावर उतरते आणि प्रकाशात येते. चांगल्या कविता आपोआपच संस्मरणीय ठरतात. कारण, त्यांना सार्वकालीन सत्याची एक किनार लाभलेली असते. कथालेखनाची उर्मी बरीचशी याच प्रकारची पण त्यात थोडाफार तरी भाग जाणीवपूर्वक मांडणीचा असतो. काहीतरी सांगायचंय म्हणून कथा लिहिते. बहुतेक वेळा आयुष्यातील चकमकी, चुकामूक, चटका लावून जाणारं काहीतरी, किंवा अनाकलनीय प्रश्न यामुळे कथा निर्माण होतात. मनोरंजन आपातत: होतं, हा आनंदाचा भाग आहे, पण सांगायचं जे असतं, ते वाचकाला आपलंसं वाटणं, हे महत्त्वाचं असतं. मग ती कथा किंवा कविता 'पोचते'. बाकीचे लेख, हे तात्कालिक ललित-लेख असले, तर मनोरंजनपर असतात, किंवा अभ्यासपूर्ण

संशोधन-लेखही असतात. मी वेगवेगळ्या वेळी या सर्व प्रकारांना हाताळले आहे. प्रत्येकाचे उद्देश तसे वेगवेगळेच असतात. अभ्यासपूर्ण संशोधन-लेखनात मला वाटणारे काही नवीन सापडलेले नीट मांडून सांगायचे असते, तर ललित लेखनात वाचकाला गुंतून ठेवता येईल, अशा 'साध्याच विषयात' मला दिसणारे मर्म उलगडून दाखवायचे असते."

बदलत्या जगाबद्दल विचारले असता विद्युल्लेखाताईंनी अगदी मार्मिक उत्तर दिले.

" 'जग' किंवा 'जगत्' ह्या मूळ संस्कृत शब्दाचा अर्थच मुळी 'जे बदलणारे आहे, जे जात राहते', ते जगत् असा आहे. काळाच्या ओघात बदल हे घडणारच. आयुष्याला चांगले वळण लावायचे काम आपले आहे, जगाचे नव्हे. जग बदलले तरी आपण स्थिर राहू शकतो. बदल नाकारून नव्हे, स्वीकारूनदेखील स्वतःची मूल्ये व आनंद जपू शकतो." त्यांच्या 'स्थलांतरितांचा फटका' या कवितेतून त्यांनी साधारण हीच भूमिका मांडली आहे. हीच भूमिका त्यांनीही स्वतःच्या आयुष्यात अंगीकारल्यामुळे त्यांची मुलेही त्याचाच वारसा घेऊन आयुष्यात वागत आहेत. रोजच्या खाण्यापिण्यात, भाषेत आणि कपड्यालत्त्यात सर्वांप्रमाणे थोडा फार बदल झाला असला तरी, त्यांच्या मुलांच्या संस्कृतीत फरक पडलेला नाही.

मराठी साहित्याची आवड कशी व कोणामुळे झाली? या प्रश्नावर विद्युल्लेखाताई म्हणाल्या....

" मराठीच नव्हे, तर हिंदी, इंग्रजी आणि संस्कृतमधीलही साहित्याची आवड आईवडिलांच्या संस्कारामुळे लहानपणीच लागली आणि लाभलेल्या चांगल्या शालेय शिक्षकांच्यामुळे, पुण्यातील सांस्कृतिक समृद्धीत वाढल्यामुळे ती सहज जोपासलीही गेली. पु. ल. देशपांडे, सुधीर फडके यांच्यासारख्या दिग्गज कलावंतांचे घरोब्याचे संबंध होते. आणि बाराव्या वर्षापासून ज्या ज्या कविता लिहीत गेले, त्या त्या प्रकाशित होत राहिल्या. संपादक, प्रकाशक सगळ्यांनीच तेव्हां मला कौतुक आणि उत्तेजन दिले होते. माझ्या 'अठरा धान्यांचे कडबोळे' या अनुवाद-संग्रहाच्या अर्पणपत्रिकेत मी त्या सर्वांचा कृतज्ञापूर्वक उल्लेख केला आहे." त्यांच्या लिखाणात सत्य, शिव आणि सुंदरता या तिन्हींचा संगम आहे. सर्वच महत्त्वाचे आहे. हे त्यांनी खालील छोट्याशा कवितेतून व्यक्त केले आहे.

कल्पनेच्या पंखांवरी । घेई मानस भरारी ।
तेथे सत्याचे कैवारी । भांबावती ।।
जिवाशिवाची संगती । कथाकीर्तनात गाती ।
शिव आणि पराशक्ती । दोघे एक ।।

सौंदर्याची अभिव्यक्ती । सत्यावाचुनी ना गति ।
मग पवित्र ती उक्ती । आपोआप ।।

"लिखाणातील आशयच जर सघन नसेल तर त्या लिखाणाला अर्थच उरणार नाही. आशयाला समर्पक अशी भाषेची पकड नसेल तर तो आशय पोरका होऊन जातो. त्या दृष्टीने, आशय आणि भाषा हे दाम्पत्य आहे म्हणायला हवे.ह्ल असे त्यांनी प्रतिपादन केले.

त्यांच्या आवडत्या साहित्यिकांची यादी लांबलचक आहे. त्यांत मराठी नव्हे तर इतर भाषेतील साहित्यिकांचाही आदरपूर्वक समावेश आहे. त्यांत... जगन्नाथ पंडित, भवभूती, कालिदास, बाण (संस्कृत), तुलसीदास (अवधी), सूरदास (व्रज), बंगालीतील रवींद्रनाथ टागोर आणि शरदचंद्र चटर्जी, संत संप्रदायातील ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, जनाबाई, मुक्ताबाई तर इतर मराठीतील राम गणेश गडकरी, श्री. ना. पेंडसे, महादेवशास्त्री जोशी, गो.नी.दांडेकर, पु.ल.देशपांडे, जी.ए.कुलकर्णी, बा.सी.मर्ढेकर, केशवसुत, बालकवी ठोमरे, कुसुमाग्रज, भा.रा.तांबे, वसंत बापट, मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर, ग.दि.माडगुळकर, इंदिरा संत, शांता शेळके, गौरी देशपांडे, प्रकाश नारायण संत, नारायण सुर्वे, आनंद यादव, अनिल अवचट अशा कितीतरी साहित्यिकांचा समावेश करावा लागेल. या सर्वांची पुस्तके त्यांच्या संग्रहात आहेत आणि ती त्या अनेकदा वाचत असतात. "आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही निकषांवर या सर्वांचे साहित्य श्रेष्ठ आहे आणि मला ते भिडते, आवडते," असं त्या म्हणाल्या.

जीवनाच्या यशापयशाचा तुमच्या लिखाणावर काही परिणाम झाला का ? या प्रश्नाचे उत्तर देतांना त्या म्हणाल्या.....

"फार लहानपणी, नकळत्या वयात माझ्याकडून वडिलांनी गीता पाठ करून घेतली, त्यामुळे 'सुखदुःखे समे कृत्वा, लाभालाभौ जयाजयौ।' वगैरे सुभाषिते जगण्याचा भाग होऊन गेली. यशामुळे फुगून जायचे नाही आणि अपयश आले तरी खचायचे नाही, हे माहित आहे, आणि ते पाळत पाळत जगायचा आणि लिहायचा प्रयत्नही चालू आहे. दुःखद प्रसंगातूनही निर्मिती घडत राहते आणि कधीकधी त्यामुळेच चांगली निर्मिती घडते."

स्त्रीमुक्ती चळवळीबाबत त्यांचे मतही इतरांसारखे आहे....

"स्त्री-मुक्ती चळवळ भारतात, महाराष्ट्रात, त्या त्या मातीचे संदर्भ घेऊनच पुढे जात राहणार आहे. ही चळवळ, स्त्रियांना व्यक्ती म्हणून जगता येण्यासाठी सुरू

झाली, आणि अजूनही याच उद्दिष्टाच्या दिशेने ती चालूच आहे. शिक्षण, मतदानाचा हक्क, आर्थिक स्वातंत्र्य, नोकऱ्या आणि स्वतंत्र व्यवसाय यात उपलब्धी वगैरे बाबी जरी आवाक्यात आल्या, तरी प्रत्यक्ष अर्थार्जनातील समानता, स्वतःसंबंधीचे शारीरिक, आर्थिक, कौटुंबिक आणि सामाजिक निर्णय घेण्यातील स्वातंत्र्य, या अजूनही अनेक अर्थांनी अप्राप्य गोष्टीच राहिल्या आहेत.

समलिंगी विवाहाबाबत मत विचारले असता, विद्युल्लेखाताई म्हणाल्या,.....

"समलिंगी स्त्रिया किंवा पुरुष यांच्या बाबतीत असलेले अनेक गैरसमज दूर होणे सर्व समाजाच्या हिताचेच आहे. ही माणसे मुळात आपल्यासारखीच अनेक समाजोपयोगी गुणांनी युक्त अशी असतात, त्या आपल्यासारख्याच विविध प्रकारच्या बऱ्यावाईट व्यक्ती आहेत आणि त्यांचे यौन संबंध ही त्यांची स्वतःपुरती बाब आहे, ही जाणीव रुजायला हवी. त्यांना हवे असेल, तर त्यांना एकत्र राहणे, विवाह करणे, आपापल्या सहचराच्या मिळकतीचा वारसाहक्क, करातील सूट वगैरे वगैरे सर्व त्यांना हक्क म्हणून मिळायला हवे. समाजावर याचा परिणाम काय होणार, हेही आपण योग्य शिक्षणामुळे बदलू शकतो. या बाबतीत जितके व्यवस्थित ज्ञान मुलांना आणि मोठ्यांनाही होईल, तितक्या लवकर अज्ञानमूलक गैरसमज दूर होतील आणि प्रथम त्यांच्याकडे आपल्याचसारखी व्यावसायिक माणसे म्हणून पाहिले जाईल. दोन समलिंगी पुरुषांनी दत्तक घेऊन वाढवलेल्या मुलांचे कुटुंब मला माहित आहे. मुले मायेवर वाढतात, दोन बायका, की दोन पुरुष यामुळे काही फरक पडत नाही. व्यक्तींमधील सौजन्य अधिक महत्त्वाचे. अर्धनारीनटेश्वराच्या अद्भुत कल्पनेला दिव्य स्थान देणारा आपला हिंदुधर्म आहे. सर्व प्रकारच्या व्यक्तींमध्ये आणि प्राण्यांमध्येदेखील देवत्व पाहणाऱ्या आपल्या धर्माने आपल्याला याही बाबतीत सहिष्णुता आणि समता शिकवलेली आहे. आपल्याला ती दृष्टी आता लाभलीच पाहिजे."

आज आपला समाज, चैनीच्या आणि भ्रष्टाचाराच्या आहारी जात आहे. व्यक्तिगत स्वार्थ आणि सुखलोलुपता परमावधीला जाऊन ठेपली आहे. अशा समाजाला आणि आमच्या पुढील पिढीला जागृत करणारे विद्युल्लेखाताईंचे हात हवे आहेत. शेवटी आपल्या जीवनांत हा आपुलकीचा ठेवा अनमोलच नाही का ?

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

# काय चुकलं माझं ?

**अविनीता :**

काय चुकलं माझं ? मला लग्नबिग्न काही करायचं नाही. तुम्ही आतां माझा नाद सोडा. मला माझं आयुष्य सुखानं जगू द्या. असं म्हटलं मी, आणि सरळ घरातून बाहेर पडून या स्वतःच्या जागेत राहायला आले, तर असं काय मोठंथोरलं चुकीचं केलं मी ? आईबाबा नव्हते का एके काळी स्वतःचं घर सोडून बाहेर पडले ? ते चालतं वाटतं ? त्यांनी केलं ते चांगलं, आणि आम्ही केलेले निर्णय मात्र घायकुतेपणाचे म्हणायचे ! हा चांगला न्याय आहे ! मी असं म्हटलं, तर आई म्हणते, आम्ही घर सोडलं, ते नाइलाजाने सोडलं. काठियावाडमधल्या तेव्हाच्या आमच्या एकत्र कुटुंबाच्या गरीबीत मन मोडत जगत राहायला नको, म्हणून सोडलं. आणि त्या आमच्या निर्णयामुळेच आजचं आपलं समृद्ध आयुष्य आपल्याला मिळालं. खरं आहे एका अर्थाने आईचं. नशीब काढायला म्हणून आईबाबा भारत सोडून आधी आफ्रीकेत गेले. तिथे पैसा मिळवला, सुबत्ता मिळवली. पण तिथेही रोजच्या आयुष्यात फारसं स्थैर्य नव्हतं. आम्हां मुलींना तिथे वाढवणं कठीण वाटलं त्यांना. मग तिकडच्या जुलमी सत्ताधाऱ्यांच्या अराजकामध्ये आणि सैनिकी अंमलाखाली राहायला नको, म्हणून तोही देश सोडून, या शांतताप्रिय कॅनडामध्ये घर केलं त्यांनी. पण तरी त्यांनी वेळोवेळी घरं बदललींच ना ! एवढ्या सगळ्या घरांतून, देशातून दोन मुलींना घेऊन ते फिरले, ते चालतं. आम्ही मात्र नुसतं एक वेळ आईबाबांचं घर सोडून स्वतःच्या घरात जायचा निर्णय केला, तर बाबा रागावून बसतात आणि आई उसासे सोडते. आई म्हणते, नुसतं घर सोडल्याबद्दल राग नाही, पण लग्न नको म्हणजे काय ! माझ्यासारख्या शहाण्या मुलीने असं म्हणणं म्हणजे डोक्यात राख घालून घेणंच आहे. पण मला सांगा, खरोखरच मला आजघडीला लग्न नकोसं झालं असलं, तर तो काय माझा दोष आहे ?

एके काळी मीही सर्वसाधारण मुलींसारखीच लग्नाची, नवऱ्याबरोबर घर-संसार सजवायची, मुलाबाळांची स्वप्नं पाहिली होती. कनेडियन गोऱ्या मैत्रिणींसारखी जरी डेटिंग आणि मौजमजेची शक्यता आमच्या आयुष्यात नाही,हे आईबाबांच्या

लहानपणापासूनच्या शिकवणीमुळे मनावर ठसवलं असलं, तरी राजरोस शोध घेऊन सापडलेल्या चांगल्याशा नवऱ्याशी आईबाबांच्या संमतीने लग्न करणं मला खरोखरच आवडलं असतं. कारण माझ्या आईबाबांवर माझा विश्वास होता. आणि आफ्रिकेत काय, किंवा कॅनडात काय, कुठेही राहात असलो, तरी आपण भारतीय वंशाचे आहोत, आणि आपल्या देशात पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेल्या, सर्व घर पारखून लग्न ठरवण्याच्या पद्धतीत तसं वाईट काही नाही, असंच मलाही वाटत होतं. ठरवून केलेल्या लग्नाची अनेक चांगलीचांगली कुटुंबं आमच्या आसपास,आमच्या आणि बाकीच्या भारतीय समाजात मला माहिती पण होती. म्हणून माझा काही त्या पद्धतीला विरोधबिरोध नव्हता. आईबाबांनी ठरवलेल्या सर्व गोष्टी मी त्यांना हव्या तशा केल्यादेखील. चांगली ऑफिसांतून दोनदा रजा काढली, कॅनडातून इंग्लंडमध्ये फेऱ्या घातल्या, त्यांनी शोधलेल्या नवऱ्यामुलाच्या घरी गेले, बसले, बोलले. मनाने त्या घरात वावरते आहे, अशी कल्पना केली, स्वप्नं रंगवली. आणि एक दिवस चांगली दणदणीत खाली आपटले.

म्हणून या क्षणाला तरी मला माझ्या नशिबात लग्न, तेही आईबाबांना आवडणारं, त्यांच्या डोक्यातल्या जुन्या पद्धतीनेच घडणारं, दोन कुटुंबांना जोडणारं, ठरवून केलेलं लग्न आहे, असं मुळीच वाटत नाही. दुधानं तोंड पोळलं, म्हणून आतां ताकदेखील फुंकून पिणार. एकदा तो तसला प्रकार वाट्याला आल्यामुळे दुसऱ्यांदा तसल्याच मनस्तापातून जायची माझी तयारी नाही. मग मला सांगा, जे मला सुखासुखी लाभणार नाही, त्याचा नाद मी सोडला, आणि सरळ माझं मन माझ्या करियरवर, माझ्या कामावर केंद्रित केलं, तर आईबाबांना त्याचा एवढा काय त्रास व्हायला हवा ? आत्तापर्यंत माझं लग्न ठरवण्याच्या त्यांच्या प्रयत्नांमुळे माझ्या वाट्याला जे आलंय, त्याचा मी करून घेतलाय का त्रास ? नाही, म्हणजे खरं पाहिलं तर त्या सगळ्या प्रकारामधे माझेच सर्वात जास्त हाल झाले ना ! पण जी मानहानी झाली, ती सोसलीच का नाही मी शांतपणाने ? मग त्या सगळ्या चमत्कारिक प्रकाराला मागे टाकून, आणि त्या सगळ्या स्मृतींना, घरात घडणाऱ्या रोजच्या निष्फळ चर्चेला, वादावादीला बाजूला सारून मी माझ्या मन:शांतीसाठी एकटी राहायचं निश्चित करून या माझ्या छोट्याशा जागेत आले, आणि झालं गेलं विसरून आपल्या कामाला लागले, तर काय चुकलं माझं ?

गेले सहा महिने त्या लग्नाच्या पायीं जी यातायात झाली, आणि वरून जो काय मनस्ताप झालाय, त्याची किंमत कोण भरणार ? ज्याने सर्वात जास्त वैताग दिला, तो तर करून सवरून नामानिराळा झालाय. त्याचं नावदेखील घ्यायला नको वाटतं

मला. त्याचे आईबापही ‘दैवाचा दोष’ म्हणून हात झाडून मोकळेच राहिलेत. मुलाला नाही दोष दिला त्यांनी स्वतःच्या. नाही म्हणायला दुसऱ्या खेपेला आम्ही लंडनमधे गेल्यावर जो असह्य प्रसंग झाला, तेव्हा मात्र त्यांनी दहादहा वेळां माफी मागितली आम्हां सगळ्यांची. पण हजार वेळां ‘सॉरी’ म्हटल्याने आमच्या पदरी पडलेला मनस्ताप भरून थोडाच निघतो ? पहिल्या खेपेला आईबाबांबरोबर लंडनमधे जाऊन मी इथे परतले, तेव्हा माझी तिथे सगाई झाली असं कळल्यावर माझ्या ऑफिसमधल्या मित्रमैत्रिणींनी मला एक जोरदार ब्रायडल शॉवर दिला होता. त्या सगळ्यांनी मिळून कौतुकाने मला दिलेली प्रेझेंट्स् मी घेतली, आणि मग दुसऱ्या खेपेला लंडनमधे जाऊन आल्यावर ‘हे लग्न होणारच नाही’ हे मला, आणि सगळ्यांना निश्चित कळल्यावर ऑफिसमधल्या सगळ्याचजणांनी आ वासला. झालं ते कां झालं, आणि कसं घडलं, ते तर मलादेखील नीटसं कळलंच नव्हतं. मग मी त्यांना काय सांगणार ? ‘मुलाने लग्न मोडलं’ एवढंच सांगितलं. ते खरंच होतं. बाकीचं सगळं सांगणं अशक्यच होतं.

त्या मुलाने मला पहिल्यांदा लंडनला त्याच्या आईबापांच्या घरी आम्ही गेलो, तेव्हाच पाहिलं होतं. आमची त्यांची जात एक होती, घराणी एकाच तोलामोलाची होती. तेही आईबाबांसारखेच व्यापारउदीमवाले होते. मी त्याच्या आईवडिलांना पसंत होते. नवऱ्यामुलाचं मतही त्यांच्याचकडून आम्हाला कळलं ते अनुकूल होतं. आईबाबा खूष होते. मीही आनंदात होते. आणि आम्ही इथे परत आल्यावर मात्र मुलाने मला त्याचा नकार कळवला. त्याने जे कारण कळवलं ते इतकं चमत्कारिक होतं, की त्या धक्क्याने आम्ही प्रचंड गडबडलों. मग आईबाबा आणि त्याच्या घरचे लोक यांची भरपूर फोनाफोनी झाली. शेवटी आमच्या आईच्या हट्टापायी आम्ही पुन्हा एकदा लंडनला तिघेही गेलो. या प्रकरणाचा समक्ष भेटूनच काय तो सोक्षमोक्ष लावावा म्हणून आम्ही गेलो. आणि त्या भेटीत निकाल कळला तो हाच की ‘लग्न मोडलं !’ हा संबंध जुळणं अशक्य. का, आणि कसं ते नीटसं कळलंच नाहीं. सगळ्या चर्चा होऊनदेखील घरी येताना मी धुक्यातून चालत असल्यासारखी अस्वस्थच होते. पण परत घरी आल्यावर तीं प्रेझेंटं मला बघवेनात. मी ती सगळी उचलून नुसती क्लॉझेटमध्ये बाजूला नजरेआड ठेवून दिली. कारण मित्रमैत्रिणींचं म्हणणं, की आम्ही आवडीने तुला दिलेली प्रेझेंट्स् आहेत. एकदा दिलेलं तू परत करू नको. तू ते खुशाल स्वतःसाठी वापर. पण माझं मन इतकं सुन्न झालंय, की मला तर त्या वस्तू डोळ्यांपुढे देखील नको वाटतात. तुम्हीच सांगा, एवढं सगळं सोसल्यावर, लग्न या प्रकाराचाच मला असा वैताग आला, आणि त्या वस्तू, ते घर,

चडफडणारे आईबाबा, सगळं नजरेआड करून नुसतं एकटं राहावंसं वाटलं, तर काय चुकलं माझं ?

**भारतीबेन :**

मला अगदी समजत नाही, काय चुकलं माझं ? किती विचार करकरून डोक्याचा भुगा व्हायची वेळ आली. पण अजिबात उमजत नाही. खरोखर, मी जे जे केलं, त्यात कुठं कमी पडले मी ? काय चुकलं ? मुली जन्माला घातल्यावर डोळ्यात तेल घालून त्यांना जपलं, वाढवलं. जन्मभर एकीकडे दुकानात राबराबून नवऱ्याच्या व्यापारधंद्याला हातभार लावतानादेखील मुलींच्या घरी परतायच्या वेळेला नीट घरात राहून मुलींच्या कल्याणाची सतत काळजी वाहिली. तीन देशातून फिरतांनादेखील मुलींना अगदी साधं सरळ वळण लावलं, भरपूर शिकवून त्यांना शहाणं केलं, स्वतःच्या पायांवर उभं राहायला मदत केली, आणि मुली मोठ्या झाल्यावरही स्वतःची जबाबदारी नीट ओळखून दूरदृष्टीनंच पुढची पावलं टाकली. करीअर सुरू झाली तरी मुलीच्या जातीला संसारही हवाच ना ! मग जगाच्या पाठीवर कुठच्या कुठच्या देशात जाऊन स्थायिक झालेल्या आमच्या जातबांधवांकडून उपलब्ध नवऱ्यामुलांची, त्यांच्या कुटुंबांची माहिती काढली. त्यातल्या त्यात सर्वात चांगली दोनतीन स्थळं हेरली, त्यांच्याशी नीट संपर्क साधला. फोनाफोनी केली, पदरच्या पैशांनी लंडनच्या वाऱ्या केल्या. मुलीला चांगलं स्थळ मिळावं, आणि ती सुखात राहावी, म्हणून कोणतेही शहाणे आईबाप जे जे काय काय करतील, ते सगळं, शुद्ध मनाने आणि चांगली देवावर श्रद्धा ठेवून केलं. सगळ्यांनी वाखाणावं, इतक्या साध्या सरळ मुली माझ्या. अविनीता आणि शुचिता. मोठी अविनीता कमर्शिअल आर्टिस्ट, आणि लाजरी. धाकटी सायन्स घेऊन कॉलेजात गेलेली, आणि धाडसी. मोठीचं लग्न लावून दिलं, की धाकटीच्या लग्नाची फारशी चिंता नव्हती. कारण तिचे कित्येक मित्र तिच्या भोवती रुंजी घालत आमच्या घरी येतच होते. त्यांतल्या कुणीही तिला चटकन स्वीकारली असती. आणि ती तशी खमकी आहे. उगाच चुकीच्या गोष्टी करून तोंडघशी पडणाऱ्यातली नाही, हेही आम्हाला माहीत होतं. म्हणून तिच्या बाबतीत आम्ही निर्धास्त होतो. पण मोठी जरा लाजाळू आणि बरीचशी भोळी. हातात कला आहे तिच्या, पण अंगात हिंमत फारशी नाही. देवाने तिला फक्त हरणाचे डोळे आणि सशाचं काळीज देऊन आमच्या घरी पाठवून दिलेलं. त्यामुळे तिचं लग्न आम्ही पुढाकार घेऊन करून देण्याचा विचार होता आमचा. यात आमचं काय चुकलं ?

पण म्हणतात ना, माणूस योजतो एक आणि नियती योजते दुसरंच. तसं घडलं तिच्या बाबतीत. अशी लाजरी, हंसरी आणि निरागस लेक माझी. आईबाबांनी ठरवलेल्या गोष्टी आपल्या हिताच्याच असतील, असा तिचा या परक्या देशात राहूनदेखील पक्का विश्वास. आम्ही भाग्यवान् मानायचो आपल्याला. पण दैव कसलं नाठाळ! नेमकं तिच्याच वाट्याला हा एवढा मोठा विश्वासघाताचा प्रसंग का यावा! दोनही घराणी सारख्याच तोलामोलाची. नवरामुलगा चांगला उद्योगी म्हणून अनेक मित्रांच्याकडून ग्वाही मिळालेली, आणि फोनवर त्याच्या आईबापांशी आम्हां दोघांचं बोलणं झालं, तेही अगदी चांगल्या तऱ्हेने, हंसीखुषीने झालं. मग त्यांना सोयीचं होतं, त्या मोसमांत आम्ही मुलीला घेऊन त्यांच्या घरी भेटायला गेलो. मुलाला पाहिलं, तोही आमच्या अविनीतासारखाच संकोची, अबोल वाटला. आम्ही म्हटलं, चांगली जोडी जमेल दोघांची. त्याच्या आईवडिलांना आमची कन्यका पसंत पडली. त्यांनी तिच्या तोंडात साखरबत्तासा घातला. आणि व्यवस्थित देणीघेणी करून, सगाई उरकून आम्ही आनंदात घरी परतलो.

अविनीताच्या ऑफिसातल्या लोकांनी तिला ब्रायडल शॉवरची सुंदर पार्टी दिली, कौतुकाने कितीतरी भेटी आणून दिल्या. ती खूष होती. आम्ही आनंदात होतो, बऱ्याच जवळच्या मित्रांना नातेवाईकांना कळवून झालं, आणि पत्रिका, पोशाख वगैरेंसाठी भारतात जाणं आम्ही ठरवत होतो. आणि एक दिवस आपली अविनीता कामावरून घरी परतली, ती करपलेला चेहरा करून. मी म्हटलं, कामाचा ताण पडला असेल. चहा करावा. पण तिला चहा नको होता. बोलणंही नकोसं झालेलं. तरी पण मी खनपटीलाच बसले, तेव्हा हळूहळू वार्ता समजली. मुलाने म्हणे तिला ऑफिसात फोन करून सांगितलं होतं, की आपल्याला तिच्याशी लग्न करणं शक्य नाही. हे इतपतच कळल्यावर मी म्हटलं, की अग, तो चेष्टा करीत असेल, किंवा तू काहीतरी चुकीचं ऐकलं असशील. पण ती नीट बोलत होती. चुकीचं काही नव्हतं. त्याला लग्नच नको होतं. मला वाटलं, की आपल्या मुलीचं काय त्याला पसंत पडलं नाही? पण ती म्हणाली की, "आई, त्याच्या निर्णयाचा माझ्याशी काही संबंध नाही." "मग कशाशी आहे?" मी विचारलं. अविनीताचा चेहरा चमत्कारिक दिसला. भूत पाहिल्यासारखा. मग कसाबसा धीर करून एकेक शब्द उच्चारत ती म्हणाली, "आई, तो म्हणाला, की त्याला माझ्याशी लग्न करायचंच नाहीय, कारण तो गे आहे."

माझ्या डोक्यात ती काय म्हणतेय ते शिरलंच नाही. मी म्हटलं, "तो काय

आहे ?"

"गे आहे गे, त्याला माझ्यासारख्या मुली नकोत."

" म्हणजे काय!"

" अगं आई, त्याला फक्त मुलग्यांच्यातच रस आहे." वज्राघात! तो मुलगा, चांगला सालस, सज्जन वाटणारा मुलगा, चांगल्या बनियांच्या घराण्यातला शिकलासवरलेला मुलगा असा असेल! अविनीता म्हणाली, "आई, तो स्वत:च मला हे म्हणाला, म्हणून तर मी तुला सांगतेय. माझ्या डोक्यात तरी हे आलं असतं का ?" हे तर खरंच होतं.

मग थोडा वेळ डोक्यावर हात धरून सुन्न बसले. देवकीनंदनाचा धावा केला. बालाजीला कौल लावला आणि कसाबसा मुलाच्या घरी फोन लावला. त्याची आई फोनवर आली. मला माझ्या मुलीकडून कळलेलं तिला कळवायला महत्प्रयास पडले. माझ्याचकडे काहीतरी अपराध असल्यासारखी मी बोलत होते. पण मी ते शब्द उच्चारायचा धीर केला मात्र, वीज कोसळल्यासारखा तिकडून किंकाळीचा आवाज आला. ती बिथरलीच होती. " शक्यच नाही." "काय बालंट आणलंय आमच्या मुलावर!" " आमचा मुलगा तसला नाही आहे. तुमच्याच मुलीला लग्न करायचं नसेल. तिचाच कुणी दुसरा यार आहे का पाहा!" एक ना दोन ! नुसता जोरदार शब्दांचा मारा झाला माझ्यावर. शेवटी मी शहानिशा करून पहा, त्यालाच विचारुन पाहा म्हटलं, तेव्हा ती ठसक्यात म्हणाली, " विच्चारणार काय! मला हजार टक्के नक्की माहिती आहे, माझा मुलगा त्यातला नाहीच." शेवटी मी म्हटलं, "असेल किंवा नसेल, पण त्याने आमच्या मुलीला आधी पसंत करून, मग आता हा बाँबगोळा तिच्यावर टाकलाय, ही काय त्याची जीवघेणी थट्टा समजायची का ? काय करायचं काय आम्ही असला बेजबाबदार फोन त्याने केल्यावर ? माझी मुलगी इथे रडून लाल डोळे करत बसलीय. तुम्ही विचारा तरी एकवार त्याला की ही काय गोष्ट आहे ? कशासाठी असलं सांगितलं त्याने तिला ?" तेव्हा ती बापडी नरम आली. तिलाही अविनीता आवडली होती आणि मुलीच्या मायेने ती आपल्या पोराची जबानी घ्यायला तयार झाली. त्याला विचारून परत तुम्हाला फोन करते म्हणाली. पण चार दिवस गेले, तरी तिचा फोनच येईना. लंडनमधल्या आमच्या बाकीच्या सगेलोकांकडून आम्ही आणखी थोडी माहिती काढली, तर कळलं, की मुलाची तिकडे एक खूप आवडती मैत्रीण आहे. आणि त्याचे मित्र समजतात, की तो तिच्याशीच लग्न करणार आहे. कुणी एक सांगे, कुणी आणखी काही. आम्ही सगळे काट्याच्या शय्येवर

झोपल्यासारखे अस्वस्थ होतो, शेवटी अविनीताच्या बाबांनीच माझ्या हातात पुन्हा एकदा लंडनची तीन तिकिटं ठेवली. सरळ त्यांच्या पुढ्यात जाऊन शहानिशा करूया म्हणाले. आम्ही त्यांना वायर पाठवून दिली, की आम्ही परत येतो आहोत, मुलाला आमच्या आणि तुमच्या समक्षच काय ते अविनीताला सांगू दे. आणि "हा सूर्य - हा जयद्रथ" करायच्या तयारीने मुलीला घेऊन परत त्यांच्या घराची पायरी चढलो. यात तरी काय चुकलं माझं सांगा!

तिथे गेलो, तर मुलाचे आईबाप आणि काका-काकीच फक्त आमच्या स्वागतासाठी होते. अवांतर गप्पाच फक्त चालल्या होत्या. मूळ मुद्याला कुणीच हात घालत नव्हतं. त्याच्या मैत्रिणीबद्दल जे ऐकलं होतं, ते खरं समजायचं, का मुलाने आमच्या मुलीला जे सांगितलं ते खरं समजायचं? काही समजत नव्हतं. मुलगा येईल आणि मग आपल्याला नीट काय ते कळेल म्हणून आम्ही खूप वेळ वाट पाहिली. पण तो राहूकालात सापडलेल्या सूर्यासारखा उगवलाच नाही. काळं तोंड घेऊन कुठे गायब झाला देव जाणे. मग मात्र आईबाप पडके चेहरे घेऊन आमची माफी मागायला लागले. हातापाया पडले. मुलगा तसा नाही, याची ग्वाही आत्तापर्यंत अनेकदा देऊन झालीच होती, पण तो काही शहानिशा करायला जाग्यावर नव्हता. मी म्हटलं, "माफी मागून आमचं झालेलं नुकसान भरून येणार आहे का? कॅनडातून दोनदा या सगाईपायी लंडनच्या वाऱ्या आम्ही केल्या, पैशापरी पैसा गेला, आणि वरती मूर्खपणा पदरात घेतला. मुलीला मनस्ताप झाला, आणि आमची सगळ्या सग्यासोयऱ्यांमधे नाककटाई झाली. तुमच्या करनकरी मुलाचा काय खेळ झाला देवाला ठाऊक. आमच्या निष्पाप मुलीला मात्र निष्कारण हा डाग लागला." शेवटी त्यांच्या घरातून आम्ही उठलो, आणि परतीच्या विमानात बसून घरी आलो. काय झालं, कसं झालं, आणि आमच्यासारख्या एकमार्गी कुटुंबाच्या वाट्याला हा भोग का आला, आम्हाला काहीही कळलं नाही. ही सोयरीक पुढे चालू ठेवण्यात अर्थ नाही हे कळलंच होतं. त्यांनी आम्हाला सगाईतून मुक्त केलं. आम्ही अक्कलखाती भरपूर नुकसान सोसून आणि दोनतीन आठवडे झोप नाहीशी करून, महागातलं शहाणपण शिकून परत आलो. आणि आता आमची अविनीता घर सोडून एकटी राहायला गेलीय. आमची बेटी आईबापांवर रुसली. आमच्या घरातली शान गेली. शांति गेली, रौनक गेली. पण मला सांगा, मी जे जे करायला गेले, जे जे तिच्यासाठी बऱ्या भावाने केलं, आणि तरीदेखील जे जे माझ्या हातून हरवलं गेलं, त्यात माझं खरंच कुठं काय चुकलं?

**असीम :**

आज घरात आईबाबा माझ्यावर भयानक रागावलेत, कॅनडातील अविनीता तर माझं नावदेखील शिवीसारखं त्याज्य समजते. आणि कहर म्हणजे माझी सलीमा पण माझ्याशी अबोला धरून बसलीय. सगळ्यांच्या अशा रागाला मी पात्र ठरलोय, आणि सगळ्यांचा अपराधी बनलोय. पण कुणीतरी मला नीट सांगेल का, की खरोखर, आहे ह्या परिस्थितीत मी जो मार्ग काढला, त्यात माझं काय चुकलं ? ज्या मुलीशी मला काडीचंही सोयरसुतक नाही, त्या कनेडियन मुलीला दाखवायला घेऊन ते लोक लंडनमधे आमच्या घरी आले. आमच्या मातोश्रींनी हा सगळा कट करून आधीच हे ठरवलं होतं, हे मला मुळीच माहीत नव्हतं. सबंध दिवस मी माझ्या कामात. आईच्या फोनांशी माझा काय संबंध ? आम्हां लोकांमधे सगेसोयरे भरपूर, आणि आल्यागेल्याचं अगत्यही भरपूर. घरात नेहमीच हे ना ते पाहुणे येत असतात. त्यातला वेगळेपणा मला कसा कळायचा ? ते लोक कॅनडाहून घरात आले त्या दिवशी मी योगायोगाने घरी होतोच, म्हणून माझ्या पुढ्यातच तो सगळा भेटीगाठीचा प्रसंग घडला. आईने भरपूर खाणंपिणं केलंच होतं, सगळ्यांनी त्याचा समाचार घेतला. मीही घेतला. घरात येणाऱ्या कोणत्याही माणसाशी जितके मॅनर्स पाळून आपण बोलतो, तसा मी त्यांच्याशीही बोललो. एवढ्या लांबून आले होते ! मुलगी बिचारी ठीकठाक होती. आणि घरात येऊन थडकलेल्या पाहुणेमंडळींचा अपमान कसा करायचा उगाच ? म्हणून मी आपला बसलो, बोललो तिच्याशीही. यात माझं काय चुकलं ?

पण तरी ते गेल्यावर मी आमच्या आईला नीट बजावून सांगितलं, की उगाच या मंडळींना आशा लावून ठेवू नकोस. मी त्यांच्या मुलीशी संसार तर नाहीच, पण लग्नदेखील करणार नाही. केलं लग्न तर सलीमाशीच. आणि तू किंवा बाबांनी नाही कळवलंत, तर मी स्वत: फोन करून कळवीन. पण आईबाबांना मी किती खंबीर आहे, त्याचा अंदाज नसावा. त्यांना वाटलं, असीमला आवडली तर आहे मुलगी, म्हणून तर सगळ्या भेटीगाठीत शांतपणाने बसला, बोलला. आता थोडे दिवस जाऊदेत. लग्न लागलं, की येईल आपसूक वळणावर. मग सलीमाला आपोआप डच्चू मिळेल. पण मला शांत कसं बसवणार ? तिकडे त्या मुलीला माझे फोन का येत नाहीत म्हणून चिंता लागलेली. एक नाही, दोन नाही,तीन दिवस ती मुलगी मला कॅनडातून फोन करून माझ्या मशीनवर निरोप ठेवत राहिली. मग मला काय करावं समजेना. मी तिच्या ऑफिसमध्ये फोन लावला, तेव्हा कळलं, की

आमच्या आईसाहेबांनी परस्पर तिला माझी पसंती कळवून ठेवलेली होती म्हणे. हे कळल्यावर मात्र मी बिथरलो. तिच्या आईबाबांना जे नीट समजेल, आणि त्याही मुलीला समजेल, असं बिनतोड कारण तिला सांगितलं पाहिजे, नाहीतर आपण आता चांगलेच गोत्यात येऊ, असं वाटल्यामुळे मी सरळ थाप मारली, की "बाई ग, तुझ्याशीच नव्हे, तर कुणाशीही लग्न करणं मला अशक्य आहे, कारण मी गे आहे." मनात म्हटलं, की हिला सांगितलेलं फक्त हिला आणि हिच्या आईबाबांना समजवायला पुरेसं कारण आहे. बाकी कोणाचा त्याच्याशी काय संबंध? शिवाय आपण आपल्या परीने आपल्यातच खोट काय आहे तेवढंच सांगितलं. तिच्यात तर काही दोष काढला नाही. हे तर चांगलंच केलं की आपण. आईबाबांनी सांगितलेलं मला आठवत होतं, की भारतामध्ये जर मुलगी किंवा मुलगा पसंत नसला, तर तसं स्पष्ट सांगून दुसऱ्याला दुखवणं चांगलं समजत नाहीत, त्याऐवजी फक्त 'पत्रिका जुळत नाही म्हटलं,' की काम भागतं. तसंच तर मी या मुलीशी वागायला गेलो. मी स्वतः गे आहे, असं मी सांगितलं, यात मी कोणाचं घोडं मारलं? आईबाबांनी मला जमेत न धरता हिच्याशी माझी सोयरीक ठरवून टाकली, ह्याबद्दल मी त्यांना दोष दिला नाही, की त्या मुलीच्या घरच्यांना दोष दिला नाही. फक्त एक बिनतोड कारण देऊन स्वतःवरच धार धरली. मग सांगा बरं, मी जाणूनबुजून जो हा मार्ग काढला, त्यात खरंच माझं काय चुकलं? त्या मुलीचं एक जाऊ दे, पण माझ्या सलीमानेसुद्धा माझ्याशी अबोला धरावा, असं खरोखर, काय मी चुकीचं वागलो?

सलीमा माझी लहानपणापासूनची मैत्रीण. तिच्या आणि आमच्या घरातल्यांना हे माहीत नव्हतं, असं नाही. बालपणापासून पोहायला आम्ही एकत्र जात होतो. आमच्या दोघांच्याही वाढदिवसाच्या पार्ट्या एकमेकांशिवाय घडत नव्हत्या. पण लहानपणी मैत्री केली तर चालते, आणि मोठेपणी त्या मैत्रीचे पर्यवसान प्रेमात झालं, आणि दोघांनी लग्न करायचं म्हटलं तर चालत नाही, या कर्माला काय म्हणायचं? सलीमा आणि मी एकमेकांना आणाभाका दिल्या, आणि मगच आईवडिलांना सांगितलं. आम्हाला वाटलं होतं, की आमच्या घरातून आम्हाला पाठिंबा मिळेल. पण दोनही कुटुंबांचा आमच्या दोघांच्या सगाईला कडाडून विरोध. आईबाबांचं म्हणणं आम्ही तुझ्यापुढ्यात पन्नास वधू आणतो. तू त्यातल्या वाट्टेल त्या मुलीशी लग्न ठरव, आम्ही ब्र काढणार नाही. पण मुसलमान मुलगी या घरात सून म्हणून चालणार नाही. सलीमाच्या घरातल्यांचा हाच प्रकार, फक्त ते मला 'काफीर' म्हणतात. बाकी वाक्ये तीच. तोच मूर्खपणा. दोघांपैकी कोणत्याच घरातल्यांना हे समजत नाही, की माझ्यात आणि सलीमाच्या विचारात, आचारात फारसा फरक मुळातच

नाही.  आम्हा दोघांच्याही डोक्यात तुमचे ते तथाकथित हिंदू आणि मुस्लीम या दोघांच्याही परंपरांतलं फारसं काहीही महत्त्वाचं शिरलेलं नाही.  आम्ही दोघंही जन्माने आणि आचारविचारांनी ब्रिटिश आहोत.  फिश अँड चिप्स, पोटॅटो क्रिस्प्स्, पबस्, आणि रॉक म्यूझिक यात आम्ही वाढलो.  आम्ही विचार करतो ते इंग्लिशमधून करतो.  चिंता करतो ती ब्रिटनबद्दल करतो.  प्रेम केलं तर ते या भूमीवर करतो.  भारत आम्हाला उपरा वाटतो.  बापजाद्यांचा देश असेल, पण आमचा स्वतःचा नाहीय.  तिथल्या परंपरा आम्हाला पुष्कळश्या बुरसटलेल्या, आणि काचणाऱ्या, कधीकधी हास्यास्पद वाटतात.  इथे देवळात किंवा मशिदीत गेलो नाही, तर आम्हाला चुकल्यासारखं वाटणार नाही, पण सॉकर मॅच चुकली, तर मात्र दुःख होईल.  असं असताना आम्हाला लग्न करायला विरोध करायचा, आणि कुठलीतरी गरीब बिचारी कनेडियन मुलगी केवळ जातवाली म्हणून परस्पर माझ्या गळ्यात बांधायचा घाट घालायचा, हे आईबाबांनी केलं ते योग्य झालं का ?  मग या प्रकारात मी बिथरलो, आणि त्या मुलीला वाट्टेल ते सांगून बसलो, तर माझं काय चुकलं ?  आणि झाला प्रकार सलीमाच्या कानावर घातल्यावर ती मलाच दुजोरा देईल, काय छान युक्ती काढलीस, म्हणून मला शाबासकी देईल, अशी अपेक्षा मी केली, तर त्यात तरी, सांगा पाहू, माझं खरंच काय चुकलं ?

**कोकिलाबेन :**

सगळ्यांनी माझं डोकं भंडावून सोडलंय, पण मला अजूनही समजत नाही, की या सगळ्या भयानक प्रकारात माझं नेमकं काय चुकलं ?  जो उठतो तो आपला मलाच दोष देतो.  घरवाला म्हणतो, तुझ्या लाडानंच मुलगा बिघडला.  आधी त्या मुसलमानाच्या मुलीशी लगीन लावायला निघाला, आणि आता होणारी सोयरीक टाळायला असलं हे चमत्कारिक कारण सांगून तीन देशातल्या सगळ्या जातवाल्यांमध्ये आमच्या नाकाला काळं फासून गेला.  मुलगा म्हणतो, तू फक्त बाबांच्याच बाजूने बोलतेस.  माझ्या मनाची तुला काहीच किंमत नाही.  मी सांगितलं त्या मुलीला, म्हणजे काय खरोखरच वागलो का तसा मी ?  सलीमाशी मी लग्न ठरवलंय, हे काय तुम्हाला माहिती नाही ?  मुलाचा रागही बरोबर आहे, आणि नवऱ्याचा वैतागही बरोबर.  पण माझं नेमकं काय चुकलं, म्हणून माझ्या वाट्याला ही सगळीकडून टीका आली ?  मुलीकडच्यांना तर वाटतं, की मी आपल्या नादान मुलाला पाठीशी घातलं, आणि त्यांच्या मुलीचा घात केला.  वारंवार माफी करा म्हटलं, तरी त्या

भारतीबेनला माझी कणव आली नाही. मला ताडताड बोलून मगच चालते झाले सगळे! गहजब नुसता! मीही एक आईच आहे ना! मला मुलगी नसली, तरी दुसऱ्याच्या गरीब बिचाऱ्या मुलीचा घात करावा, असं मला कसं वाटेल? ती मुलगी तर मला आवडलेली होती. घरात लक्ष्मी येणार म्हणून मी हरखले होते. पण आमच्या चिरंजीवाने अविचाराने जो घोळ घातला, त्यात बिचारी पोळून निघाली. तिचा तरी बिचारीचा काय दोष? त्या मुलीने पहिल्या खेपेला साखरबत्तासे खाल्ले माझ्या हातून, पण दुसऱ्यांदा आमच्या घरातून बाहेर जाताजाता मला तिने अशी काही नजर दिली, की मी मिठाची पुतळी असते, तर त्या नजरेत विरघळून माझं पाणीपाणी झालं असतं. पण खरोखर कितीही विचार केला, तरी मला कळत नाही, कदाचित कधीच कळणार नाही, की झालं या प्रकारात माझं काय चुकलं? तुम्ही माझ्याजागी असतात, तर तुम्ही काही वेगळं केलं असतंत का?

कराचीला माझा जन्म झालेला. फाळणीच्या वेळी आमच्या घरातल्यांनी जे जे म्हणून बघू नये ते सगळे अत्याचार बघितलेले. गाव सोडून निर्वासित होतांना ते तेवढी आठवणींची बोचकीच उराशी बाळगून भारतात शिरले. त्यांच्या त्या जळत्या आठवणींच्या धगीतच आम्ही वाढलेलो. भारत सोडून विलायतेत येऊन स्थायिक झालो, तरी लहानपणासून घरात बा आणि बापूंनी बोललेलं, ऐकलेलं काय विसरतां येतं का? बा आणि बापू म्हणायचे, की मुलीला देवळात सोडून द्या, विहिरीत ढकलून द्या, पण मुसलमानाच्या घरी देऊ नका, बेचाळीस पिढ्यांना नरकात पाठवू नका. एकवेळ मुलगा कुंवारा राहिला तरी चालेल, पण चुकूनसुद्धा मुसलमानाशी संबंध नको. आता हे सगळं ऐकूनदेखील विलायतेत आल्यावर मुसलमानांशी जवळून ओळख झालीच. कारण ते मुसलमान देखील आमच्याच सारखे स्वदेश सोडून या देशात येऊन शेजारीपाजारी वसले, तेव्हां मुलं शाळा शिकताना त्यांच्या आसपास मित्रमैत्रिणी त्या लोकांच्या पोरांमधून असणारच. त्याला आपण काय करणार? भारतातदेखील मुलंमुली सर्व धर्मांची एकत्र शिकतातच की. तेवढी तर तडजोड केलीच, पण एवढ्या सगळ्या इतिहासानंतर जाणूनबुजून त्या लोकांशी रोटीबेटीचे व्यवहार आपण लोक कसे करणार?

आमच्या कुलदीपकाला काय हे माहीत नाही? चांगलं माहीत आहे. सलीमा तुझी मैत्रीण राहूदे, पण सलीमाशी तुझी सोयरीक जमणं शक्य नाही म्हणाले मी ते त्याला कधी खरंच वाटलं नाही. त्याला वाटलं, की आत्तापर्यंत आईबाबांनी आपले सगळे लाड पुरवले. आत्तादेखील बोलतील, बोलतील, आणि मग तडजोड करतील. पण काही ठिकाणी तडजोड करता येत नाही, हे काय त्याला कळू नये का? सलीमाशी

तुझं लग्न होणं शक्य नाही, असं नुसतं म्हणून मी थांबले असते, तर मला दोष द्यायचा होता. पण मी काही त्याला कुंवारा राहायला सांगत नव्हते. मी माझ्या कर्तव्यात कुठे कसूर केली? चांगल्या घरातल्या बहूला घरी आणायला जे जे प्रयत्न करायचे, ते ते सगळे केले. हरप्रयत्न करून वेळ नीट जुळवली. मुलाने आधीच डोक्यात राख घालू नये म्हणून त्याला नकळत मंडळींच्या येण्याचा सगळा योग नीट जुळवून आणला. मुलीकडच्यांना घरी बोलावलं, चांगला पाहुणचार केला. पण या मुलाने असा घायकुतेपणा करून वाट्टेल ते तारे तोडून ठेवले, आणि मग माझ्यावरच सगळीकडून विजा कडाडल्या. घोळ घातला मुलाने, पण शेवटी खापर मात्र मुलाच्या आईच्या डोक्यावर फुटणार. मी लाडावून ठेवला म्हणे त्याला. पण आई म्हणून मुलाचे लाड पुरवण्याआधी मी ठाम मताच्या नवऱ्याची बायको, आणि घरातल्या मोठ्या मंडळींची सून पण होतेच ना! त्यांच्या, सगळीकडच्या अपेक्षा मला पुऱ्या करायच्या होत्या. मग खरंच सांगा, मी माझ्या कुटुंबासाठी, माझ्या मुलासाठी आणि त्या बिचाऱ्या सालस मुलीसाठीसुद्धा जे जे केलं, त्यात माझं खरोखर काय नेमकं चुकलं?

**सलीमा:**

आज तू मला नाकारलंस. माझ्या अस्तित्वावरच आघात केलास. मग मी तुझं नाव टाकलं तर माझं काय चुकलं? इतके दिवस मी समजत होते, की माझं आणि तुझं मन एक झालंय. माझ्या मनातलं सगळं तुला न बोलतां समजतं. आणि तुझं मला. म्हणून तर आपल्या आईवडिलांच्या जोरदार विरोधाला न जुमानतां मी तुझ्यावर विसंबून शांत राहिले होते. आपण कधीतरी नक्की लग्न करणार म्हणून वाट बघत होते. तुझ्या आईच्या बेतामुळे घरी तुझ्यासाठी सोयरीक आणली, हे कळूनदेखील मी तुझ्यावर विश्वास ठेवून चुपचाप काम करीत राहिले होते. पण परवां त्या मुलीच्या फोनवर तू जे काही तिला सांगितलंस, आणि नंतर निर्लज्जासारखं येऊन ते मारे कौतुकाने मलाही ऐकवलंस, त्यानंतर मात्र मला शांत राहणं अशक्य आहे. तू रागावला आहेस. तुला माझं वागणं समजत नाही असं तू मला सांगतोस. पण हे वाक्य तर खरं म्हणजे मीच म्हणायला हवंय. मी चिडायला हवंय. पण मी रागाऐवजी निराश झाले आहे. पुरुषाचं मन आपल्याला कधीच कळणार नाही, असं वाटायला लागलंय मला. भयानक एकटं वाटतंय मला आज.

खरं सांग, त्या तिऱ्हाईत मुलीला बाजूला करायला असलं चमत्कारिक खोटं बोलायची तुला काय गरज होती? माझं अस्तित्व नाहीसं दाखवून हे असलं चुकीचं

तिला कशाला सांगायला हवं होतं ? माझी काय तुला लाज वाटत होती का ? सरळ सरळ मी सलीमाशी प्यार करतो, मी तिच्याशी लग्न करणार आहे. असं त्या नव्या मुलीला सांगायला तुला काय शरम वाटली ? माझं नावदेखील न उच्चारतां 'आपण गे आहोत', असं धादांत खोटं तिला सांगताना तुझी जीभ थरकापली नाही ? त्या एकाच निष्फळ वाक्याने तू तिलाही नाकारलंस, आणि मलाही. ती तुझी कुणी नव्हतीच, पण मी तर होते ना ! मग का नाही मला अभिमानाने मिरवलंस ? का माझ्या सगळ्या अस्तित्वावर कफन ओढलंस ! का सलीमाशी ठरवलेल्या लग्नाच्या आणाभाकांना काही अर्थ नव्हता ? मग मला जर आतां तुझ्या या ढोंगीपणाचा, नाकर्तेपणाचा उबग आला, आणि मी तुझ्याशी अबोला धरला, आणि पुन्हा तुझ्या भानगडीत पडणार नाही, अशी शपथ घेतली, तर मला सांग, माझं काय चुकलं ?

**विद्युल्लेखा अकलूजकर**

**email - vidut@telua.net**

****************

# एक धीरोदात्त व्यक्तिमत्व : डॉ. विजया बापट



**गि**रिजा कीरांच "गाभाऱ्यातील माणसं" हे व्यक्तिरेखांच पुस्तक ज्यांनी वाचलं असेल त्यांना 'जी माणसं वयाच्या वेगवेगळ्या अवस्थांत, वेगवेगळ्या ठिकाणी आणि वेगवेगळ्या प्रसंगी त्यांच्या मनांत घर करून बसली त्यांचा हा जाणीवपूर्वक घेतलेला सुखद शोध आहे..' असं त्या पुस्तकाचं वर्णन करतात.

डॉ. विजया बापट यांचा परिचय लिहिताना मला तोच अनुभव येत आहे. डॉक्टरी व्यवसायांतून निवृत्त झाल्यानंतर त्यांच्या लिखाणास जास्त उभारी आली. गिरीजाबाई सारखीच निर्मळता आणि पावित्र्याच्या त्या उपासक आहेत. त्यांच्या लिखाणांत चांगल्याचा शोध आहे. वाईटाकडे दुर्लक्ष करून जीवनांतील 'सत्यम्-शिवं-सुदरम्' यांचे चिंतन करून वाचकाच्या मनाला स्पर्श करून जाण्याचा प्रयत्न आहे.

स्वतःच्या लिखाणाच्या हेतूबद्दल विजयाबाई म्हणतात, " माझ्या लिखाणाचा हेतू केवळ स्वत: त्यापासून मिळणारा आनंद अनुभवणे व आपल्याला कळलेले व भावलेले इतरांना सांगणे असा आहे. थोडक्यांत स्वतःच्या हौसेसाठी व समाधानासाठी त्या लिहितात." हा त्यांचा शुद्ध भावनिक व बौद्धिक आनंद आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी अंदमानच्या अंधारातही कविता कां लिहिल्या ? टिळकांनी कारागृहांत 'गीता रहस्य' कां लिहिले ? गांधीवधानंतर पु.भा. भावे तुरूंगात जाऊन बसले. पण त्यांचे "आदेश" मधील लिखाण चालूच होते. अत्रे सुद्धा महाराष्ट्राच्या चळवळीत तुरूंगात गेले. पण 'मराठा' मध्ये त्यांचे जहाल अग्रलेख येतच होते. लेखक लिहीतात ते बहुधा आत्मप्रगटीकरणासाठी, मिळणाऱ्या आनंदासाठी आणि निर्मितीचा आनंदही आणि निर्मितीचे दु:खही भोगण्यासाठी.

प्रत्येक लेखकाचे अनुभवक्षेत्र वेगवेगळं असतं. विजयाबाईंच्या बाबतीत ते डॉक्टरी व्यवसायांतील आहे. त्याचे पडसाद लिखाणांत पडणे सहाजिकच आहेत. पण यामुळेच त्यांच्या लिखाणाला वेगळी गहराई आली आहे असं मला वाटतं. मानवी आयुष्य गुंतागुंतीचं तर आहेच. अनेक प्रश्नांना आणि अनेक प्रसंगांना त्याला तोंड द्यावं लागतं. अशा या complex जीवनाचा अन्वयार्थ लावण्याचा लेखक प्रयत्न

करून राहिलेला असतो. जन्मा प्रमाणे मृत्यूचा ही अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न केला जातो. डॉक्टरी व्यवसायांत जन्म आणि मृत्यूचं निकटचं दर्शन डॉक्टरनाच होतं. विशेषतः पुरुषाला प्रसूती वेदना अथवा मूल जन्माला घालण्याचा आनंद समजू शकत नाही. स्त्री डॉक्टरला तिच्या व्यवसायांत आलेले अनुभव असाधारण, अकल्पनीय आणि वेगळ्या पातळीवरचे असतात.

आपल्या लिखाणातून कुणाला 'संदेश' वगैरे देणं विजयाबाईंना पसंत नाही. कारण त्यांच्या म्हणण्याप्रमाणे "जो तो आपली वाट शोधत असतो. आयुष्याच्या वाटेवर कुणाला मदतीचा हात देता आला व तसा हात मिळाला तर ते भाग्य. नवंनवं जाणून घ्यायचं. जे काही आपल्याला येतं ते दुसऱ्यांना द्यायचं. शक्य असेल तितका समाजकार्यासाठी वेळ द्यायचा. विंदानी म्हटल्याप्रमाणे, "देणाऱ्याने देत जावे घेणाऱ्याने घेत जावे I एक दिवस घेता घेता देणाऱ्याचे हात घ्यावेत ही मानसिकता लेखकाच्या अंगी यायला हवी. लेखकाच्या आयुष्यातून वा लिखाणातून काही संदेश मिळतोय कां हे वाचाणाऱ्याने ठरवावे."

मराठी भाषा आणि मायदेशाबद्दल बोलताना विजयाबाई हळव्या होतात. त्या म्हणतात, "मराठीची आणि मायदेशाची ओढ मायेची आणि कृतज्ञतेची आहे. कुठल्याही भाषेत आई 'आई'च असते. लिखाणामुळे त्या भाषेशी व मागील भावनांशी संबंध खचितच रहातो." ही मायदेशाची ओढ "गोष्ट अमेरिकेतील मराठीपणाची" या लेखांत स्पष्ट झालेली आहे. 'अंजनकांचन करवंदीच्या काटेरी देशा, बकुळीच्या प्राजक्तिच्या दळदारी देशा' अशा हळुवार शब्दांत त्या आपल्या देशाबद्दलच्या भावनेचं वर्णन करतात.

याच लेखांत परदेशांत मराठीपण कसं जपावं ह्या प्रश्नाचं उत्तर देताना त्या म्हणतात, "शक्यतो, दुसऱ्याचा दृष्टीकोन समजून घेत, सतत प्रयत्न करत, स्वतःवर नि पुढील पिढीवर विश्वास ठेवत मराठीपण जपता येईल. कदाचित कालपरत्वे बाह्य प्रतीकं बदलतील पण संस्कृतीतील मौल्यवान मूल्यं टिकतील, ती त्यांच्या अंगभूत सत्यानं, सौंदर्यानं अन् उपयुक्ततेनं. मूल्यांच्या सत्याची ओळख पटवणं हे आपलं कर्तव्य."

लेखकाच्या लिखाणांत आशय आणि भाषा यांत कुणाला दुय्यम स्थान असतं, असं विचारलं असताना डॉक्टर सहजच म्हणतात की, 'एक असतं दूध तर दुसरं असतं साखर. दोन्ही एकमेकांस पूरक असतात. सुंदर अलंकारीक भाषा वापरून पोकळ विधाने केल्यास ते मनाला भिडत नाही. त्याचप्रमाणे चांगले विचार नीट व्यक्त न करता आल्यास इतरांशी संवाद साधत नाही.' लेखनाच्या क्रियेला जाणता

आणि सहृदय वाचक फार उत्तेजन देऊ शकतो. लेखकाची ती संजीवनी असते.

मराठी भाषा टिकविण्यासाठी त्यांनी केलेल्या प्रयत्नांत प्रमुखत: गावांत मराठी रंगमंच सुरू करणं, "किलबिल कलाविष्कार" या सारख्या प्रयोगांतून मराठी मुलांना आपल्या साहित्याची व नाट्याची ओळख करून देण्याचा त्यांनी केलेला प्रयत्न. तसेच इंग्रजी व मराठी साहित्यांतील उत्कृष्ट पुस्तके मिळवून त्यांचे भाषांतर करून मराठी आणि अमेरिकन वाचकापुढे ठेवली आहेत. या पुस्तकांत "Breaking Points, Man's Search for Meaning and Prisoners of our Thoughts" ही भाषांतरीत पुस्तके वाचनीय आहेत. या शिवाय "Global Healing and Wild Swans" ही दोन पुस्तके प्रकाशनाच्या वाटेवर आहेत.

वरील ग्रंथसंपदे व्यतिरिक्त त्यांच्या कथा आणि लेख वाङमय शोभा, रूची, अस्मिता, रंगदीप, बृहन् महाराष्ट्र वृत्त, टकीला टकटक आणि शोध मराठीपणाचा, इत्यादी महाराष्ट्रांतील आणि अमेरिकेतील मासिकांत आणि वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांच्या आवडत्या मराठी लेखकांत रणजीत देसाई, दुर्गा भागवत, शिवाजी सावंत, पु.ल., आणि इंग्रजी लेखकांत जेम्स मिचनर, व्हिक्टर फ्रॅकल, टॉलस्टाय, युंग चॅग आणि आयान हर्सी अली यांचा समावेश होतो.

विजयाबाई मध्यप्रदेशांतील इंदूरकडच्या असल्यामुळे त्यांचा मराठी इतकाच हिंदी साहित्याचा अभ्यास सखोल आहे. प्रेमचंदांच्या कादंबऱ्या व महादेवी वर्मा यांच्या कथा आणि कादंबऱ्या त्यांच्या जास्त आवडीच्या आहेत. मराठी आणि हिंदी साहित्याचा दुहेरी वारसा त्यांना मिळालेला आहे. 'मेरा दावा' (२००२) आणि 'प्रवासिनीके बोल' (२००६) या दोन हिंदी कविता संग्रहांत त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. वडिलांकडून लहानपणी जे प्रोत्साहन मिळाले त्याची थोडीतरी पूर्तता त्या करूं शकल्या या बद्दल त्यांना अभिमान वाटतो.

डॉ. विजयाबाई यांच्या आणखीन एकदोन कथांचा उल्लेख करणे अनुचित होणार नाही. 'अशी नियत.. अशी दानत' (अस्मिता २००२) या कथेंत दोन व्यक्तिचित्रे एकत्र गुंफली आहेत. एक आहे बॅनर्जी मास्तरांचे आणि दुसरे डॉ. लांजेवार यांचे. ही दोन माणसे माणुसकी कशी जपून होते व तिचे परिणाम विजयाताईंच्या भावी आयुष्यावर नि:संदिग्धपणे कसे झाले, हे त्या अतिशय मोजक्या शब्दांत वर्णन करतात. 'अपराजिता' (अस्मिता २००४) ही कथा एक अभागिनीची आहे. ती आपल्या आईला पत्र पाठवून आपल्या आयुष्याची झालेली परवड सांगते. अमेरिकेत लग्न करून आलेल्या मुलीला कोणत्या अपमानित वागणूकीला तोंड द्यावे लागते आणि शेवटी नवऱ्याच्या जाचाला आणि अवहेलनेला

कंटाळून तिला घर कसे सोडावे लागते याचे हृदयद्रावक वर्णन वाचताना डोळ्यांत टिपे येतात. अशी ही परित्यक्ता, एका गॅसस्टेशनचा आधार घेते आणि तिथला गोरा मालक तिला कसा आसरा देतो हे वाचकाला स्तंभीत करून टाकते. या २१व्या शतकांतील स्त्री जीवनावर टाकलेला हा प्रकाशझोत, डोळ्यांवरची झांपड उठविल्याशिवाय रहात नाही.

डॉ. विजया बापट यांच्या सर्व लिखाणांत एक प्रकारची टोचणी, शल्य व काहीतरी हरवल्याची जाणीव असल्या सारखी वाटते. बहिणाबाईनं म्हटलं आहे :

" मन वढाय वढाय । उभ्या पीकातलं ढोर
किती हांकला हांकला । फिरी येतं पिकांवर..।।
मन पाखरू पाखरू । त्याची काय सांगू मात
आता व्हतं भुईवर । गेलं गेलं आभायात..।।

आणखी एका कवितेत बहिणाबाई म्हणते :

माझ्या माहेराच्या वाटे । जरी आले पायी फोड ।
पाय चालले चालले । अशी माहेराची ओढ ।।
माझ्या माहेराच्या वाटे । जरी लागल्या रे ठेचा ।
वाटेवरच्या दगडा । तुले फुटली रे वाचा ।।

आपल्या लहानपणाकडे पहाताना किंवा तरुणपणी कॉलेजांत शिकताना, त्यांनी जे अनुभवले जे आनंदाचे क्षण टिपले, त्याची सातत्याने त्यांना आठवण होत आली आहे. त्यामुळे डॉ. विजया बापट अद्यापही माहेरच्या वाटेकडे डोळे लावून बसल्या आहेत असा भास होतो वाचकाला. असं "मागं जाणं आणि मागं गेलेल्या आयुष्यांत डोकावणं" हे कित्येक लेखकांच्या बाबतीत घडलं आहे.

पुर्नभेटीचा हा आनंद न्यारा असतो.

विजयाताई चाळीसहून अधिक वर्षे अमेरिकेत आहेत. त्यांचा संसार येथेच फुलला-बहरला. मुले मोठी झाली, कर्तूत्ववान झाली. येथेच स्थिरावली. परंतु विजयाबाईंच्या मनाच्या अंधारांत कधीकधी भूतकालांतील आठवणी जाग्या होऊ लागतात आणि मनाची कासावीस होऊन अतर्क्य ओढ लागत असते. माणसाला भविष्य माहीत नसतं, वर्तमान तो भोगत असतो, पण भूतकाळ नेहमी आठवणींची

चित्रे डोळ्यासमोर आणीत असतो.

"आयुष्याच्या वळणावरती
मागे वळून पाहता क्षणभरी
अथांग आठवणीचा कुंभ
रीता होई समोरी......"

अशी त्याची स्थिती होऊन जाते.

साहित्याशिवाय सामाजिक प्रश्नासंबंधी त्यांचे विचार मूलग्राही आणि परखड आहेत. बदलत्या जगाबद्दल आणि पिढ्यापिढ्यांमध्ये होणाऱ्या बदलाबद्दल त्या म्हणतात, "जग व कालचक्र फिरतच असते. त्यात स्वत:ला संतुलीत करायची प्रेरणा असते. चांगले - अति चांगले झाले की, सावरकरांच्या शब्दांत 'सद्‌गुणविकृती' होते व वाईट अतिवाईट होऊ लागले तर बापाच्या पोटीच प्रल्हाद जन्म घेतो. त्यामुळे बदलत्या जगांत मला कधी अवघड वाटते खरे, पण त्याची काळजी वाटत नाही. पिढ्यापिढ्यांतील बदलाबद्दल बोलायचे तर तो व्हायलाच पाहिजे. न झालाच तर डबक्यांतील पाण्यासारखा समाज नासेल. प्रत्येक पिढीने आपल्या खडकावरून आपटत, आपल्या दऱ्याखोऱ्यांतून खळखळत, अडखळत आपली गहराई व आपला सागर शोधायचा असतो. मागची पिढी थोडे मार्गदर्शन करू शकते हे खरंय. पण आपला मार्ग प्रत्येकालाच शोधावा लागतो."

बदलत्या विश्वांतील स्त्रीयांचे हक्क आणि स्त्रीमुक्ती चळवळ यासंबंधी त्यांचे विचार ऐकण्यासारखे आहेत. जन्माने त्या जरी भारतीय असल्या तरी त्यांची कर्मभूमी अमेरिकाच आहे. ज्या डोळसपणे त्यांनी भारतीय स्त्री पाहिली, तिचे भोग पाहिले, तिचे दु:ख पाहिले, त्याच दृष्टीकोनांतून त्यांनी अमेरिकन स्त्रीचे जीवन जवळून पाहिलं आहे. एक स्त्री म्हणून आणि एक डॉक्टर म्हणूनही. स्त्री आणि स्त्रीमुक्ती चळवळ याबद्दल बोलताना त्या म्हणतात, "प्रत्येक व्यक्ति स्वतंत्र असावी असे ज्याला वाटते तो स्त्री मुक्ति वेगळी कशी करू शकेल ? स्त्रीयांवर अनेक शतकापासून बंधने लादली गेली आहेत. हल्लीची स्त्री बऱ्याच (सर्वस्वी नव्हे) अंशी आर्थिक दृष्ट्या पूर्वीहून अधिक स्वतंत्र आहे हे खरंय. पण मनाचे स्वातंत्र्य मिळविण्यासाठी तिला अजून बराच पल्ला गाठायचा आहे. तिला अजूनही स्वशक्तिची पूर्णत: ओळख पटलेली नाही. ती संकल्पना तिच्या मनोवळणी पडलेली नाही. त्यामुळेच की काय आपल्या सामर्थ्याचा विधायकरित्या उपयोग करण्यांत तिला पुरेसे यश आलेले नाही. तू तर स्वये सौदामिनी भिजलेली अमृतात. तेव्हां नुसतीच कोसळू नकोस. कोसळताना

आपल्या शक्तिने ज्योती जागवत जा, असे तिला सांगावेसे वाटते."

भारतीय स्त्री आणि अमेरिकन स्त्रियांच्या संदर्भात बोलताना डॉ. बापट म्हणतात, "स्वशक्तिची पूर्ण जाणीव नसल्यामुळे एक स्त्री दुसऱ्या कमनशिबी स्त्रीस आधार देण्यास अनेकदा सक्षम नसते असे मला वाटते. ते अजून तिला (व बऱ्याच पुरुषांना देखील) जमलेले नाही. अमेरिकन व भारतीय स्त्रीत असणारे फरक वातावरण निर्मिती वरवरचे व रीतीरिवाजांतील आहेत. मानसिक दृष्ट्या फरक आहे तो केवळ प्रमाणाचा."

अमेरिकेत सध्या "Gay and Lesbian Marriages" बद्दल बराच उहापोह चालला आहे. अनेक राज्यांत अशा लग्नांना कायदेशीर मान्यता मिळत आहे. पूर्वीचा जहाल विरोध आता बराच सौम्य झाला आहे. अशा समलिंगी लग्नाबद्दल सामाजिक दृष्टीकोनांतून आणि एक डॉक्टर म्हणून बोलताना विजयाताई स्पष्टपणे म्हणतात की, "जोपर्यंत एखादी व्यक्ति इतरांस त्रास देत नाही तोपर्यंत तिने कसे राहावे, हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. कोणीच इतरांचे आयुष्य जगू शकत नाही. त्यामुळे आपल्याला इतरांच्या आयुष्यांतील वना विहाराची किंवा खांचखळग्यांची अंतर्भूत माहिती नसते. त्यामुळे आपली मूल्ये इतरांवर लादणे अयोग्य आहे असे मला वाटते. समाजावर त्याचे काय परिणाम होतात, हे समाज त्यांना कसे वागवतो ह्यावर देखील अवलंबून आहे. आपले मन व्यापक केले तर ज्यास आपण "निराळे" म्हणतो, त्या व्यक्तिंत देखील अनेक अनमोल गुण असलेले आपल्याला आढळतील. जगांतील अनेक उत्तम कलाकार, राजकारणी पुरुष, तत्ववेत्ते व लेखक देखील समलिंगी होते व आहेत. कर्मठपणे वागल्यास समाज त्यांच्या योगदानास मुकेल. आधुनिक संशोधन हेच सांगतं की समलिंगी असणे ही निवड नसून ते आयुष्यांत पडलेले दान असते. तसेच ते संसर्गजन्य, अनुवंशिक अथवा अनुकरणाने अवलंबिलेले नसते."

मानवी मनाची परिपूर्ण उकल अतिशय हळुवारपणे त्या आपल्या सरळ प्रासादिक भाषेतून करतात. लेण्यांतून जशी कोरलेली, विविध प्रकारचे आशय व्यक्त करणारी शिल्पे असतात तशी शिल्पे त्यांनी आपल्या कथानकांत कोरली आहेत आणि ती विसंवादी न ठरता त्यांत एक विलक्षण सुसंबद्धता आणली आहे, संवाद साधला आहे. सातासमुद्राकडे येऊन त्यांनी इथल्या चालीरीती आणि वैशिष्ट्ये समजावून घेऊन त्याचे यथार्थ चित्रण आपल्या कथांतून केलं आहे.

डॉ. विजया बापट यांची वाटचाल आता अमृत महोत्सवाकडे चालू आहे. या कालांत अनेक लेखकांचा साहित्याचा सूर वेगळा होतो. साहाजिकच असतं ते!

विजयाताईंचा हा सूर ध्यानमग्नतेचा न राहाता, ध्यान धारणेचा आणि उज्वल भविष्याचा मागोवा घेण्याचा राहील याचा मला विश्वास वाटतो. विजयाताईंचे अनुभवविश्व क्षितीजापलीकडचे आहे. हा अनुभवांचा ठेवा पुढल्या पिढीला खचीतच मार्गदर्शक ठरेल आणि त्यांची मायभूमीची आणि मराठी भाषेची हांक नॉर्थ कॅरोलायनापासून ज्ञानेश्वर माऊलीच्या मंदीरापर्यंत पोहोचेल याची आम्हाला खात्री आहे. "जीवेत् शरद: शतम्. जीवेत् शरद: शतम्...!"

शब्दांकन : दिवाकर कारखानीस ह्युस्टन
email : dkarkhan80@gmail.com

# देवाचीये द्वारी

कर्मठ वातावरण नसले तरी माझ्या लहानपणच्या घरी निरनिराळे सण साजरे करण्याचा रिवाज होता.  काकुंच्या गौरीसाठी लागणारी पत्रपुष्पे गोळा करणे, त्यांच्या सहस्त्र शिवलिंग व्रतासाठी सुरेख शिवलिंगे बनविणे, काकडआरतीच्या दिवसांत पहाटे उठून थंडीत उनउन पाण्याने आंघोळ करुन देवळात जाणे, तेथील तूपात बूडवून तेवत ठेवलेल्या पितांबराच्या ज्योतीच्या उजेडात धूपाचा वास घेत काकड आरत्या म्हणण्यात सामील होणे, गणपतीच्या दिवसांत व्याख्याने, नाटके, गाणी साऱ्या सोहळ्यांत उत्साहाने भाग घेणे सारे सारे माझ्या आवडीचे होते.  सर्व मित्रपरिवार व नातेवाईकांकडे दिवाळीच्या फराळास व संक्रातीचा तीळगुळ खायला जाण्याची मजा काही और होती.  वडीलांच्या गंभीर आवाजातील गुरुचरीत्र व लघुरूद्र ऐकण्यात वेगळाच आनंद येत असे.  असा सारा सणवार, धर्मरीती चा धागा माझ्या जीवनाच्या धाग्याशी एकत्रीत गुंफला गेलेला आहे. तरीही मोठी झाल्यावर मी देवाला नमस्कार व अधूनमधून सत्यनारायणाची पूजा यापलीकडे अधिक काही धार्मिक कृत्य केलेले नाही.  माझ्या दूरच्या मावसआजीचे व्रत, "देवा, काम करत फिरते ती तुझी प्रदक्षिणा, सर्वांस करून वाढते तो नैवेद्य आणि दमून निजते तो तूला साष्टांग दंडवत" हे म्हणणे मनात रुजले. घरात कोणीही माझ्यावर कधी कशाची बळजबरी केली नाही.

तरूणपणी परदेशात आल्यावर काहीतरी राहून जात आहे असे वाटू लागले. सुरवातीला दिवाळीत आपल्याच एका दारासमोर दोन घरी बनविलेल्या 'पणत्या' लाव, मुलांना 'उटण्याने' आंघोळ घाल असे बारीकसारीक प्रयत्न करून पाहिले. तेव्हा येथे 'देशी' माणसे तुरळक प्रमाणातच होती.  तेव्हा तशा प्रयत्नांनी आनंद होण्याऐवजी अधिक उदास वाटे.  मुले, "ह्या चटणीसारख्या उटण्याऐवजी अत्तरच का नाही लावत ?" असे प्रश्न विचारायला लागल्यावर उटण्याबरोबर त्या प्रयत्नांसही तिलांजली दिली.  येथे मिळत असलेल्या सामानातून 'आपले' जेवण बनविण्याचा प्रयत्न करुन केलेले पोटपूजेचे प्रयत्नच फक्त शिल्लक राहिले.

बघता बघता वर्षे उलटली.  काही नवे काही जुने करीत संसार झाला.  आता येथे येणाऱ्या, 'आपल्या' माणसांची संख्या खूपच वाढली आहे.  सारे भारतीय सामान येथे मिळू लागले आहे.  अस्सल भारतीय जेवणात नव्याने येणाऱ्या नववधूंनी हौसेने

केलेल्या व्रतवैकल्यांची भर पडत आहे. आता श्रावणमासातील हळदीकुंकू, दहा दिवसांचा साऱ्या सोहळ्यासह साजरा केलेला गणपती, दिवाळी, जन्माष्टमी सारे काही येथे साजरे केले जाते. दरवर्षी अमेरिकेत बांधल्या जाणाऱ्या मंदीरांची संख्या वाढत आहे. आणखी एक भारत येथे निर्माण होत आहे. बरे वाटते.

पूर्वी येथे आलेल्या भारतीयांची वये पण वाढत आहेत. त्याबरोबर येणारे जीवनातील खाचखळगे, चढउतार सारे अनुभवास येत आहे. अनेकदा, विशेषत: सत्वपरिक्षेच्या वेळी काही उणीवा देखील जाणवताहेत. येथे जुळविलेली, जमविलेली जिव्हाळ्याची नाती आहेत. पण ते नातेवाईक नाहीत अन् असले तरी त्यांच्यावर आपला भार टाकण्यास मन कचरते कारण नव्याने येथे रुजविलेल्या त्यांच्या रोपट्याचे मुळ देखील अजून काहिसे अस्थिर आहे, त्यांना त्यांची ओझे वाहायची आहेत ह्याची जाणीव बहुतेकांना असते. एकत्र कुटुंबपद्धती भारतात सुद्धा खिळखिळी होतेय. येथे तर ती अल्पांश घरांतच आढळते. औद्योगीकरण अन् जागतिकरणाच्या वाढीमुळे, "पोटासाठी दाही दिशा, आम्हा फिरविसी जगदीशा" असे म्हणत घराघरातील अनेक बायकापुरूष अक्षरश: जगप्रदक्षिणा करताहेत. मिळणाऱ्या पैशात वाढ झाली की आपल्याला इतरांची गरज असते ह्याची जाणीव विरळ होऊ लागते. तशात लागेबांध जुळविण्यास लागणारा वेळ उपलब्ध नसतो. एकमेकांना प्रसंगी हाक घालायची, त्यांच्या हाकेस न कचरता धावून जायचे ह्या सवयी विरत जातात. तशात मादकद्रव्याधिनता, एकलेपणा असे विघातक प्रभाव भोवती आढळतात. सामाजिक बंधनांची शिथिलता असते. "सांभाळ बरं" असे हक्काने सांगू शकणाऱ्या माणसांचा अभाव असतो. अनेकदा आयुष्यावरील आपला ताबा सुटत चाललाय की काय असे वाटू लागते. अर्थातच येथे चांगले काही नाहीच असे मला मुळीच म्हणायचे नाहीये. शिकण्यासारखे व सुखवस्तु जीवनास आवश्यक असे वाटणारे बरेच काही येथे आहे म्हणून तर अजूनही सारे येथे येण्याचा अट्टाहास करताहेत.

अमेरिकेत रेडक्रॉस सारख्या सार्वजनिक संस्थाची प्रथा पूर्वापार चालत आलेली आहे. आप्तकाली त्यांचा उपयोग करून घेण्याची येथील समाजास सवंय आहे. तसेच सरकारी सहाय्यक योजना आहेत, चर्च सारख्या धार्मिक संस्थात समाजकार्य करण्याची रुढी आहे. त्यामुळे समाजाचे सारे प्रश्न सुटत नसले आणि त्यांच्या प्रयत्नात काही दोष व त्रुटी असल्या तरी त्यात सहाय्य करण्याचा प्रयास नक्कीच आहे. भारतात देखील माधूकरी, विद्यार्थ्यास वार लावून जेवू घालणे. पाणपोई, धर्मशाळा, आश्रम अशा अनेक संस्था, प्रथा व रुढी होत्या. त्यांच्या आधाराने वर आलेल्या अनेक माणसांची उदाहरणे बहुतेकांस माहित आहेत. परंतु भारतात

देखील हल्ली त्या प्रथा बंद पडत चालल्या आहेत व नव्या चालीरीतींनी अजून त्यांची जागा पूर्णपणे भरून काढलेली नाही. परदेशस्थ भारतीयांसाठी तर फार थोडे मार्ग उपलब्ध आहेत. बऱ्याच अंशी त्यांची स्वतःची मानसीक जडणघडणही त्यांना अडचणीतून मार्ग काढण्याच्या आड येते. परदेशगमन करणारी माणसे बहुधा स्वावलंबी व धडपडी अशी असतात. "मला अडचण आहे, मदतीचा हात हवा आहे" असे म्हणणे त्यांना अपमानास्पद वाटते, फार जड जाते. विशेषतः ओळखीच्या यशस्वी झालेल्या माणसांपुढे हात पसरणे त्यांना लज्जास्पद होते. अडचण आली म्हणजे स्वतःत काही कमी असले पाहिजे असा न्युनगंड त्यांना भेडसावतो. ह्यातील बरीच माणसे आपल्या भारतातील घरच्या माणसांना देखील अडचणींचा पत्ता लागू देत नाही. "ही परिस्थिती घरी कळली तर माझ्या बहिणीचे लग्न जमण्यात अडचण येईल", "माझ्या आईवडलांना त्रास होईल" असे विचार त्यांना भेडसावतात. लोक काय म्हणतील हा बागुलबुवा असतोच. त्यामुळे अनेकदा, जे मदत करु शकतात त्यांना अडचणीत असलेल्यांच्या परिस्थितीची कल्पनाच नसते. मग हिंसाचारामुळे अमक्याच्या बायकोचा खून झाला, मानसिक रोगामुळे तमक्याने आत्महत्या केली अशा बातम्या कानी आल्यावर हळहळणे एवढेच त्यांच्या हातात उरते. कधी कधी त्यांची प्राशैक्षणीक, आर्थिक, मानसिक क्षमता इतरांस मदत करण्यासाठी अपुरी पडते. रस्त्यात भेटल्यावर, नोकरी गेल्यामुळे नजर टाळीत असलेले कुणाचे डोळे, कुणाच्या अंगावरील माराचे वण समोरच्यास बरेच काही सांगून जातात पण "कसे विचारू ? त्याला किंवा तीला आवडेल का, माझ्याकडून मर्यादेचे उल्लंघन तर नाही होणार ?" असे विचार भेटणाऱ्यास भेडसावतात. भारतात आपल्या कुटुंबीयांसाठी थोडे पैसे पाठविणे, कुठल्यातरी समाजकार्यास हातभार लावणे अशी कामे बरेचजण करीत असली तरी देखील वर उल्लेखलेल्या अनेक कारणांमुळे, येथे रहाणाऱ्या देशबांधवास मदत करणे त्यांना नेहमीच शक्य होत नाही.

येथे असलेल्या संस्थांकडून ती माणसे मदत का मागीत नाही असा प्रश्न तुम्ही विचाराल. हा प्रश्न बरोबर असला तरी त्याचे उत्तर गुंतागुंतीचे आहे. येथील संस्थांतून मिळणारी मदत भारतीयांस रूचणारी असेल ह्याची खात्री देता येणार नाही. ह्याचे एक उदाहरण देते. नवऱ्याकडून होणाऱ्या त्रासाने व मिळणाऱ्या माराने गलीतगात्र झालेली एक भारतीय तरूणी येथे असलेल्या 'स्त्री संरक्षण संस्थेत' (शेल्टर होम) आश्रयाला गेली. तेथील कार्यकर्तीचा आमच्यापैकी एकीस, 'ही बाई मुळीच जेवत नाहीये ह्याचे कारण काय असावे ?' अशी विचारणा करणारा फोन आला. (त्या कार्यकर्तीस केवळ योगायोगानेच आम्ही भारतीय असल्याची माहिती

होती.) अधिक चौकशीअंती तेथील अन्न मांसाहारी असल्याने शाकाहारी बाई ते जेवण जेवू शकत नसल्याचे समजले. (नंतर तीच्या नवऱ्याच्या धमक्यांस भीक न घालता काही भारतीयांनी तीला आपल्या घरी ठेऊन काही दिवसापुरती तरी तिची व्यवस्था केली.)

अशी उदाहरणे पाहिल्यानंतर प्रश्न पडतो तो हा की परदेशातील मंदीरांची वाढती संख्या लक्षात घेता त्यांचे कार्य काय असावे? रूढीनुसार कुणाच्या घरी सत्यनारायण, कुठे वास्तुशांती, अन् कुठे अंत्यसंस्कार सुद्धा, केल्याने त्या त्या माणसांस बरे वाटते हे खरेय. ती देखील एक वैयक्तिक व मानसीक गरज असतेच. सर्वांनी मिळून देवळात जमून गणेशोत्सवासारखे सोहोळे साजरे करण्यात आनंद मिळतो हे देखील सत्य आहे. परंतू ह्यापलीकडेही दृष्टी टाकत आपल्या परदेशस्थ समाजात भारतीयांनी येथे बांधलेल्या देवळांचे स्थान काय आहे, काय असावे?

येथील ख्रिश्चनांची चर्चचेस, ज्यु लोकांचे सिनेगॉग ह्यांचे काम पाहिले, आपल्या सभासदांच्या 'पाळण्यापासोन ते ताटीपर्यंतच्या' आयुष्यातील त्यांचा कार्यभाग पाहिला की येथे शिकण्यासारखे बरेच काही असल्याचा प्रत्यय येतो. इतर धर्मांप्रमाणेच ह्या धर्मातील कुरीती, त्यांची राजकीय दुष्कृत्ये ह्याची मला कल्पना आहे. ह्या लेखात मी आपल्याला शिकण्याजोगे त्यात काय आहे ह्यावरच भर देणार आहे. त्याला कारणे देखील तशीच आहेत. काही वर्षापूर्वी येथे दोन भारतीय घटस्फोटीत स्त्रीयांना आपल्या समाजाकडून काहीही मदत मिळाली नाही. उलट त्यांना 'वाळीत टाकल्यासारखा' अनुभव आला. चर्च नी त्यांना संकटकाळी धावून मदत केली आज त्या दोघींनीही ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याचे कळले. अशा प्रसंगावरून आपल्याला काही धडा घेता येईल का हा प्रश्न मनाला भेडसावत राहिला. उच्चतम तत्त्वे असलेल्य हिंदू धर्मावरील आपले प्रेम हे अक्षम, आंधळे प्रेम न राहता येथील आजच्या परिस्थितीस तोंड देता येण्यासाठी त्याला सक्षम व कार्यरत करावयास हवे असे वाटू लागले.

माझ्या अमेरिकेतील गावात 'सेंट मायकलस् चर्च' नावांचे चर्च आहे. त्यांचा 'स्वयंसेवक गट' नावांचा प्रकल्प आहे. माझी अत्यंत सुसंस्कृत, हुशार, उदारमतवादी व धार्मिक विचारांची अमेरिकन मैत्रिण त्या प्रकल्पाची प्रमुख सूत्रसंचालक आहे. तिच्याकडून थोडक्यात त्या प्रकल्पाचे वर्णन जाणून घेतले ते असे. चर्चमध्ये येणाऱ्या प्रत्येक सभासदाच्या गरजा भागवल्या जाव्यात असा तिच्या प्रकल्पाचा उद्देश आहे. दरवर्षी साऱ्या सभासदांस स्वयंसेवक व्हायचे आहे का अशी विचारणा केली जाते. होकारार्थी उत्तर देणाऱ्यांची एक यादी करण्यात येते. यादीत प्रत्येक स्वयंसेवकाच्या नावापुढे त्याची, किंवा तीची कोणते काम करण्याची तयारी आहे व सभासद

आठवड्यातून किती तास स्वयंसेवकाच्या कामासाठी देऊ शकतो त्याची नोंद केली जाते.  ही कामे, आजारी माणसांस जेवण नेऊन देणे, त्याचे घर साफ करण्यास मदत करणे, त्याला डॉक्टरकडे घेऊन जाणे, एकटे रहात असणाऱ्या वृद्ध व्यक्तिच्या घरी जाऊन काही तास त्याला वाचून दाखवून अथवा त्याच्याशी गप्पा मारून त्याची सोबत करणे, त्याला महिन्याची 'बीले' भरण्यास मदत करणे, अपंग मुलाची काळजी घेणाऱ्या आईस हातभार लावणे, वार्धक्याने थकलेल्या माणसास त्याच्या घरातील लहानसहान गोष्टी दुरुस्त करून देण्यास मदत करणे अशा प्रकारची असतात. प्रसंगी व्यक्तिस लागणारी मदत करू शकणाऱ्या सरकारी अथवा खाजगी संस्थांची माहिती देऊन सभासदाचा त्या विशिष्ठ संस्थेशी संपर्क साधून देण्यास मदत करणे अशी कामे देखील स्वयंसेवक करतात.  चर्चतर्फे स्वयंसेवकाची चांचणी केली जाऊन ती चांगली वागणूक असलेली व सुरक्षित व्यक्ति असल्याची खात्री केली जाते. स्वयंसेवकास, त्यांचे काम करण्यास लागणारे प्रशिक्षण दिले जाते.  ती व्यक्ति चर्चची सभासद असल्याने त्याच समाजाचा एक घटक म्हणून बहुधा सर्वांच्या माहितीची असते.  ह्या काम करत असलेल्या स्वयंसेवकास पगार मिळत नाही परंतु महाविद्यालयात प्रवेश मिळविताना त्यांना त्यांनी केलेल्या सेवेनुसार विशेष क्रमांक दिले जातात.  तसेच चर्चकडून त्यांनी केलेल्या कामाचा सार्वजनीक रीत्या सन्मान केला जातो.  इतरांना मदत करताना स्वतःच्या मनास मिळणारे समाधान, नवीन गोष्टी करताना मिळविलेले नैपुण्य वगैरे इतर "मानधन" असतेच.

सूत्रसंचालकाचे काम सभासदांनी गरज दर्शविण्यास केलेला फोन घेणे, योग्य ती मदत करु शकणाऱ्या मदतीची गरज असणाऱ्यांशी संपर्क साधून देणे, मदत नीट मिळाली का नाही ह्यावर लक्ष ठेवणे, प्रत्येकाने 'दान केलेल्या कामाच्या तासांची' नोंद ठेवणे, चर्चकडून कामासाठी लागणारी साधनसामुग्री जमविणे, एकंदर काम प्रकल्प सुरळीतपणे चालला आहे का नाही ते पाहणे, व स्वयंसेवकास आधार देणे असे असते. अर्थातच सूत्रसंचालकास देखील पैशात मोबदला दिला जात नाही. ह्या प्रकल्पात अडचणी आल्यास त्याची चर्चच्या अधिकाऱ्याबरोबर चर्चा करुन ती निवारणाचा मार्ग आखला जातो. मदत घेणाऱ्याची गरज भागली गेली का नाही ह्यावर लक्ष दिले जाते. अर्थातच प्रत्येक सभासदाची प्रत्येक गरज भागविणे शक्य नसते पण ह्या पद्धतीने सभासदांस 'एकमेकांचे जीवन सुखी करण्यास' मदत होते हे निश्चित.

अशा कार्यामुळे प्रत्येक सभासदास चर्च म्हणजे आपल्या घराचा, आपल्या आयुष्याचा एक अविभाज्य घटक आहे असे वाटण्यास मदत होते.  प्रत्येकजण पाळीपाळीने एकमेकांस मदत करण्यास तयार असल्याचे आढळून येते.  आपली

गरज भागल्यावर गरजू स्वयंसेवक बनण्यास उद्यूक्त होतो. मदतनीसांची एक साखळी तयार होते. गरजेच्या वेळी चर्चकडून मदत मागण्यास कुणासही संकोच वाटत नाही. वाटणाऱ्या कृतज्ञतेमुळे अनेकांकडून मिळणाऱ्या चर्चच्या हुंडीतही भर पडलेली दिसते.

शीख धर्मातही काहीशी अशीच प्रथा आहे. 'कुणाही शीख माणसास आम्ही उघड्यावर पडू देणार नाही' हे त्यांचे तत्व. प्रसंगी गरजूस गुरूद्वारात राहाण्यास जागा देऊन, पाळीपाळीने गुरूद्वारात स्वयंसेवक म्हणून जाऊन; स्वयंपाक, वाढप, स्वच्छता राखणे अशासारखी कामे करून आणि रोज दाराशी आलेल्या उपाशी माणसांस मानाने जेऊ घालून (लंगर) ते आपले तत्व जोपासतात. माणसाची सेवा हीच देवाची सेवा असा त्यांचा विश्वास आहे.

हिंदू तत्त्वज्ञान उच्च (कदाचित सर्वोच्च देखील) विचारसरणी उद्बोधीत करते हे खरंय. परंतु एकविसाव्या शतकात आपले सभासद संघटीत करणे त्यांना जमले नाही तर ती विचारसरणी टिकून राहील का ? जागतीकरणाच्या काळात हिंदू जगभर विखुरले असून देखील हिंदूधर्म किंवा सनातन धर्म केवळ अर्ध्यामुर्ध्या भारतातच तग धरून राहिला आहे असे का ? आमचा धर्म हजारो वर्ष टिकला आहे तसाच तो आपल्या गुणाच्या जोरावर पुढेही टिकून राहील अशी केवळ भाबडी आशा ठेवून चालणार आहे, का त्यासाठी आजच्या गरजेस ओ देऊन काही वेगळे करणे जरूरी आहे ? धारयती या सा धर्मः हे लक्षात घेऊन मंदीरांच्या विशेषतः भारताबाहेरील देवळांच्या कार्यात काही बदल करण्याची गरज आहे का ? खाली दिलेल्या काही गोष्टी भारताबाहेरील मंदीरात करता येतील का ? प्रश्नच प्रश्न, अन् काही सुचलेली उत्तरे देखील!

..देऊळ बांधताना तेथे ३ ते ४ लहान पण स्वच्छ नीटनेटक्या खोल्या बांधून तेथे सभासदास अडचणीच्या दिवसांत निदान काही दिवस तरी (तीस ते नव्वद दिवस) विनामुल्य, सुरक्षीतपणे राहाता येण्याची व्यवस्था करणे.

...देवापुढे वेगवेगळ्या प्रकारचे खाद्यपदार्थ ठेवण्याच्या प्रथेत थोडासा बदल करावा का ? गहू, तांदूळ, मूग डाळ, चणाडाळ, फळे अशा तऱ्हेचे ठराविक धान्य व फळफळावळच देवापुढे ठेवण्यात यावीत व ती साठविण्यास लागणाऱ्या स्वच्छ कोठ्या देवासमोर ठेवाव्या. सर्वांना ठरावीक कोठ्यात धान्य ठेवण्यास विनंती करावी. हे सामान वापरुन स्वयंसेवकानी दररोज साधा पण ताजा शीधा तयार करावा, गरजूस तो सन्मानाने वाढावा किंवा बुफे पद्धतीने त्यांच्यासाठी मांडून ठेवावा.

...धार्मिक सोहळ्या व्यतिरिक्त वैद्यकीय, वकीली, सोशल सर्व्हिस, इमीग्रेशन

वगैरे विविध प्रकारचे सल्ले देऊ शकणाऱ्या प्रवीण सल्लागारांनी नियमितपणे आपला काही वेळ देवळात चर्चासत्रे चालविण्यास द्यावा. उदाहरणार्थः येथील अनुभवांस सक्षमतेने तोंड देण्यासाठी लागणारी माहिती देण्यास, जीवनातील अडचणीस सामना करताना आलेले प्रश्न सोडविण्यास मदत करण्यास, येथे उपलब्ध असलेल्या सवलती सोयी व सामाजिक सेवा करणाऱ्या संस्थांची माहिती देण्यास, भारतीय पद्धतीने उत्तरक्रिया करण्यासाठी लागणारी माहिती देण्यास, भेटीस आलेल्या आईवडीलांना लागणारी तात्पुरती मर्यादित स्वरुपाची वैद्यकीय मदत अथवा सल्ला देण्यास, मादक द्रव्याधीनता, बालसंगोपन, आणीबाणीच्या प्रसंगी लागणारी वैद्यकीय मदत देण्याचे प्रशिक्षण देणे (उदाः बुडत्यास कसे वाचवावे, जेवताना घास घशात अडकून तडफडत असलेल्यास, हृदय बंद पडलेल्यास, आकडी आलेल्यास, अपघातात दुखापत झालेल्यास कशा प्रकारे मदत करावी.), भारतीयांच्या वृद्धावस्थेतील गरजा व त्यांचे निवारण, घरगुती कलह वगैरे विषयांवर चर्चासत्रे चालविण्यास ह्या सल्लागारांचा उपयोग व्हावा. सुदैवाने परदेशस्थ भारतीय समाजात तज्ज्ञांची वानवा नाही. त्यात समाजोपयोगी काम करण्याची इच्छा असलेले देखील अनेक लोक आहेत. त्या सर्वांचे योजनाबद्ध संघटन करणे मात्र आवश्यक आहे. तसे केल्यास येथील आपल्या समाजास फायदा होईल. एवढेच नव्हे तर परदेशातील आपले स्थान बळकट होण्यास मदत होईल.

..याव्यतिरीक्त दवाखान्यात असलेल्या व्यक्तिच्या भेटीस जाणे, त्यांना रुचेल असे (त्यांच्या पथ्यात बसणारे) जेवण दवाखान्यात नेऊन देणे, त्यांच्या नातेवाईकांस आधार देणे अशी कामे स्वयंसेवक करु शकतील.

..अर्थातच वरील यादी सर्वसंपूर्ण नाही. गरजेनुसार त्यात बदल करणे योग्यच होईल. स्वयंसेवक हे आपापल्या कामात निष्णात आहेत का, त्यांची वैयक्तिक जडणघडण कामास अनुरुप आहे का हे सारे बघून पारखून घ्यावे लागेल. स्वयंसेवकांस प्रशिक्षण देणाऱ्या अनेक संस्था आहेत. त्यांची मदत घेऊन स्वयंसेवकास आवश्यक ते प्रशिक्षण देता येईल.

...वरील गरजांबरोबर सहली, बालविहार, हास्यक्लब, योगाचे वर्ग, भारतीय कलाशिक्षण, कॅरम व बुद्धिबळ यासारख्या खेळांसाठी वर्ग व स्पर्धा असे करमणूकीचे व आनंददायी कार्यक्रम नियमितपणे देवळात आयोजीत केले जावे. भारतीय भाषा शिकविणारे वर्ग चालवावे. सांगण्यास आनंद वाटतो की ह्यातील काही उपक्रमाची सुरूवात झालेली आहे. एकमेकांकडून शिकत अनेक ठिकाणी अधिकाधिक उपक्रम सुरू करण्यासाठी ह्या यादीची मदत व्हावी.

अशा तऱ्हेने पाळणा ते ताटी पर्यंतच्या आयुष्यातील साऱ्या टप्प्यांवर देवळाचा उपयोग झाला तर ते देउळ आपले वाटेल, देवळाच्या परिसरात आयुष्यातील अनेक कार्ये, 'करमुले तु गोविंद' ह्या पायावर आधारीत करता आली तर हल्लीच्या धावत्या जीवनात अनुभवास येणाऱ्या ससेहोलपाटीत क्षणभरासाठी तरी 'विसाव्याचे स्थान' निर्माण करता येईल.

ह्या साऱ्यासाठी लागणारा पैसा कोठून आणायचा हा प्रश्न उद्‌भवणे सहाजीकच आहे. सल्लागार विनावेतन काम करतील. किरकोळ साधनांसाठी लागणारा पैसा देवळाच्या हुंडीतून ह्या कामासाठी काढून ठेवावा. (ह्या उपक्रमामुळे हुंडीत वाढ होण्याच्या शक्यतेचा, तसेच देवापुढे ठेवलेल्या 'खाद्यपदार्थाचा सुयोग्य उपयोग' हा विचार लेखात इतरत्र मांडला आहेच).

ह्या साऱ्यासाठी देऊळच कशाला हवे असा प्रश्न उद्‌भवणे सहाजीक आहे? ह्याचे उत्तर माझ्यामते तरी खालीलप्रमाणे असेल. भारतीयांना परदेशात आपले असे विसाव्याचे स्थान निर्माण करायची गरज भासत आहे. म्हणूनच येथे स्थापन केल्या जाणाऱ्या मंदिरांची संख्या वाढत आहे. सध्यातरी बऱ्याच ठिकाणी त्यांचा उपयोग सोहाळे साजरे करणे व धार्मिक कर्मे करणे, भारतीय कलाप्रदर्शन व कलावर्धन करणे ह्या पुरता मर्यादित आहे. काही ठिकाणी वर उल्लेखिलेल्या उपक्रमातील काही उपक्रमांची सुरूवात झाली आहे. मात्र 'जितनो मत तितनो पथ' अशी विचारसरणी असलेल्या परदेशस्थ भारतीय समाजात, काहीतरी आकृतीबंध निर्माण करण्यासाठी, त्यांच्या विशिष्ठ गरजा भागविण्यासाठी काही सुसूत्रता असलेल्या संस्था निर्माण करण्याची गरज आहे. मंदिर हे एकत्र येण्याचे ठिकाण, एक मान्यवर संस्था आहेच तेव्हां त्यांचा अधिक चांगला उपयोग का करुन घेऊ नये? प्रत्येक समाजास त्याची आपली एक ओळख असते. मंदिर हा हिंदूंच्या अस्मितेचा एक भागच आहे मग त्याच्या उपयोगास हरकत का असावी? अर्थातच वरील साऱ्या लिखाणात कुठेही इतरांना वगळण्याचा हेतू नाही. मंदिरास भेट देणाऱ्या व त्याला आपले म्हणू पाहाणाऱ्या कुणाचेही स्वागतच व्हावे. भारतीयांशी रोटीबेटी व्यवहार करीत असलेले अनेक अभारतीय मंदिराच्या कार्यक्रमात सहभागी असतात व ते तसेच रहावे. ह्या लेखात मंदिराच्या वास्तुचा 'आपलेपणा' वाढविण्यास उपयोगी पडणाऱ्या सोयींचा, परदेशात वेचलेल्या काही विचारफुलांचा आढावा घेतला आहे एवढेच.

ओळखींच्या व्यक्तिसमोर हात पसरण्यास अनेकदा संकोच वाटतो. दिल्याघेतल्याचा नकळत हिशेब होतो. संबंध गढुळतात. वरील उपक्रमात तो संकोच रहाणार नाही. सल्ल्यातील नैपुण्य व त्यामुळे असणारे त्याचे मोल वाढेल.

आज मदतीची गरज असणारी व्यक्ति उद्याची सल्लागार बनण्यास उद्युक्त होईल. ज्यांना पैशानी मदत करणे शक्य नसेल ती स्वच्छता राखणे, परिसरात फुलझाडे लावणे, व्यवस्था राखण्यास मदत करणे अशी अनेक कामे करुन देवळास मदत करु शकतात. त्यामुळे देवळाबद्दलचा आपलेपणा वाढून त्यातील हुंडीत भर पडेल. धर्मो रक्षती रक्षतः अशी परिस्थिती निर्माण होण्यास मदत होईल.

डॉ. विजया बापट
**email - bapatvijaya@gmail.com.**
'एकता'च्या सौजन्याने

************

## प्रत्ययकारी साहित्यिक दांपत्य :
## श्री दिलीप आणि सौ. शोभा चित्रे



**श्री.** दिलीप चित्रे आणि सौ. शोभा चित्रे हे दांपत्य वॉशिंग्टनच्या परिसरात गेली चाळीस वर्षे वास्तव्य करून आहेत. नुसतेच वास्तव्य करून नव्हेत तर अनेक चैत्र उन्हाळे पाहूनही, दरवर्षी अमेरिकन "स्प्रिंग" मधल्या नव्या पालवीने बहरणारे हे चिरतरुण "आनंदाचे झाड" आपुली अभंग नाती जपत डोलत आहे, हसते आहे आणि टवटवीत राहून 'जगते' आहे.

दिलीप मुळचे बडोद्याचे पेशाने 'आर्किटेक्ट' , पण त्यांचा पिंड आहे अस्सल कलावंताचा. त्यातून त्यांना श्री. माधव आचवलासारखा गुरू भेटला. चित्र्यांच्या अंगभूत गुणांवर अभिजात संस्कार आचवलांनी केले. 'अभिरूची', 'मौज' यासारख्या मान्यवर मासिकातून दिलीपच्या कविता प्रसिद्ध होऊ लागल्या. १९६९ मध्ये ते लंडनला एक यशस्वी वास्तुविशारद - आर्किटेक्ट म्हणून स्थायिक झाले. दोन वर्षांनी १९७१ मध्ये ते अमेरिकेत आले...... ते आजतागायत.

सौ. शोभा चित्रे मुळच्या मुंबईच्या. त्यांनी नागपूर विद्यापीठातून बी.ए.ची पदवी घेतली. लग्नानंतरचे त्यांचेही वास्तव्य लंडन आणि अमेरिकेतच आहे. त्यांचे 'गोठलेल्या वाटा' आणि 'गौरी, गौरी कुठे आलीस ?' हे ललित लेखसंग्रह आणि 'पानगळीच्या आठवणी' हे आत्मनिवेदनात्मक ललित लेखन, पुस्तक रूपाने प्रसिद्ध झाले आहे. सौ. शोभा चित्रे यांना त्याबद्दल 'महाराष्ट्र राज्य पुरस्कार' आणि 'अनंत काणेकर पुरस्कार' मिळाले आहेत, तर दिलीप चित्रे यांचा 'हिमगंध' हा कवितासंग्रह आणि 'अलिबाबाची हीच गुहा' हे नाटक भारत आणि अमेरिका या दोन्ही ठिकाणी गाजले आहे. 'हिमगंध' हा दिलीपचा कवितासंग्रह अमेरिकेतील मराठी कवीचा पहिला कवितासंग्रह आहे.

पण केवळ लेखक-कवी हा दिलीप चित्र्यांचा एकच पैलू नाही. उत्तर अमेरिकेतील मराठी माणसांच्या मनाशी संलग्न असलेल्या विविध प्रयोगांचे ते 'पहिले' संयोजक

आहेत. त्यांच्याच भाषेत सांगायचे तर, "माझ्या हौसेखातर मी बऱ्याच गोष्टी केल्या, ज्या तोपर्यंत कोणीच केल्या नव्हत्या. उदा: १९७५ साली 'कोलंबिया युनिव्हर्सिटी' च्या रेडियो स्टेशनवरून मी अमेरिकेतला पहिला मराठी रेडियो कार्यक्रम सादर केला होता. त्या आधी १९७१ साली लंडनला असताना पहिल्या 'दिपावली लंडन विशेषांकाला' मी जबाबदार होतो. तसेच १९७९ साली, अमेरिकेतील पहिली "अैलतीरावर" ही ध्वनिमुद्रिका मी प्रकाशित केली. १९८२ मध्ये अमेरिका आणि कॅनडा मधील पहिल्या मराठी चित्रपट महोत्सवाचे मी संयोजनही केले होते. सतत बारा वर्षे प्रयत्न करून १९८५ मध्ये 'कुंपणापलीकडचे शेत' हा भारताबाहेरील लेखकांचा पहिला प्रातिनिधिक कथासंग्रह प्रकाशित केला होता. 'अलिबाबाची हीच गुहा' हे माझे अमेरिकेत लिहिले गेलेले पहिले मराठी संगीत नाटक आहे."

चित्र्यांनी कथाकथन, नाट्यनिर्मिती-दिग्दर्शन, काव्यवाचन या सारखे अनेक कार्यक्रम केले आहेत. त्यांनी 'केसरी' मध्ये 'वॉशिंग्टनचे वार्तापत्र' ह्या नावाचे स्तंभलेखन केले. १९९० च्या सुमारास 'एकता' मासिकात 'चंद्रमुखी' या टोपणनावाने, कविता समस्यापूर्तीचे सदरही त्यांनी अनेक वर्षे चालवले. या सगळ्या प्रकल्पांत 'कुंपणापलिकडचे शेत' ही त्यांच्या दृष्टीने त्यांची सर्वात मोठी कामगिरी आहे. १९७५ ते १९८५ या दशकात आता सारख्या सेलफोन्स, कंप्युटर्स, फॅक्स वगैरे सुविधा उपलब्ध नसताना, विविध देशांतील लेखकांकडून साहित्य मिळवणे हे खूप कठीण होते. तसेच लेखनात परदेशात राहण्याचे नुसते कौतुक नको होते. त्यांच्या जीवनाचे अनुभव हवे होते. गंमत अशी की लोक केवळ प्रवास करण्यासाठी परदेशी जातात. पंधरा दिवस फिरतात आणि आमच्या जीवनाबद्दल लिहितात. केवळ काठावरून सुखदुःखं कळत नाहीत. कुंपणा पलिकडचं शेत लांबून नेहमीच हिरवंगार दिसतं. त्यावरून चालायला लागलं की खरं कळतं. ते अनुभव या पुस्तकात दिसतात.

शोभा चित्रे ही तसंच म्हणतात. परदेशातील भारतीयांबद्दलचं चुकीचं लेखन वाचून त्यांना वाईट वाटायचं. आई म्हणून रागही यायचा की इथल्या मुलांबद्दल तुम्ही असं कसं लिहिता? आणि मग त्यांनीच लिहायला सुरुवात केली. ते लेख म्हणजे "गोठलेल्या वाटा". परदेशात राहणं म्हणजे केवळ गाड्या, मॉल्स, ऐश्वर्य याचं वर्णन नाही. तेथे पोहोचेपर्यंत पडणारे कष्ट लोकांना दिसले पाहिजेत. लिहिणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा एक प्रवास होत असतो. शोभा चित्र्यांचा प्रवास 'गोठलेल्या वाटां' पासून 'गौरी, गौरी कुठे आलीस?' पर्यंत जातो. 'पानगळीच्या आठवणी' हे जरी आत्मनिवेदन असले, तरी त्यात 'अल्झायमर्स' सारख्या आजाराबद्दलची जाणीव लोकांपर्यंत पोहोचते.

बरीच वर्षे असे स्वतंत्र पण side by side लेखन केल्यानंतर, चित्रे पतीपत्नींनी अनुवाद केलेले "मीना : अफगाण मुक्तीचा आक्रोश" हे पुस्तक प्रसिद्ध झाले. मेलडीचे व्हिस यांच्या 'मीना-हिरॉईन ऑफ अफगाणिस्तान' या इंग्रजी पुस्तकाचा हा अनुवाद आहे.

एकदा आपला देश सोडून इथे राहू लागल्यावर भावना प्रगल्भ होत जाते. "पण जायचेच आम्हाला या नव्याच वाटेवरूनी" हीच प्रवृत्ती चित्रे पतीपत्नींच्या विचाराचा गाभा आहे असे दिसते. ते लोकांच्यातच "देव" पाहतात. त्यांच्या मते रूढी, व्रतवैकल्यात देव नाही. त्यावर त्यांची श्रद्धा नाही. अमेरिकेत सुद्धा स्त्रिया मोठ्या प्रमाणावर हळदीकुंकू करतात. शोभा चित्र्यांना वाटतं की या स्त्रियांनी एकत्र येऊन चांगलं काहीतरी करावं, चॅरिटी सुरू करावी, डोनेशन्स द्यावी. असं होत नाही याचं त्यांना वाईट वाटतं. त्या म्हणतात, "या रूढी पकडून ठेवण्यामागे काय असेल याचा विचार केला, तर आपण आपल्या समाजापासून दूर आहोत तर त्यातलं काहीतरी जास्त जपण्याचा प्रयत्न करणे हे एक कारण असावं. पण जुन्या चालीरिती जपल्या म्हणजे आपली संस्कृती जपली असं नाही. आपल्या सगळ्या रूढींना सामाजिक संदर्भ आहेत, धार्मिक नाहीत. ज्या काळी बायकांना बाहेरचं जग नव्हतं, लहानपणी लग्नं व्हायची, माहेरची आठवण यायची, तेव्हां मुलींना एकटं वाटू नये, काही करमणुकीचे साधन, मैत्रिणी मिळवण्याचे साधन म्हणून या रूढी होत्या. आता त्या कालबाह्य झाल्या आहेत. तसंच काही पालकांचा आग्रह असायचा की आपल्या मुलांनी भारतीय मुलांशीच मैत्री करावी. पण बाकीचं ही कल्चर पहा, अनुभवा. Let them grow. प्रत्येकात चांगलं आणि वाईट असतं. तर जे चांगलं ते पहायला शिका ना! ज्या पालकांनी आपल्या मुलांवर अशी बंधने घातली, त्यांच्याच मुलांनी मग त्यांना हवं तेच केलं. मुलं अनुकरण करतात, त्यांना आपल्या व्हॅल्यूज शिकवाव्यात. बोलणं एक आणि आचरण दुसरं असं नको."

अमेरिकेत इतके वर्ष राहून मागे वळून बघताना स्वतःच्या आयुष्यात घडलेल्या बदलांबद्दल दिलीप म्हणतात, "भारतात माझा स्वतंत्र व्यवसाय होता. तेथेच राहिलो असतो तर कदाचित आत्ताच्यापेक्षा जास्त पैसेही मी मिळवले असते. म्हणून अमेरिकेने सांपत्तिक सुख-समृद्धी दिली असे 'बदल' म्हणून मी म्हणणार नाही. येथे येऊन मला समाजकार्याची आवड-गोडी लागली, अनेक विविध क्षेत्रांत काम करण्याची संधी मिळाली व त्याचबरोबर व्यक्तिमत्वाचा आणि स्वतंत्र विचारांचा विकास झाला हे मात्र निश्चित!"

आयुष्यात खऱ्या अर्थी 'सहजीवन' जगणारे चित्रे पतीपत्नी ही 'माणसांतली'

माणसे आहेत. त्यांच्या घरात होणारं आदरतिथ्य...... त्यांच्या घरी जाऊन बघा, तुम्हालाही तोच अनुभव येईल.

आणि गंमत म्हणजे असे हे माणसांत 'रंगणारे' आणि माणसे 'रंगवणारे' दिलीप चित्रे चित्रकार ही आहेत. रोजच्या जीवनाच्या धावपळीतून बाहेर पडतात ते निसर्गाच्याच सान्निध्यात! रंगूनी रंगांत मधुर!!

सौ. मोनाली फाटक

************

## अळीबाबाची हीच गुहा......

“**रो**कड्या विचारांचा, परखड आत्मपरिक्षणाचा पहिला प्रयत्न (आणि आजवरचा कदाचित एकमेव) अमेरिकेतल्या मराठी माणसांनी थेट रंगमंचावर उभा केला तो दिलीप चित्रे यांच्या ‘अलिबाबाची हीच गुहा’ या नाटकाच्या रुपाने.

‘आम्ही देश सोडून आलो असलो तरी आपला धर्म, आपली भाषा, आपली संस्कृती विसरलो नाही. आम्ही आजही ‘भारतीयच’ आहोत. ‘मराठीच’ आहोत.... ‘तुमचेच आहोत’ असा विलाप करुन मायदेशातल्या आपल्या माणसांना ‘धरुन’ रहाणारा, सतत त्यांना राजी राखण्यासाठी धडपडणारा,‘अपराधीपणाचा डंख’ भिरकावून देणारा हा पहिला वहिला प्रयत्न होता. या नाटकाने मायदेशातल्या माणसांच्या नाकदुऱ्या न काढता त्यांना चार परखड गोष्टी सुनावण्याची हिंमत केली आणि अवघड जागी ठणकणारं संस्कृतीचं गळू फोडलं.

जुन्याच अपुल्या संस्कृतीतुनी
नवे शिल्प घडवू
अपुली आपण नवी दिशा
अन् मार्ग नवा ठरवू
थोर आमुची मायमराठी
मान्य असे आम्हा,
कसा येथल्या मुलांस ठावा
तुकया अन् नामा ?
कशास त्यांना बंधन
अपुल्या भाषेचे हरघडी,
परक्यांच्या दुनियेतिल त्यांची
अस्सल बाराखडी
बहरु द्या येथल्या भुईवर
स्वच्छंदे रोपटी

नका आवळू फास रुढींचे
आयुष्याभोवती

इतक्या रोखठोक शब्दांतलं उघड ऐलान करणाऱ्या या नाटकात 'गाडुन टाका. बुडवुन टाका संस्कृतिची प्रेते..तोडुन फोडुन परंपरेचे नष्ट करा नाते' असं मुक्त श्वास घेणारं गाणं गात परदेशस्थ मराठी माणसांच्या दोन पिढ्या रंगमंचावर आल्या.

'इकडे आलो... संसार मांडले... मुलांना जन्म दिला...' 'इकडे' रमलो... 'इकडे' रुजलो... तरी संस्कृती 'तिकडची'.... गाणी कविता 'तिकडच्या'... नाटकं 'तिकडून' आणलेली... ही माहेरची उधारउसनवारी आता बंद करण्याची गरज आहे, असं स्वच्छ सांगत दिलीप चित्रे यांनी अलीबाबाच्या गुहेचं दार आता बंद झालं असल्याची घोषणा केली; ते हेच नाटक. स्थळ काळाचे नवे संदर्भ विसरुन जुन्याची पोपटपंची म्हणजे 'संस्कृती' नव्हे, 'इकडे' असताना 'तिकडले' उसासे काढत टिपं गाळणं म्हणजे 'देशप्रेम' नव्हे आणि 'इमिग्रेशन' चे अर्ज नाचवत गुहेच्या बाहेर रांगा लावलेल्यांनी गुहेच्या आत गेलेल्यांना देशद्रोहाची दूषणं देणं योग्य नव्हे; असं ठणकावण्याइतका रोखठोक प्रयत्न १९८९ नंतर पुन्हा घडलाच नाही.''

वरील भाष्य हे अपर्णा वेलणकरांच्या 'फॉर हिअर, ऑर टु गो ?' या पुस्तकात पान २३१-२३२ वर आलेलं 'अलीबाबाची हीच गुहा' या माझ्या नाटकावरील. खरं तर, नाटकातला संपूर्ण सूरच वेलणकरांनी थोड्याशा शब्दात पकडला आहे. त्यातील बंडखोरी, संस्कृतीची उधारी बंद करण्याविरुध्दचा लढा, आपल्या स्वतंत्र अस्तित्वाची साक्ष पटवून देण्याची तळमळ आणि परंपरेविरुध्द दंड थोपटून उभं राहण्याची हिंमत हे नाटकातलं मूळ सूत्र.

१९६० च्या दशकात देशांतरितांच्या प्रवाहात मीही इथं येऊन पोचलो. सुरवातीची काही वर्षं नव्या मातीत रुजताना आजूबाजूचं विश्व न्याहाळत, विविध अनुभव घेण्यात आणि भांबावून टाकणाऱ्या नव्या जगात आपल्या संस्कृतीचा तोल सांभाळण्यात गेली. हे घडत असताना इथल्या मराठी समाजाची एक घडी चापून चोपून बसत गेली. मंडळं निघाली, कार्यक्रम घडू लागले. भारतातून कलावंतांचे लोण इथल्या मराठी माणसांचे मनोरंजन करण्यासाठी व आर्थिक समृद्धता प्राप्त करण्यासाठी येऊन थडकू लागले. नाटकं येऊ लागली. बदलत्या काळाबरोबर इथल्या सुशिक्षित, मराठी समाजाची अभिरुची मात्र न बदलता, त्यांनी ज्या काळात देश सोडला त्या काळाशीच चिकटून राहिली. मराठी साहित्य, कथा-कविता, नाटकं, नाच-गाणी यांची 'तिकडून' बांधून आणलेली व नव्याने येणारी शिदोरी ही शिळीच होत चालली.

'पाडाला पिकलाय आंबा' - व 'बुगडी माझी सांडली गं !' च्या पुढे लावणी सरकेना. सगळ्यात तोच तो पणा जाणवू लागला आणि या कोंडीत माझा जीव घुसमटायला लागला.

ऐंशीच्या दशकापर्यंत अनुभव बऱ्यापैकी संपृक्त झाले. त्यांना वाट फुटायला हवी होती. इथल्या जीवनाचं प्रतिबिंब मराठी साहित्यात यायला हवं. त्यादृष्टीनं अनेक वर्ष केलेले प्रयत्न फलद्रूप झाले ते माझ्या 'कुंपणापलीकडलं शेत' या भारताबाहेरील लेखकांनी लिहिलेल्या प्रातिनिधिक कथा संग्रहाच्या संकलनाने. तो पहिलाच प्रयत्न यशस्वी ठरला. त्यानंतर 'हिमगंध' या माझ्या कवितासंग्रहात इथल्या जीवनातील अनुभवांचे प्रतिबिंब डोकावले. 'पूर्व आणि पश्चिमेची पालखी स्कंधावरी', 'ख्रिस्त येशू शंकरा-', 'इथेच आता विठ्ठल शंकर - इथेच हो घनःश्याम' या सारख्या नंतर लिहिलेल्या गाण्यांमधून- कवितांमधून इथल्या स्वीकारलेल्या जीवनाचा विश्वास आला.

पण त्या आधीच मन धुमसत राहिले. आपली स्वतंत्र कलाकृती असायला हवी. आपलं जीवन, आपले अनुभव, आपल्या कथा-व्यथा आपणच कलात्मकतेने मांडायला हव्यात, सगळ्या उधारीतून मुक्त होण्यासाठी पेटून निघायला हवं, बंड करायला हवं, इथं रुजत चाललेल्या मराठी समाजाचं प्रतिनिधित्त्व करायला हवं, त्यांच्या सुखदु:खांना कलात्मक स्फटिकरुप द्यायला हवं असं वाटत राहिलं. अनेक वर्षांच्या इथल्या वास्तव्यानंतर सगळ्यांच्या विचारांच्या आणि जीवनाच्या दिशा पक्क्या झालेल्या. त्यांना निश्चित स्वरुप आलेलं. सुरवातीच्या काळात असलेली त्रिशंकू सारखी अवस्था संपलेली. आपण मागे ठेवलेला देश-आपला समाज-आपली भाषा-आपली संस्कृती या सगळ्या विषयांचं आपलं प्रेम कितीही जरी तीव्र असलं, आणि त्याची उत्कटताही तेवढीच तीक्ष्ण असली तरी आपल्यामध्ये आणि त्या सगळ्यांमध्ये एक जबरदस्त दरी निर्माण होत चाललेली आहे; अन् ती दिवसेंदिवस रुंदावत जाणार आहे हे विदारक सत्य मनासमोर रुप घेऊ लागलं. आकार अधिकाधिक स्पष्ट होऊ लागले. एकदा नाटकाचा विषय डोक्यात भिनल्यावर त्याच्या अभिव्यक्तींचा, 'फॉर्मचा' (घाट) विचार करायला लागलो. पारंपारिक संकेतापेक्षा वेगळं काय करता येईल ? मग वेगवेगळ्या स्तरांचा (Levels) विचार डोक्यात आला. 'इथल्या' दृष्टिकोनातून 'तिथलं' जीवन. 'तिथल्या' दृष्टिकोनातून 'इथलं' जीवन, आपल्या जीवनात-विचारसरणीत होत गेलेला अपरिहार्य बदल व त्याची आपल्याला असलेली जाण, 'तिथल्या' जीवनाविषयीच्या उपहासातून किंवा विसंगतीतून दूरान्वयाने इथल्या जीवनाचं

किंवा विचारसरणीचं अन् बदलत्या क्षितिजाचं चित्र मांडण्याचा प्रयत्न करावा हे ठसत चाललं. अमूक एकच विषय किंवा प्रश्न हाताळण्याचा प्रयत्न न करता 'तुम्ही' आणि 'आम्ही' मध्ये अजाणता निर्माण झालेली व रुंदावणारी दरी शोधण्याचा व कारणीमीमांसेची चिकित्सा केल्याशिवाय ते सुप्तपणानं अस्तित्वात असलेलं अंतर उघडं करण्याचा खटाटोप नकळतपणे घडत गेला. वेगवेगळ्या स्तरांमधला एक टप्पा हा 'तुम्ही' - 'आम्ही' च्या भेदातला. दुसरा 'फॉर्म' चा. 'TRADITIONAL' फॉर्म आणि 'ABSTRACT' यांच्या एकत्रितकरणाचा दुसरा टप्पा आणि तिसरा हा 'संवाद' आणि 'संगीत' यांच्या परस्पर संबंधातून निर्माण झालेला.

'तुम्ही आणि आम्ही'. 'मूर्त आणि अमूर्त', 'गद्य आणि पद्य', 'वास्तव आणि आभास' या सगळ्या टप्प्यांच्या एकसंध, एकजीव अशा रंगमंचावरील दर्शनी स्वरुपाचा परिणाम उत्कट होऊ शकेल हे नि:संशय. शिवाय या नाटकात प्रथमच रंगभूमीवर आलेली एक गोष्ट म्हणजे इथे वाढणाऱ्या पुढल्या पिढीचा सहभाग. या सगळ्यांचं रंगमंचावर सादरीकरण कसं व कोण करु शकणार? या प्रश्नाला एकच उत्तर होतं. ते म्हणजे 'अशोक कामेरकर'.

भारतातल्या व्यावसायिक रंगभूमीवर काम केलेला, चाकोरी पलीकडे जाऊन सादरीकणाचा विचार करणारा हा एकच कलावंत या नाटकाला न्याय देऊ शकणार होता. नाटकाच्या प्रथम वाचनानंतर मूळ संहितेवर खूप उलट-सुलट चर्चा झाल्या. वैचारिक मतभेद-भांडण झाली. भारतात या नाटकाचे प्रयोग करायचे हा विचार सगळ्यांच्या मनात मूळ धरू लागला होता. तसं झालच तर यातल्या रोखठोक विचारांनी 'तिकडले' दुखावतील का, या विचारानं सगळे धास्तावले. काही विचारांवर मी ठाम राहिलो. काही ठिकाणी संहितेत बदल केले. बदल केले ते वैचारिक बैठक न बदलता त्यातली तीक्ष्णता कमी करण्यासाठी केले तेच. "अविष्कार" च्या सुलभा देशपांडे यांनी परखडपणे सूचना केल्या, जहाल टीकाही केली. त्या विचारात घेणं आवश्यकच होतं.

सगळ्यांनाच हा नवा अनुभव होता. आतापर्यंत अशी स्वतंत्र कलाकृती इथल्या रंगमंचावर आलीच नव्हती. 'नाटकं आली' आणि 'केली' ती 'तिकडचीच'. त्यामुळे प्रथमच आपण नवीन काहीतरी करत आहोत या विचारानं सगळ्यांच्या उत्साहाला उधाण आलें.

रंगमंचावर-मुलं धरून-एकंदर ३५-४० पात्रं. रंगमंचाच्या मागील गदारोळ वेगळाच. नाटकाचा खर्च आवाक्यापलीकडील. शुक्रवारपासून तालमी सुरु व्हायच्या.

सगळ्यांचीच मुलं लहान. शिवाय तीही नाटकात. मग इकडे तालमी तर तिकडे मुलांचं होमवर्क. कोणाचा सॉकरचा गेम; तर कोणाचा बास्केट बॉलचा. तालमींचा खर्च, खाणं-पिणं, जेवणं व सगळ्यांचं झोपणंही. पुन्हा उठल्यावर तालमी सुरु-त्या रविवारपर्यंत. सोमवार उजाडला की प्रत्येकजण पुन्हा आपापल्या व्यवसायात नाटकातलं प्रमुख पात्र विवेक खाडिलकर. तो गायक. त्याच्यावर सगळीच भिस्त. भारतातून आनंद मोडक हा संगीत दिग्दर्शक खास या नाटकाच्या संगीत दिग्दर्शनासाठी दोन महिने इथे येऊन राहिला. मीना नेरुरकरनं नृत्य संकल्पनेची जबाबदारी घेतली तर जगदीश वासुदेवनं निर्मितीची! आणि हळूहळू नाटकाला आकार येऊ लागला.

याच काळात १९८९ मध्ये मुंबईत पहिली जागतिक मराठी परिषद होणार असल्याचं नक्की झालं. त्या परिषदेच्या नाट्य-महोत्सवात पहिला प्रयोग 'अलीबाबाची हीच गुहा' या परदेशी नाटकाचा व्हावा म्हणून त्या वेळचे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री शरद पवार यांचं आमंत्रण आलं. मग आणखीनच नवचैतन्य आलं. भारताच्या ट्रीपच्या खर्चाचे अंदाज सुरु झाले. सगळ्यांच्या सुट्यांचे हिशोब सुरु झाले. महाराष्ट्र सरकार कडून एक लाख रुपये देण्याचं मुख्यमंत्र्यांनी कबूल केलं. परंतू एकंदर खर्चाच्या मानाने ही रक्कम नगण्यच होती. नाटक उभारणीच्या खर्चासाठी थोडं फार निधी संकलन केलं होतं. ते मुख्यत: भारतात केलेलं संगीताचं ध्वनीमुद्रण, वेशभूषा, प्रकाशयोजना, नेपथ्य यातच खर्च झालं. सर्व कलावंतांनी भारत दौऱ्याच्या प्रवास खर्चाची जबाबदारी स्वत:वर घेतली म्हणून बरं. मुंबई-पुणे व अन्य प्रयोगांची जबाबदारी 'अविष्कार' व 'थिएटर अकादमी' या नाट्य संस्थांनी घेतली.

न्यूयॉर्क, न्यूजर्सी, वॉशिंग्टन इथल्या प्राथमिक प्रयोगानंतर नाट्यसंच मुंबईत येऊन थडकला. रंगमंचावरील व मागील मिळून एकंदर साठ माणसं. त्यांचं नियोजन हे जिकरीचंच काम होतं. पासपोर्टस् पासून प्रत्येकाच्या तिकीटापर्यंत. सुट्यांपासून ते अंतर्गत प्रवासापर्यंत, तालमीपासून ते प्रत्येकाच्या तब्येती सांभाळण्यापर्यंत अती दक्षता घ्यावी लागत होती. एकही कोणी आजारी पडल्यास सगळ्याच प्रयोगांचा विचका झाला असता.

जागतिक परिषदेत पहिला प्रयोग झाला आणि दुसऱ्या दिवसाची सगळी वर्तमानपत्रं या नाटकाच्या वृत्तांनी भरुन गेली. सगळे प्रयोग खूप गाजले. दूरदर्शन, वर्तमानपत्रं, मासिकं, आकाशवाणी यांची मुलाखतींसाठी आमंत्रणं येऊ लागली. नाशिकपासून दिल्लीपर्यंत नाटकाच्या प्रयोगासाठी आग्रह होऊ लागले. परंतू सगळ्यांच्या सुट्ट्यांच्या अभावी व एकंदर खर्चाचा विचार करता ते अशक्यच होतं. तरी, मुंबई, पुणे, ठाणे

इत्यादी ठिकाणी मिळून एकंदर आठ प्रयोग झाले. प्रत्येक प्रयोग तुडुंब गर्दीत झाला. तिकिटं न मिळाल्यानं अनेक हिरमुसले.

आज इतक्या वर्षानंतर त्या आठवणी डोळ्यापुढे आल्या की सगळा इतिहास उभा राहतो. अशा 'पहिलेपणाचा' अनुभव काही वेगळाच असतो हे मी आयुष्यात अनेकदा अनुभवलंय.


दिलीप वि. चित्रे

पूर्व प्रसिध्दी: विश्व मराठी नाट्यसंमेलन

न्यू जर्सी, मे २०१०.

DILIP V. CHITRE

6317 MERNA LANE  LANHAM,

MD 207060, USA (301) 459-18376.

**email - dilip_chitre@hotmail.com.**


************

# फर्स्ट इम्प्रेशन्स

**मी** मुंबईची.

बडोदं हे नाव कानावर कधी पडलं ते काही आठवत नाही. दादा (माझे वडील) जेव्हा लहानपणच्या आठवणी सांगायचे त्यात हमखास भाई चित्रे या त्यांच्या बालमित्राचा उल्लेख असेच. भाई चित्रे महाड सोडून बडोद्याला स्थायिक झाल्याचं दादा सांगत. त्यातून दादा तरुणपणी बडोद्याला एका लग्नासाठी गेले होते. तेवढ्या तिथल्या दोन, चार दिवसांच्या वास्तव्यावरुन बोलत. त्यातच मी चौथी, पाचवीत असताना माझा मोठा भाऊ शाळेच्या सहली बरोबर बडोद्याला गेला. तिथून परतल्यावर त्यानं असं काही बडोद्याचं वर्णन केलं की माझ्या डोळ्यासमोर एक स्वप्ननगरीच उभी राहिली.

मधल्या काळात आम्ही मुंबई सोडून नागपूरला गेलो. तिथून परत मुंबईला आलो. मग अचानक दादांची आणि भाई चित्रे यांची दादरला गाठ पडली. पुढील गोष्टी झटपट ठरल्या. भाई चित्रे यांच्या मुलाशी माझं लग्न ठरलं. लग्न ठरताना या चित्रे मंडळींच्या दोनच अटी होत्या. एकतर लग्न निदान वर्ष, दोन वर्ष तरी करायचं नाही. आणि दुसरी म्हणजे लग्न हे बडोद्यालाच व्हायला हवं. लग्न केव्हाही होवो, मात्र साखरपुडा ताबडतोब झाला पाहिजे या ताईच्या (आईच्या) म्हणण्यानुसार ऑगस्ट १९६७ साली आमचा साखरपुडा मुंबईला झाला. साखरपुड्यासाठी चित्रे मंडळींनी आणलेले पेढे सगळ्यांना खूप आवडले. माझ्या भावी सासुबाई ठसक्यात म्हणाल्या, 'हे रावपुऱ्यातल्या दुलीरामकडचे खास पेढे. तुमच्या मुंबईत असे पेढे मिळायचे नाहीत हो.'

ऑफिसमध्ये मी लग्न ठरल्याची बातमी दिली. मैत्रीणींनी खूश होऊन माझं अभिनंदन केलं. मात्र मुलगा बडोद्याचा आहे हे ऐकताच एकेकीनी तारे तोडायला सुरवात केली.

एक म्हणाली, 'मुंबई सोडून तू इतक्या लांब जायला कशी तयार झालीस ?'

दुसरी म्हणाली, 'हे गायकवाडीतले लोक अगदी बुरसटलेले; इतिहासातच वावरणारे. आमच्या शेजारच्या चव्हाण मावशी तर सतत डोक्यावर पदर घेतात. शोभा तुझ्या सासरी सुद्धा अशीच पद्धत आहे कां ?'

तेवढ्यात एक म्हणाली, 'बडोद्याला भाजीपाला चांगला मिळतो असं माझी काकू

म्हणते.' नशिब कुणीतरी बडोद्याबद्दल काहीतरी बरं बोलतंय.

'अगं तुमचं बरं असतं ग. तुम्ही भाजीपाला खाऊन रहाणारे. आमच्यासारख्या 'खाणाऱ्या' लोकांच काय ? मुंबई सारखा ताजा 'बाजार' कुठं मिळणार ? तोही गुजराथेत ?' ही तिसरीच.

मी राहिले बाजूला आणि या दोघींचा वाद सुरु. एक बडोदं म्हटल्यावर मला एवढं ऐकायला मिळालं. मग आमचं लग्न बडोद्याला आखाड्यात होणार आहे हे जर कुणाला कळलं तर ? मी मात्र लग्नाचं स्थळ याविषयी इथं शेवट पर्यंत कुणाला सुगावा लागू द्यायचा नाही हे पक्कं केलं.

माझ्या पहिल्या पत्रात मी मैत्रीणींची शेरेबाजी याला कळवली. याचं पत्र आलं. यानं लिहिलं, "तुझ्या मैत्रीणींचे कॉमेंटस् वाचून माझी छान करमणूक झाली. एक सांगतो, इथे तुझे 'खाण्याचे' अजिबात हाल होणार नाहीत. आमच्या मलंगमियाकडे अगदी टॉप मटण मिळतं. भोईवाड्यात भरपूर ताजं फिश मिळतं. शिवाय बडोद्याची खासियत म्हणजे झिंगे. असे झिंगे तुला जगात कुठंही मिळणार नाहीत. त्यातून झिंग्याचं कालवण कराव ते आमच्या ताईनीच. पण एकंदरीत बडोदं कसं आहे, काय आहे हे मी तुला पत्रात लिहित नाही. तू आता येणारच आहेस. प्रत्यक्ष पहा आणि ठरव. मात्र मोकळ्या मनानी ये आणि तुझं होणारं गाव पहा."

सप्टेंबरमध्ये गौरी-गणपतीचं निमित्त साधून मी बडोद्याला आले. मला माझं होणारं सासर-घर, सासरचं गाव बघायचं होतं. शिवाय याच्या बरोबर थोडा अधिक वेळ मिळावा हा हेतू होताच होता. मनात उत्सुकता, हुरहुर आणि थोडी भीतिही. आयुष्यात प्रथमच दादा-ताईला सोडून, तेही एवढ्या लांब निघाले होते. बडोद्याला मी याच्या घरीच रहाणार होते. एक अनोळखी गाव, परकं वातावरण आणि माझं भावी घर. मनात उठणारे विचार मनाचा गोंधळ वाढवणारे. पहाटे गाडी बडोदा स्टेशनला लागली. समोर हा उभाच आणि बरोबर मोठा गोतावळाही.

टांग्यातून आमची स्वारी स्टेशनवरून दांडिया बाजारकडे निघाली. पहाटेच्या धूसर प्रकाशात हे गाव विलक्षण देखणं वाटलं. टांग्याची गती, घोड्याच्या टापांचा घुमणारा आवाज. हळूहळू जागं होणार गाव. बाजूला हा बसलेला. रस्त्यावरून जाताना हा बडोद्याची माहिती देत होता. मी भवतालचं एकेक दृश्य टिपत होते. याचे शब्द कानावर पडत होतेही आणि नव्हतेही. सगळच कसं स्वप्नवत.

टांग्यातून आम्ही उतरलो. वाड्यात शिरलो. हा म्हणाला, 'हा आपला कादवेकर वाडा' एखाद्यानं राजवाड्याकडे बघून हा आपला राजमहाल असं ज्या थाटात म्हणावं त्याच थाटात यानं माझी वाड्याशी ओळख करून दिली. लहानपणीचा

थोडा काळ वगळता माझं पुढचं आयुष्य ब्लॉकमध्ये गेलं. इथं सगळं संपूर्ण वेगळंच. मी घरात शिरले. माझ्या बरोबर शेजारीपाजारी सुद्धा. त्याच क्षणाला लक्षात आलं, ब्लॉकच्या बंद दाराआड जपल्या जाणाऱ्या खाजगीपणाचा इथं मागमूसही नाही. ही तर वाडा संस्कृती. क्षणभर गांगरलेच. पण घरातल्यांनी हसतमुखानं, मोकळ्या मनानं केलेलं स्वागत आणि शेजाऱ्यांची या घराशी असलेली जवळीक पाहून माझं परकेपण पुसलं गेलं.

म्हटलं तर बडोदं म्हणजे गुजराथेतला महाराष्ट्र. तरीही इथं प्रत्येक लहान सहान गोष्टीत वेगळेपण जाणवत होतं. मराठी बोली भाषेत चपखल बसलेले गुजराती शब्द तर कधी गुजराथी ढंगातले मराठी शब्दोच्चार. खाण्यापिण्याच्या गोष्टींवर गुजराथी ठसा. याच्या नातेवाईकांचा मोठाच गोतावळा. काहीतर पिढ्यान् पिढ्या गुजराथेत वाढले. तरीही जपून ठेवलेल्या खास कायस्थी रीतिभाती. या मंडळींच्या वागण्या बोलण्यात या प्रांताबद्दल प्रचंड प्रेम, अभिमान. मनावरचे गायकवाडी संस्कार. बोलण्यात आदब. तरीही सहज घडलेलं मराठी भाषेचं जतन. संवर्धन. मनानं हे सारं टिपलं.

घरी गौरी-गणपतीच्या उत्सवात, नातेवाईकांच्या गराड्यातून आम्ही दोघं वेळ काढून बाहेर पडत होतो. फिरत होतो. या चार दिवसात यानं मला बडोदं दाखवण्याचा चंगच बांधला. भरभरून हा आपल्या गावाबद्दल बोलत होता. घरापासून जवळच असलेला सुरसागर पाहून मी खूशच झाले. भोवतालच्या वस्तीचाच एक भाग बनलेला सुरसागर. तरीही त्याचं वेगळेपण डोळ्यांत भरणारं. यानं मला कलाभुवन दाखवलं. तसंच म्युझिक कॉलेज, लक्ष्मी विलास पॅलेस आणि न्यायमंदिरही दाखवलं. हा या प्रत्येक इमारतीचं सौंदर्य जणू मला उलगडून दाखवत होता. मी अजुनपर्यंत इमारती सारखी इमारत असते या पलीकडे कशाचा विचार केला नव्हता. पण एखाद्या गोष्टीतलं सौंदर्य कसं टिपायचं याचे यानं मला जणू पाठच दिले. आम्ही कमाठी बागेत गेलो. छान मोकळी, प्रसन्न बाग. चालत चालत बागेतल्या बॅन्ड स्टॅन्डशी पोचलो. भोवती असलेली कलात्मक शिल्पं. त्यावर पडलेली सूर्याची किरणं. त्यातलं छोट्या मुलाचं शिल्प, 'ब्रेव्ह बॉय ऑफ अमरेली,' ज्यानं हातातल्या छोट्याशा सुऱ्यानं वाघाशी झुंज दिली, या लहानग्याच्या चेहेऱ्यावरचे बोलके भाव. हे सर्व न्याहाळताना बडोद्याच्या कलात्मक संस्कृतीचा ठसा मनावर उमटला.

बडोद्यात हिंडता फिरताना जाणवलं की मुंबईच्या मानानं इथं वस्ती बरीच कमी. वर्दळ कमी. कसं शांत वाटतयं. मला मुंबईला नुसती धावत सुटलेली माणसं बघण्याची सवय. इथं हा, पावला-पावलाला थांबवून माझी कुणाकुणाशी ओळख करून देत

होता. मी नागपूरला नऊ वर्ष होते. तिथं लोकांच्या वागण्या बोलण्यात संथपणा जाणवायचा तर वृत्तीत थोडा थंडपणाही. इथं याउलट परिस्थिती. इथले लोक मला मोकळे, उत्साही आपलेपणानी बोलणारे वाटले. कदाचित माझं पुढील सर्व आयुष्य या गावात जाणार म्हणूनही माझा बघण्याचा दृष्टीकोन वेगळा असेल.

बडोद्याहून मी निघाले तेव्हा या पहिल्याभेटीत घरातल्यांनी, वाड्यानी या गावानी मला आपलसं केल्याचं मला जाणवलं. जानेवारीत मी वाङमय परिषदेसाठी नक्की परत येईन असं आश्वासन चित्रे मंडळींना देऊन मी बडोदं सोडलं. वाङमय परिषदे विषयी मी याच्या कडून खूप ऐकलं होतं. शिवाय या निमित्तानं हा परत मला भेटणार होता.

गाडीनं बडोदं सोडलं. या चार दिवसांच्या मनात भरारणाऱ्या आठवणी. बडोदं मागे पडलं. मुंबई जवळ जवळ येऊ लागली. पण मन अजून बडोद्यातून बाहेर पडायला तयार नव्हतं. हा मला आखाड्यात घेऊन गेला होता. प्रो. माणेकरावांचा आखाडा. या संस्थेविषयी चित्रे मंडळींना प्रचंड प्रेम. अभिमान. प्रो. माणिकराव माझ्या सासऱ्यांचे सख्खे आतेभाऊ. यानं मला आखाड्यात सगळीकडं फिरवलं. आखाड्यातला गणपती पाहिला. उमा सभागृह त्यात होणारी व्याख्यानं, चर्चासत्रं, परिसंवाद. आखाडा या शब्दातून व्यक्त न होणारं या वास्तूचं व्यक्तिमत्व. हा उचंबळून बोलत होता. हे सारं ऐकताना माझं मन मात्र दुसरीकडं धावत होतं. इथंच वऱ्हाडी जमणार, लगीन घाई उडणार. आमचं लग्न होणारं. आता सुद्धा आखाड्याच्या आठवणी. तिथं फिरताना माझ्या मनात उमटलेले विचारच मला आठवले. आणि लग्न या शब्दावर मन अडखळलं.

गेले चार दिवस चित्रे मंडळींनी सतत बडोदा आख्यान, गायकवाड आख्यान लावलं होतं. त्यातून आमचं लग्न हा अगदी बिनमहत्वाचा विषय सुटलाच होता. आता मुंबईला गेल्यावर इथल्या एकेक हकिकती सांगताना मला बडोदं आवडलं. माझे भरपूर लाड झाले हे सर्व ऐकून सगळ्यांना आनंद होईलच, पण पाठोपाठ ताईचा, मुख्य म्हणजे आजीचा, प्रश्न येईलच, ‘एवढे तुझे लाड केले म्हणतेस नं! मग म्हणावं एकदा लग्न उरकून टाका आणि मग करा रोजच सुनेचे लाड. लग्न कधी करायचं म्हणतात ग ?’

आता घरच्यांना काय सांगू ? मला परत जानेवारीत बडोद्याला जायचंय हे कसं सांगणार ?

परंतु पुढील काही महिन्यात चक्र जोरात हलली. यानं परदेशी जाण्याचा विचार घरी बोलून दाखवला. मग मात्र आई-काकांनी ठरलेलं लग्न लवकर उरकण्याची

घाई केली. त्याप्रमाणे आणखी सहा महिन्यात लग्न करायचं निश्चित झालं. तारीख ठरली.

जानेवारीत मी बडोद्याला जाण्याचं ठरलं. यानं एका पत्रात लिहिलं. 'बडोद्यासारख्या लहानशा महाराष्ट्रीय समाजात वावरताना फार काळजी घ्यावी लागते. इथले लोक अधिक रसिक, अधिक चोखंदळ आहेत. समााजाचा एक अविभाज्य घटक म्हणून समाजात रहाताना आपणास एक आपले स्वतंत्र स्थान निर्माण करावे लागते. त्यास स्वतंत्र अस्तित्व टिकवून धरण्याचे सामर्थ्य असावे लागते. मगच समाजात आपण मानाचे स्थान मिळवू शकतो.'

हा पत्रातून असं काही जे लिहीत होता त्यासर्वाचा अर्थ मला नीट उमजत होताच असं नाही. तरीही मनात परत होणाऱ्या बडोदा भेटीबद्दल खूप उत्सुकता होती. पहिल्या भेटीत मला बडोदं दिसलं ते विशेषतः कौटुंबिक परिघातलं. या वेळी बडोदं दिसणार ते त्यापलीकडचं.

ठरल्या प्रमाणे मी जानेवारीत वाङमय परिषदेसाठी आले. एकंदर सोहोळा छानच पार पडला. भाषणं, काव्यवाचन, परिसंवाद सर्व योजनाबद्ध कार्यक्रम. या निमित्तानं यानं माझ्या बडोद्यातल्या साहित्यिक वर्तुळात लोकांशी करून दिलेल्या ओळखी. काही मंडळी लांबून दिसलेली. काहींची जवळून झालेली भेट. मागील वेळी मी आले होते तेव्हां हा मला माधव आचवलांकडे घेऊन गेला होता. त्यांचं नाव मी ऐकलं होतं. त्या नावाचा दबदबा होता. प्रत्यक्ष भेटीत याचे त्यांच्याशी किती जिव्हाळ्याचे संबंध आहेत ते दिसलं. आता सुद्धा या परिषदेत वावरताना वेगवेगळ्या वयोगटातल्या लोकांशी याचा कसा सलोखा आहे ते जाणवतय. या सर्वातून मला कुठेतरी आमच्या पुढील आयुष्याचा प्रवास दिसू लागला. शिवाय वाटलं, बडोद्याचा सांस्कृतिक वारसा, साहित्यिक वारसा वगैरे हा म्हणतो ते हेच असावं.

मग ठरल्या प्रमाणे एप्रिलच्या शेवटी आमचं लग्न माणिकरावांच्या आखाड्यात झालं. तीन दिवसाचा वाजत गाजत चाललेला तो शाही थाटातला सोहोळा पार पडून मी बडोदेकरीण झाले.

मात्र पुढील आयुष्याची स्वप्नं बघत मी या गावाला जवळ केलं खरं, पण लग्नानंतर वर्षभरातच याच्या मागोमाग मी गाव सोडला. परदेशी आले. स्थिरावले. इथं मला बडोद्याहून आणलेली शिदोरी उपयोगी पडली. दुसऱ्या भूमीत, समाजात, देशात रुजता येतं. त्या समाजाला, संस्कृतीला आपलसं करता येतं. तरीही आपलं सत्व टिकवून ठेवता येतं. बडोदेकर मंडळींची ही शिकवण इथं कामी आली.

आज वाटतं, एखाद्या गावात तुम्ही किती दिवस, किती वर्ष काढता हे महत्वाचं

नसतंच मुळी. थोड्या कालावधीतही जन्माचे भावबंध निर्माण होऊ शकतात हे मी अनुभवले आहेच.

फक्त एवढंच की आठवणीतलं बडोदं आणि आजचं बडोदं यात खूप खूप अंतर पडलंय. तशी एवढ्या वर्षात मीही बदलले. वय वाढलं. नवनवे अनुभव आले. दृष्टी विस्तारली. मग गाव बदलणं तर स्वाभाविकच. तरीही मनाला प्रश्न पडतो, एवढे सगळे बदल अपरिहार्य असतात कां? बडोदं चोहोबाजूनी फोफावलं. दांडिया बाजारची पूर्वीची शान गेली. मोठमोठे ब्लॉक्स झाले. गर्दी वाढली. गर्दीचा तोंडवळा बदलला. भाषा बदलली. पण सर्वात धक्का बसला होता तो एका भारतभेटीत सुरसागरावर उभारलेला शिवाचा पुतळा पाहून. आठवणीतला सुरसागर प्रसन्न होता. त्याला कुठलाच रंग नव्हता. या शिल्पामुळं सुरसागराचं सौंदर्य वाढण्याऐवजी तो आक्रसला. सुरसागर, म्युझिक कॉलेज, भवतालची वस्ती, पुढचा लहेरीपुरा या सगळ्यांचे एकमेकांशी असलेले बंध या कशाचाही विचार न करता उभारलेला पुतळा. कुठलीच कलात्मकता नसलेला. वाटलं, ज्या बडोद्याच्या प्रथम भेटीत मी डोळे उघडून कला, स्थापत्य त्याचं सौंदर्य न्याहाळलं, जिथं माझ्याही नकळत एक कलात्मक दृष्टी जागृत झाली, त्या बडोद्याची कलाप्रियता कुठं गेली? कलेपेक्षा इथं आणखी काही वरचढ ठरलं का? गेल्या एवढ्या वर्षात राजकारण बदललं. मग समाजाची दिशा बदलली. समाजकारण बदललं मग गाव ही बदलला. हे सारं अटळ असेलही.

बडोद्यात त्याच्या नावापासून बदल झाले. आणखीही पुढं होतील. तरीही, माझ्या मनात १९६७ च्या सप्टेंबर पासून बडोदं सोडेपर्यंत या गावाची जी इंप्रेशन्स उमटली ती तशीच राहणार. ती कशी पुसली जाणार?

**- शोभा चित्रे**

पूर्व प्रसिध्दी : 'ईप्सित - १ मे २०१०, बडोदे

Shobha Chitre
6317 Merna Lane
Lanham, MD 20706, USA
(301) 459-1836
**email - shobhachitre@hotmail.com.**

************

# संस्कृतचा ज्ञानवती साहित्यिक :
# नारायण भालचंद्र, तथा नाना दातार



संस्कृतमध्ये लिखाण करणारी, अथवा संस्कृत श्लोकांचे, सुभाषितांचे सोप्या मराठी भाषेत अनुवाद करणारी व्यक्ती म्हणजे पंडितच असली पाहिजे, असा आपला सामान्य माणसाचा समज. परंतु, नाना दातार हे संस्कृतचे पंडित जरी नसले तरी त्यांचा, संस्कृत भाषेचा व्यासंग आणि अभ्यास दांडगा आहे, म्हणूनच त्यांनी त्या क्षेत्रात लिहिलेले विपुल साहित्य, तसेच प्राप्त केलेले सन्मानही कौतुकास्पद आहेत. टोरोन्टो, कॅनडा येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'एकता' च्या वाचकांना त्यांचे नाव अपरिचित नाही. एकतामधून जानेवारी १९९७ पासून गेली १४ वर्षे 'काव्य-शास्त्र-विनोदेन' ही विशेष लेख-माला ते सातत्याने सादर करीत आहेत.

अमेरिका-कॅनडामध्ये गेल्या १५-२० वर्षात बरीच प्रौढ मंडळी, सेवानिवृत्ती घेतल्यानंतर आपल्या मुलाबाळांकडे स्थायिक होण्यासाठी आली. नानाही, त्यांच्या मुलाकडे, नरेंद्रकडे १९९४ साली कॅनडामध्ये आले. भारताबाहेर, निवृत्तीनंतर स्थायिक होण्यासाठी आलेल्या व्यक्तींना, परदेश म्हणजे सोनेरी पिंजराच वाटतो. कडाक्याची थंडी, बाहेर एकट्याने फिरण्याची गैरसोय, ड्रायव्हिंग नाही, इत्यादी अडचणींमुळे त्यांनी काहीतरी छंद लावून घेतला पाहिजे. ज्यांना काही छंद लावून घेता येत नाहीत, अशा व्यक्ती माघारी भारतात परत जातात. नानांनी जो हा लिहिण्याचा छंद, येथे आल्यावर लावून घेतल्यामुळे 'वेळ' कसा घालवावा याचा त्यांना गेल्या १६ वर्षांत कधी प्रश्न पडला नाही.

नाना जरी 'संस्कृत', शाळेत शिकले असले तरी त्याची मूळ आवड, त्यांना त्यांच्या आजोबांकडून, आईच्या वडिलांकडून लागली. नानांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील कुरुंदवाड येथे झाला. वडील डॉक्टर होते, परंतु नाना केवळ चार वर्षांचे असतांना त्यांचे देहावसान झाले, त्यामुळे नानांचे बालपण आजोळी झाले. आजोबा वेद-पंडित होते, त्यामुळे त्यांच्या संस्कृतचा वारसा अनुवंशिकतेने त्यांच्यात आला असे म्हणावयास हरकत नाही. शालेय शिक्षण बेळगाव, कोल्हापूर येथे झाल्यानंतर नाना महाविद्यालयीन शिक्षणासाठी मुंबईत आले, व प्रथम बी.ए. आणि नंतर बी.कॉम. झाले. १९९० मध्ये, नाना आयुर्विमा मंडळातून (Life Insurance

Corporation) शाखा-प्रबंधक (Branch Manager) म्हणून निवृत्त झाले. वेगवेगळ्या ठिकाणी कामानिमित्त त्यांचे फिरणे झाले, वेगवेगळ्या ठिकाणी त्यांनी शाखा प्रबंधक म्हणून काम केले आणि शेवटी मुंबईच्या 'चिंचपोकळी' या उपनगरात नवीन शाखा उघडण्याची जबाबदारी, त्यांनी जागा निवडण्यापासून ते संपूर्ण ऑफिस स्थापन करेपर्यंत यशस्वीरीत्या पार पाडून, तेथूनच ते निवृत्त झाले.

काव्यरचनेचा उगम, तुमच्या डोक्यात कसा झाला असे विचारता, नाना गंमतीने म्हणाले, लग्नातल्या उखाण्यांपासून सवय झाली. नंतर पत्नी माहेरी गेल्यावर, वेळोवेळी तिला पत्रातून कविता लिहून पाठवायचा छंद लागला. मग नोकरी-व्यवसायामुळे तो मागे पडला, आणि येथे कॅनडात आल्यावर परत उफाळून आला, वेळ घालवायचे साधन म्हणून. त्यांनी आजपर्यंत, सात ग्रंथ व कवितासंग्रह प्रसिद्ध केले आहेत, ते याप्रमाणे....

१. 'गीत-गीता' ... गीतेवरील ५२ कवितांचा संग्रह, १९८२ साली गीताधर्म मंडळ यांच्या मार्फत प्रकाशित. यातील गीते, मुंबईतील गायक, प्रदीप धोंड यांच्या आवाजात २००३ साली दूरदर्शनच्या सह्याद्री मालिकेतून सादर केली गेली.

२. 'लघु-ज्ञानेश्वरी' -ज्ञानेश्वरी सारांश, १९९९, टोरोन्टो. यासाठी ज्ञानेश्वरीतील मूळ ९००० ओव्यांपैकी ३२०० ओव्या निवडून त्यांचा सारांश केला. अर्थ देतांना परिच्छेद पाडून त्यांना शीर्षके दिली. ग्रंथाच्या अखेरीस एका परिशिष्ठात १०५ विषयांवर अर्थबोधक टीपा लिहिल्या.

३. 'काव्यशास्त्रविनोदेन' भाग १, २००३, मातृभूमी सेवा ट्रस्ट व ग्रंथाली, मुंबई याला महाराष्ट्र शासनाचा २००३-२००४ चा उत्कृष्ट मराठी वांङ्मय निर्मितीचा 'दादोबा पांडुरंग' पुरस्कार. ही लेख-माला 'एकता' मध्ये क्रमशः आहे. ऑक्टोबर २०१० पर्यंत, एकूण ५६ भाग प्रसिद्ध, आणखी ४४ भाग लिहून शंभरी गाठण्याची त्यांची प्रबळ इच्छा आहे आणि संपूर्ण लेख-माला पुस्तकाच्या स्वरूपात प्रसिद्ध करण्याचा मानस आहे.

४. 'Geeta for My Grandson' - 'श्रीगणेशयागपरिवार', टोरोन्टो यांच्यातर्फे २००५ मध्ये प्रकाशित.

५. 'निवडक तीन' - या ग्रंथाली प्रकाशनने २००५ साली प्रसिद्ध केलेल्या कवितासंग्रहात त्यांच्या खालील ३ कविता छापून आलेल्या आहेत......

(१) ईशावास्योपनिषत् मंत्र १ मधील कल्पनेचा विस्तार;

(२) प्रयत्नवादाचा आदर्श राम.

(३) दुर्ग-राज रायगड.

६. सृजन@broad - या Continental Publication, पुणे यांनी २००८ मध्ये प्रसिद्ध केलेल्या कवितासंग्रहात नानांची "मी कोण ?" ही कविता प्रसिद्ध.

७. संस्कृत देवपूजेचे मराठीत श्लोकबद्ध रुपांतर. कालनिर्णय पंचांगात १९७५-७६ व १९७६-७७ मध्ये प्रसिद्ध.

अप्रसिद्ध साहित्य :

१. 'गीता-रहस्य - सार', लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्याचा सुलभ आणि संक्षिप्त अनुवाद.

२. मला उमजलेले 'गीतरामायण' - गीतरामायणावर सविस्तर मराठी टीका.

३. 'हिंदू धर्म - एक दृष्टीक्षेप' - हिंदू धर्माची सोप्या भाषेत आणि थोडक्यात ओळख करून देण्याचा प्रयत्न.

नाना जेव्हां १९९४ साली टोरोन्टोला स्थायिक होण्यासाठी आले, तेव्हां त्यांच्या समवयस्क मंडळींनी एक गट स्थापून, महिन्यातून एकदा भेटून प्रत्येकाने साहित्यातील काही वाचन करायचे असा बेत केला आणि त्यातूनच 'काव्य-शास्त्र-विनोदेन'ची निर्मिती झाली.

'काव्य-शास्त्र-विनोदेन' हे शीर्षक सामान्य वाचकांना (ज्यांनी संस्कृत भाषा कधी शाळेतही शिकली नाही अशांना) क्लिष्ट वाटेल, परंतु जर थोड्याफार आवडीने किंवा जाणून घेण्याच्या इच्छेने वाचन केले तर वाचण्यांत रस वाटेल. 'काव्यशास्त्रविनोदेन' या शब्दोक्तीत काव्य आहे, शास्त्राचा अभ्यास आहे आणि विनोदही. संस्कृतातल्या वेगवेगळ्या वाङ्मयातील सुभाषिते अभ्यासून नाना, ती निवडतात, त्याचा अन्वय लावतात, जेणेकरून संस्कृत जाणणाऱ्यांना त्या सुभाषिताचा अर्थ लावता येईल आणि शेवटी सर्व सामान्य माणसांना समजण्यासाठी सुलभ अर्थ ते लावतात. काव्य म्हटले, म्हणजे श्लोक-कविताच नव्हे, तर त्यांत शाकुंतल, रघुवंश यासारख्या कालिदासाच्या नाटकातील पदांचा समावेश होतो. शास्त्र हे आपल्या संस्कृत भाषेत सर्वत्र आढळून येते. त्यात धर्मशास्त्र तसेच, इतर शास्त्रांचाही उहापोह केलेला आढळून येतो. संस्कृत भाषेतील सुभाषितातून बऱ्याच वेळा दुहेरी अर्थ निघू शकतो, तसेच त्या सुभाषितात काही वेळा विनोदाचे, दुसरे अंगही असू शकते. नानांनी संस्कृत भाषेतील वाङ्मयातून शोधून नेमकी अशीच सुभाषिते निवडली की ती वाचतांना, वाचकांचे मनोरंजन होईल. याची प्रचिती, एकताच्या 'वाचकांच्या प्रतिक्रिया' या सदरातून अधून मधून अनुभवायला मिळते. आपल्या सर्वांना समजेल असे एक छोटे पण विनोदी सुभाषित, त्याच्या अन्वय आणि सुगम अर्थासहित द्यायचे झाले तर.......

" लेकी बोले सुने लाग" ....अशी आपल्याकडे म्हण आहे. सासू आपल्या मुलीशीच बोलते; पण रोख सुनेवर असतो. त्याप्रमाणे 'शाङधार' पद्धती मधील पुढील सुभाषित विनोदी पद्धतीने बेडकांबद्दल सांगत आहे, पण रोख मनुष्यावर आहे. अशा श्लोकांना 'अन्योक्ति' म्हणतात.

पिढ्यान पिढ्या छोट्याशा विहिरीत आयुष्य काढणारे बेडूक, ती विहीर म्हणजेच विश्व, असे समजतात. विहिरीतील संकुचित आणि निकृष्ट जीवनातच ते संतुष्ट असतात. त्या विहिरीइतकी विशाल (!) वस्तु आणि त्या विहिरीतील जीवनाइतके समृद्ध (!) जीवन, अन्यत्र कोठे असू शकत नाहीं, अशी त्यांची पक्की खात्री असते. यालाच कूप-मंडूक वृत्ती म्हणतात.

अगस्ती ऋषींचा जन्म कुंभापासून झाला होता. त्यांनी एकदा सारा सागर पिऊन टाकला होता, अशी कथा आहे. या घटनेवर विहिरीतील बेडकांची प्रतिक्रिया पहा.....

**श्रृत्वा कुंभ-समुद्भवेन मुनिना किश्चित तदात्याहितं**
**सिंधौ अंधू-कुटुम्ब-दर्दुर-कुलं हर्षाद् इदं ध्यायति ।**
**गाम्भीर्याद् यदि ते न बिभ्यति, न वा त्रस्यन्ति भेकी-शिशोः**
**अत्रागत्य सुखं वसंतु तिमयो, जातानुकम्पा वयम् ।।**

**कुंभ-समुद्भव मुनि** = अगस्ति. **अत्यहितम** = अतिशय गंभीर संकट, उत्पात **अंधु** = विहीर, भेकी = बेडकी. **तिमी** = देवमासे, शार्क यांसारखा पर्वतप्राय जलचर, **ध्यैयी** = विचार करणे, मनांत आणणे **अन्वय - कुंभ-समुद्भवेन मुनिना** (कुम्भापासून जन्मलेल्या मुनीने, म्हणजे अगस्तिने) **सिंधौ किश्चित अत्याहितं** (सागरात काही भयंकर उत्पात केला आहे) **(इति) श्रुत्वा** (हे ऐकून) **तदा** (त्यावेळी) **अंधू-कुटुंब -** (विहिरीत घर करून राहिलेल्या) **-दर्दुर-कुलं** (बेडकांच्या गटाने) **हर्षाद्** (आनंदाने, उदारपणे) **इदं ध्यायति** (असा विचार केला की). **यदि ते तिमयः** (जर त्या प्रचंड जलचरांना) **गाम्भीर्याद् न बिभ्यति** (या विहिरीच्या खोलीची भीती वाटणार नसेल). **वा भेकी-शिशोः न त्रस्यन्ति** (अथवा बेडकींच्या पिल्लांचा त्रास होणार नसेल) **तर्हि** (तर), (त्यांनी) **अत्र आगत्य** (येथे येऊन) **सुखं वसन्तु** (सुखाने रहावे), **वयं जात-अनुकम्पाः** (आम्हाला त्यांची खूपच दया येत आहे)!

सुगम अर्थ - अगस्ती मुनींनी सागरांत उत्पात मांडला आहे (सारा सागरच पिऊन टाकला आहे.) हे ऐकल्यावर एका छोट्या विहीरींत संसार थाटलेल्या बेडकांच्या गटाने मोठ्या उदारपणे विचार केला की, जर सागरांतील त्या प्रचंड जलचरांना आमच्या विहीरीच्या अथांग (!) खोलीची भीति वाटणार नसेल आणि आमच्या पिल्लांच्या रटरटीचा त्रास (!) होणार नसेल, तर त्यांनी खुशाल आमच्या या विहीरीत येऊन आनंदाने रहावे! आम्हाला त्यांची खूप दया येत आहे!

या लेखना व्यतिरिक्त, नानांना गाण्याचा छंद आहे. जरी गाण्याचे शास्त्रीय शिक्षण घेतले नसले, तरी त्यांनी गीत-रामायणाच्या ध्वनीमुद्रिका निघण्या आधीपासूनच गीत रामायणाचे अंदाजे १७५ कार्यक्रम केलेत. सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक, कै. वसंत देसाई यांच्याकडे समूहात गायनही त्यांनी केले आहे. आईनस्टीन जन्मशताब्दी

निमित्तच्या काव्य स्पर्धेत, मराठी विज्ञान परिषदचे प्रथम पारितोषिक त्यांनी मिळविले. हे गीत नेहरु तारांगण (Planetarium), वरळी, येथील मराठी भाषेतून होणाऱ्या कार्यक्रमावेळी वाजविले जात असे. गाण्याचा हा वारसा त्यांच्या मुलाकडेच नव्हे, तर नातवाकडेही आला आहे. मुलगा नरेंद्र I.I.T. चा engineer असूनही उत्कृष्ट गातो, गाण्याचे सार्वजनिक कार्यक्रम सादर करतो. गेल्या २००९ च्या फिलाडेल्फियाला झालेल्या बृहन् - महाराष्ट्र मंडळाच्या कार्यक्रमात त्यांच्या नातवाने, रवीने गाण्याचा कार्यक्रम सादर केला.

कॅनडात आल्यापासूनच, नानांनी त्यांचे हे संस्कृत प्रेम/छंद जोपासले, आणि १९९५ पासून ते दर शुक्रवारी वेगवेगळ्या संस्कृत काव्यावर व्याख्याने देऊन राहिले आहेत. आत्तापर्यंत त्यांनी टोरोन्टो, सिडनी (ऑस्ट्रेलिया), दुबई व मुंबई येथे, ज्ञानेश्वरी, गीता, मेघदूत, दासबोध, रघुवंश इत्यादींवर प्रवचने केली आहेत. सध्याचा विषय आहे, शाकुंतल. ऑस्ट्रेलियातील मराठी नभोवाणीवर त्यांची मुलाखतही सादर केली होती. त्यांचे एक जावई, सिडनी, ऑस्ट्रेलिया येथे स्थायिक आहेत. नानांची दुसरी मुलगी, अमरावतीला स्थायिक आहे.

बालपणापासून नाना, रा.स्व. संघाचे स्वयंसेवक होते, व भारतीय जनसंघ, भारतीय जनता पक्ष यांकरिता काम केले आहे. त्याशिवाय ब्राह्मण सेवा मंडळ, मुंबई, माटुंगा परस्पर मंडळ, व श्रीगणेशयाग परिवारात ते कार्यरत आहेत. टोरोन्टोत गेली ९ वर्षे, ते लहान मुलांना मराठी शिकवीत आहेत.

सध्या नानांच्या हाती असलेले उपक्रम म्हणजे:

१. ‘गीता सुगीता कर्तव्या’ या नांवाने, गीतेतील निवडक १०० श्लोकांचे विवरण.

२. दासबोध-सार

३. हिंदू धर्माबद्दल नवीन पिढीला ‘हिंदू धर्म-एक दृष्टीक्षेप’ या पुस्तकाद्वारे माहिती उपलब्ध करून देणे.

या पुस्तकांच्या प्रती, माफक दराने, भारताबाहेरील सर्व मराठी मंडळांना पुरवण्याचा त्यांचा मानस आहे. बहुतेक मराठी मंडळांतर्फे, स्थानिक लहान मुलांना मराठी शिकविण्याचे वर्ग काढलेले आहेत. या पुस्तकाद्वारे भारताबाहेरील मराठी मुलांना मराठी संस्कृती, विधी, सण यांची माहिती होईल. यातून, भारताबाहेर मराठी संस्कृती टिकवण्याचा आणि पुढे चालू ठेवण्याचा त्यांचा प्रामाणिक, सश्रम हेतू आहे.

नानांच्या घरात, सुदैवाने, हिंदू-मराठी संस्कृती टिकून आहे, आणि ती, पुढील पिढीत, म्हणजे त्यांच्या नातवापर्यंत तरी राहील अशी त्यांना आशा आहे. एकत्र कुटुंबपद्धतीमुळे, त्यांच्या मुलावर आणि नातवावर संस्कार झाले आहेत व असे संस्कार इतर सर्व मराठी कुटुंबातील मुलांवर व्हावेत, असे त्यांना मनोमन वाटते. त्यांच्या मते,

हिंदू धर्माचा पुढील पिढीमध्ये अभिमान, इतर धर्मियांच्या तुलनेत फार तुरळक आहे. ख्रिश्चन मिशनऱ्या आणि मदरसा, संपूर्ण जगात फोफावत असता, आपणही आपल्या धर्माकरिता काही तरी करावे या जाणीवेने, त्यांची ही धडपड चालू आहे.

मिश्रविवाहाबाबत नानांचे विचार इतरांसारखेच आहेत. मिश्रविवाह होत जाणारच. प्रश्न आहे, तो त्यांच्या मुलांचा. यांत आई-वडिलांपैकी, जो हिंदू असतो, तो बहुदा धर्माविषयी उदासीन असतो. त्यामुळे, हिंदू धर्मास, त्यांची मुले मुकतील असे त्यांना वाटते. हिंदू धर्म हा जगातील सर्वात उदार, सहिष्णुतावादी, आणि तत्वज्ञान-दृष्ट्या सर्वश्रेष्ठ धर्म आहे, आणि म्हणूनच, मुलांवर हिंदू धर्माचे संस्कार व्हावेत, असा त्यांचा आग्रह आहे.

नानांच्या आठवणीतली मन हेलावून टाकणारी गोष्ट म्हणजे, त्यांच्या आजोबांची, ज्यांच्याकडे ते लहानाचे मोठे झाले. वडील लहानपणीच गेल्यामुळे ते आजोळी राहायला आले. आजोबा, सदाशिव कृष्ण तथा अण्णाराव देवधर, वैदिक पंडित होते. आर्थिक परिस्थिती फार गरीब होती, परंतु मनाने ते श्रीमंत होते. त्यावेळी त्यांच्या एस.एस.सी. च्या फीचे १५ रुपये भरायला आजोबांजवळ नव्हते. स्वतःची अंगठी गहाण ठेवून फीचे पैसे भरायला ते तयार झाले होते. आजोबांनी केलेल्या संस्कारांची आणि मदतीची त्यांना आजही जाण आहे.

नाना दातारांचे, लिखाणाचे क्षेत्र प्रामुख्याने भारतीय संस्कृती, आणि लिखाणाचा हेतू म्हटलात तर, मनोरंजनाबरोबर थोडे उद्बोधन. ते पुढे म्हणतात.... "जन्म/मरण आपल्या हातात नसते, पण जगणे आपल्या हातांत असते. तेव्हां प्रत्येकाने आपले जीवन होईल तेव्हढे पवित्र, प्रामाणिक, परोपकारी, आनंदी, समृद्ध व यशस्वी करण्याचा प्रयत्न करावा. 'अभ्युदय' आणि 'निःश्रेयस' हे धर्माचे दोन हेतू सांगितले जातात. त्यानुसार, आपले ऐहिक जीवन समृद्ध आणि त्याचबरोबर, निःश्रेयससाठीही अनुकूल बनवावे" असे त्यांचे प्रामाणिक मत आहे.

असा हा परदेशात, अभिमानाने संस्कृत आणि संस्कृति जपणारा ज्ञानवती योगी! कित्येकदा मनांत येतं की, नानांना केव्हांतरी भेटून यावं. त्यांच्याशी बोलतांना अर्थपूर्ण, सकस असे काहीतरी आपल्याला मिळेल असं वाटतं. ज्ञानाचा विशुद्ध संस्कार आणि सत्याची प्रचिती लाभेल याची खात्री वाटते. कधीतरी हा योग येईल हे निश्चित.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

## प्रास्ताविक

जगांत अनेक धर्माचे लोक एकत्र रहातात. एकच धर्म-पुस्तक आणि एकच प्रेषित मानणाऱ्या धर्माच्या अनुयायांशी आपल्या नव्या पिढीतील मुलांचा नित्य संपर्क येत असतो. त्यामुळे आपल्या मुलांच्या मनांत हिंदु धर्माविषयी विविध शंका व प्रश्न उद्भवत असतात. त्यांची समाधानकारक उत्तरे देण्याची जबाबदारी नैसर्गिकरीत्या आपली म्हणजे पालकांची आहे. परंतु इतर धर्मात जशी धार्मिक शिक्षण देण्याची परंपरा आहे तशी ती आपल्याकडे नाहीं. त्यामुळे आपल्यालाच कित्येकदां आपल्या धर्माची पुरेशी माहिती नसते; मग आपण ती मुलांना कशी देणार ? पण असल्या प्रश्नांना तर्कशुद्ध उत्तरे देण्याची गरज दिवसानुदिवस अधिकाधिक निकडीची होत आहे.

## समस्या

हिंदूंत अनेक पंथ आहेत. देव मानणारे आणि देव न मानणारेही आहेत. मूर्तिपूजेचे हिंदूंना वावडे नाहीं. ती पूजा एकाच मूर्तीची असावी असाही आग्रह नाहीं. एकेश्वरी धर्माची विचारसरणी ऐकल्यावर आपल्या मुलांना हिंदु धर्माचे हे वैशिष्ट्य अनाकलनीय वाटते. **"हिंदु धर्मात देव किती? एकच परमात्मा आहे असे म्हणतात; पण कृष्ण, राम, गणपति, मारुति, दुर्गा, इत्यादि अनेक देवतांच्या मूर्तीही दिसतात. हा काय गोंधळ आहे?"** असा प्रश्न एका तरुण मुलीने मला विचारला होता. हा प्रश्न प्रातिनिधिक समजून मी त्यावर थोडा विचार केला. तो मी येथे संक्षेपाने मांडीत आहे. हा विचारच बरोबर आणि परिपूर्ण आहे, असा माझा दावा नाही.

## एकाग्र मनाची शक्ति

लहानपणी आपण एक प्रयोग केलेला असतो. बहिर्गोल भिंगामधून सूर्य-किरण एकत्रित केले कीं, कागद पेट घेतो. एरवीही तेच सूर्य-किरण कागदावर पडत असतां कागद पेटत नाहीं. यावरून लक्षांत येते कीं, सूर्य-किरण ही एक शक्ति आहे. ती एकाग्र केली कीं परिणामकारक होते. कोणत्याही शक्तीचे असेच आहे. विखुरणे, झिरपून जाणे हाच शक्तीचा धर्म असतो. शक्ति टिकवावी लागते, एकाग्र करावी लागते, तेव्हांच ती परिणामकारक होते. मनुष्याच्या मनाची शक्तीही वस्तुत:

अमर्याद आहे. पण अनेक विषयांत ती विखुरली गेली असल्यामुळे तिचा प्रत्यय आपणांस येत नाहीं. ती एकाग्र करितां आली, तर तीही अतिशय परिणामकारक होऊं शकते. महा-पुरुष जी अचाट कामे करितात, त्यांत समर्थ आणि एकाग्र मन हेच त्यांचे सर्वात प्रभावी साधन असते. एकाग्र मन ज्या विषयाकडे लावावे, तो विषय चट्कन् ग्रहण केला जातो. म्हणूनच मुलांना अभ्यासावर मन केंद्रित करण्यास आपण सांगत असतो.

## मन एकाग्र कसे करावे?

मनुष्याचे मन स्वभावत:च अतिशय चंचल आहे. बहिणाबाई चौधरी म्हणतात, **"मन चपळ चपळ, त्याची काय सांगूं मात । आतां होतं भुईवर, गेलं गेलं आभाळांत."** गीतेत अर्जुनही म्हणतो,- "**कृष्णा, मन अतिशय चंचल आहे. त्याला बांधून ठेवणे हे वाऱ्याला बांधून ठेवण्याइतके कठिण आहे (गीता. ६.३४).**" हे नाठाळ मन स्थिर व एकाग्र करावे तरी कसे ? यासाठी मनाला एक ठिकाणी बांधून ठेवण्याचा उपाय **पातंजल योग-शास्त्र** सांगते (यो.सू. ३/१). चंचल मनाला बांधून ठेवण्यासाठी एखादा विषय लागतो. मन निरालंब (आधाराशिवाय) राहूं शकत नाहीं.

## परमात्मा निराकार म्हणून ध्यानासाठी प्रतीक

प्रत्येक धर्मात ईश्वराचे भजन-पूजन सांगितलेले असते. यासाठी उत्कट भक्ति आणि शरणागति आवश्यक असते. म्हणून मन एकाग्र होणे महत्त्वाचे ठरते. येथेच मूर्तिपूजा उपयोगी ठरते. चित्ताला जेथे बांधून ठेवावयाचे, तो विषय साकार आणि स्पष्ट असेल, तर चित्त एकाग्र होण्यास मदत होते. पण परमात्मा निर्गुण-निराकार आहे. (याविषयी सर्व धर्माचे एकमत आहे!) **"यतो वाचो निवर्तन्ते अ-प्राप्य मनसा सह" (तै.२.९)** – मनासह सर्व इंद्रिये तेथे पोहचूं शकली नाहींत, परत फिरली - असे तैत्तिरीय उपनिषदांत म्हटले आहे. मनाला जे उमगतच नाहीं, त्यावर ते एकाग्र कसे होणार ? सामान्यांना हे अशक्यप्रायच आहे. म्हणूनच ध्यानासाठी प्रतीक घ्यावे लागते.

## पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना (व्यक्ति तितक्या प्रकृति)

प्रत्येक मनुष्याचा स्वभाव, आवडी-निवडी, सारे भिन्न असते. या वैचित्र्यामुळे प्रतीकेही वेगवेगळी झाली. ॐ हे परमात्म्याचे आद्य प्रतीक आहे. **(ॐ इति ब्रह्म – तै.१.८).** पुढे **ब्रह्मा** (सृष्टि-निर्माता), **विष्णु** (सृष्टि-पालक) आणि **महेश** (सृष्टि-संहारक) या तीन देवता मानल्या. त्यानंतर त्या तीन्ही देवता वेगवेगळ्या नाहीत, एक - स्वरूपच आहेत, किंवा ही एकाच देवतेची तीन स्वरूपे आहेत, हे

सांगण्यासाठी "तीन शिरे सहा हातह्न या वर्णनाची **दत्तात्रेयाची** मूर्ति कल्पिण्यांत आली. शैव व वैष्णव यांत फूट पडूं लागली. तेव्हां **अय्यप्पा** किंवा **सबरीमल** या देवतेची कल्पना करण्यांत आली. (विष्णूने मोहिनीरूप धारण केले असतां मोहिनीस शंकरापासून झालेला पुत्र म्हणजे अय्यप्पा. म्हणून अय्यप्पा शैव आणि वैष्णव दोघांनाही पूज्य झाला!) खंडेनवमीस शस्त्रांची पूजा केली जाते. मुंबईस कापड-गिरण्यांतील कामगार गिरणीतील यंत्राचीच पूजा करितात. **"मातृ-देवो भव। पितृ-देवो भव। आचार्य-देवो भव। अतिथि-देवो भव।" (तै.१.११)** हे उपनिषदांतच सांगितले आहे. रामचंद्र आणि कृष्ण हे खरे तर ऐतिहासिक महापुरुष. पण त्यांच्या अलौकिक कार्यामुळे त्यांना देव-स्वरूप मानण्यांत आले. अलिकडे साईबाबांचीही मंदिरे झाली आहेत. मुंबईस ज्ञानेश्वर मंदिरही आहे. मनुष्यांच्या रुचि-वैचित्र्यानुसार शक्तीची देवता हनुमान्, विद्येची देवता सरस्वती, बुद्धीची देवता गणपति, संपत्तीची देवता लक्ष्मी, अशाही विविध देवता निर्माण झाल्या.

## पण अखेर सारी प्रतीकेच!

पण अखेर ही सर्व प्रतीकेच. परमात्मा निर्गुण-निराकार असल्यामुळे त्याची पूजा करितां येत नाहीं, म्हणून सोयीसाठी बनविलेली. या प्रतीकातून तो एक परमात्माच पहावयाचा आहे.

गणपति अथर्वशीर्षातील मंत्र ९ मध्ये **"एक-दन्तं चतुर्हस्तं पाशं अङ्कुश-धारिणं"** इत्यादि गणेश-मूर्तीचे वर्णन केले आहे. परंतु मंत्र १ मध्ये याच गणपतीस **"त्वमेव प्रत्यक्षं तत्त्वमसि" (वाक्य २)** आणि **"त्वमेव सर्व खल्विदं ब्रह्मासि" (वाक्य ६)** असे म्हटले आहे. ब्रह्म वस्तुतः निर्गुण-निराकार असल्याने डोळ्यांना दिसूं शकत नाहीं. पण येथे गणपतीस प्रत्यक्ष - म्हणजे डोळ्यांना दिसूं शकणारे - ब्रह्म म्हटले आहे, अभिप्राय असा कीं, डोळ्यांना दिसणाऱ्या गणपतीच्या मूर्तीत, डोळ्यांना दिसूं न शकणारा निर्गुण-निराकार परमात्माच पहावयाचा आहे!

या गणेशालाच मंत्र ६ मध्ये **"त्वं ब्रह्मा, त्वं विष्णुः, त्वं रुद्रः, त्वं इन्द्रः, त्वं अग्निः, त्वं वायुः, त्वं सूर्यः, त्वं चन्द्रमाः"** असे म्हटले आहे. ब्रह्मा, विष्णु, रुद्र (महेश), इत्यादि देवता आणि गणपति या वेगवेगळ्या देवता आहेत; त्यांची स्वरूपेही वेगळी आहेत. **"एक-दन्तं चतुर्हस्तं पाशं अङ्कुश-धारिणं..."** या गणपतीलाच ब्रह्मा किंवा विष्णु किंवा रुद्र (महेश) कसे म्हणतां येईल? याचे उत्तर पुढे लगेच गणपतीला पुनः **"त्वं ब्रह्म"** असे म्हणून दिले आहे. ब्रह्म सर्वास व्यापून असल्याने सर्व नांवांच्या आणि रूपांच्या सर्व दैवतांत तेच आहे. ही सर्व दैवते परब्रह्माचीच प्रतीके आहेत. अनेक नांवाच्या अनेक देवतांतून एका परमात्म्याचीच पूजा करावयाची

आहे.

वर दिले, ते केवळ एक उदाहरण. याचप्रमाणे कोणत्याही दैवताचे वर्णन करितांना ती देवता म्हणजेच परब्रह्म असे म्हटलेले असते. सारांश,

**आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।**
**सर्व-देव-नमस्कार: केशवं प्रति गच्छति ।।**

नद्या, नाले, ओहोळ यांतील पाणी वेगवेगळे वाटते. पण ते सारे आकाशांतून पडते; आणि अखेर सागरासच जाऊन मिळते. त्याप्रमाणे कोणत्याही देवतेला नमस्कार केला तरी तो एका केशवालाच जाऊन पोचतो! येथे 'केशव' याचा अर्थ एकच तत्त्व असा आहे.

## प्रतीकामधून प्रतीकापलीकडे

मधुमेह झालेल्या रोग्याला वैद्य साखर सोडण्यास सांगतो. रोग्याने साखर न खातां लाडू, पेढा, बर्फी, जिलेबी, श्रीखंड, पुरणपोळी, इत्यादि पदार्थ खाल्ले! पदार्थांची नांवे आणि रुपे वेगळी खरी, पण वैद्याच्या दृष्टीने ती सारी साखरच! इंग्रजीत COW , मराठीत गाय आणि संस्कृतमध्ये गौ म्हटले म्हणून मतलब बदलत नाहीं. भूमितीत त्रिकोणाला अ-ब-क असे नांव देऊन त्रिकोणाचे सिद्धांत समजावून देतात. तेथे महत्त्व अ-ब-क यांना नसते, तर त्यांच्या सहाय्याने सांगितल्या जाणाऱ्या सिद्धांताला असते.

गणितांतील उदाहरणे सोडवितां सोडवितां त्यामागचे सूत्र (formula) समजावून घ्यावयाचे असते. त्याप्रमाणे निरनिराळ्या देवतांच्या मूर्तीची पूजा करितां करितां त्यामागचे "परमात्मा" हे सूत्र समजून घ्यावयाचे आहे, हे कधीही विसरतां कामा नये. त्या सूत्रावर दृष्टी ठेवली, तर सर्व मूर्ति सारख्याच आहेत. आणि सूत्रावरील दृष्टी ढळली तर - त्रिकोणाचे अ-ब-क हे नांव बदलून प-फ-ब नांव दिल्यावर (सिद्धांत न कळलेल्या) विद्यार्थ्यांची जी स्थिति होते - तीच आपली होईल.

## प्रतीकाशिवाय परमात्माची पूजा अशक्य

प्रतीकांना कांहींच किंमत नाहीं, असा याचा अर्थ नाहीं. परमात्मा अव्यक्त असल्यामुळे प्रतीकाशिवाय त्याची पूजा करणे शक्य नाहीं. ज्ञानदेव म्हणतात, - **"पैं शून्य जैं दावावें जाहलें । तैं बिंदुलें एक पाहिजे केलें।..." ।।१३.८८७।।** (शून्य म्हणजे कांही नाहीं. ते दाखविण्यासाठी फळ्यावर एक छोटे पोकळ वर्तुळ काढावे लागते. "कांहीं नाहीं," हे दाखविण्यासाठी "कांहींतरी" काढावे लागते.) ज्ञानदेव पुढे म्हणतात - **"अगा सृष्टीवेळे प्रियोत्तमा । तया नांव म्हणती ब्रह्मा । व्याप्ति जें विष्णुनामा । पात्र जाहलें ।। मग आकारु हा हारपे । तेव्हां रुद्र**

**जें म्हणिपे । तेंही गुणत्रय जेव्हां लोपे । तैं जें शून्य" ।। १३.९२३-२४ ।।** (ब्रह्म सृष्टि निर्मिते तेव्हां त्याला ब्रह्मा म्हणतात, पालन करिते तेव्हां विष्णु व लय करिते तेव्हां रुद्र म्हणतात. उत्पत्ति, स्थिति, लय ही तीन्ही लोप पावतात, तेव्हां ते शून्य स्थितीत म्हणजे निर्गुण असते.) अर्थात ब्रह्मा, विष्णु, रुद्र ही त्या निर्गुण परब्रह्माची प्रतीके आहेत.

सारांश, मूर्तिपूजा हे साधन आणि निराकार परमात्मा हे साध्य आहे. साधन म्हणजे साध्य नव्हे; पण तेच साध्य प्राप्त करून देते! किंवा मूर्तिपूजा हा पाया आहे आणि निराकार परमात्मा हे शिखर आहे. पाया म्हणजे शिखर नव्हे; पण पायावरच इमारत उभी असते!

सारांश, प्रतीकाची पूजा करितांना प्रतीकांतच अडकून राहूं नये. आपल्या प्रतीकाच्या अभिमानाने अन्य प्रतीकांना कमी लेखू नये. सर्व प्रतीकांतील म्हणजे मूर्तीतील परमात्मा पहाण्याचा प्रयत्न करावा.

## समारोप

ज्या प्रश्नाच्या संदर्भाने हे विचार मी प्रकट केले. त्या प्रश्नाचे उत्तर माझ्या मते म्हणूनच असे आहे - "हिंदु धर्मात परमात्मा एकच आहे. पण तो निराकार असल्यामुळे त्याची विविध प्रतीके मूर्तिरूपाने पूजिली जातात."

प्रतीक-पूजा (मूर्तिपूजा) चालूंच रहाणार आहे. मूर्तिपूजा नाकारणाऱ्यांनाही प्रतीकांची गरज लागतेच. ख्रिश्चन धर्मातील क्रॉस आणि इस्लाममधील चांद ही प्रतीकेच आहेत. येशूच्या किंवा मेरीच्या मूर्तीची पूजा ही मूर्ति-पूजाच आहे. प्रतीक-पूजा ही उपासनेची सुरवात आहे. मन व बुद्धि यांचा जसजसा विकास होत जाईल तसतसा उपासकाचा प्रतीकांतील भाव उंचावत जातो. विनोबा म्हणतात, 'दगडांत देव आहे,' यावर मूर्ख व शहाणा दोघांचेही एकमत असते. पण मूर्ख 'च' सिद्धांतवादी असतो, तर शहाणा 'हि' सिद्धान्तवादी. म्हणजे दगडांत 'च' देव आहे (इतर कोठे नाहीं), अशी मूर्खाची समजूत असते; तर दगडांत 'हि' देव आहे (सर्वत्र असल्यामुळे), हे शहाणा समजून असतो!

प्रत्येक शुभ कार्यारंभी आपण सुपारीत गणपतीची कल्पना करून तिची पूजा करितो; आणि नंतर तीच सुपारी कातरून विड्यांत घालून खातो. 'एक खाद्य पदार्थ' ही सुपारीची किंमत न विसरतां आपण तींत गणपति पाहूं शकतो. किंवा नर्मदेतील गोट्यांतही तो पाहू शकतो. पूज्य पांडुरंगशास्त्री आठवले म्हणतात कीं, भाद्रपदांत आपण घरी गणेशमूर्तीची स्थापना करितो आणि कांही दिवसांनी त्या मूर्तीचे विसर्जनही करितो. साकारातून निराकाराकडे जाण्याचे हे शिक्षणच आपण घेत

असतो.

आपल्या रक्तांतच ही मूल्ये भिनलेली आहेत. मात्र त्यांची वरचेवर आठवण करीत रहाणे आवश्यक असते. आपली मुले वेगळ्या परिस्थितीत वाढत असल्यामुळे त्यांना ही मूल्ये परिचित नसण्याचा संभव असतो. म्हणून आपण ती मूल्ये त्यांच्यापर्यंत पोचविली पाहिजेत.

## अन्य धर्मीयांच्या तत्व-शून्य प्रचार

प्रत्येक धर्माच्या अनुयायांना आपापली प्रतीके प्रिय असतात. सर्व प्रतीकांची किंमत सारखीच असल्याने "तुझे प्रतीक टाकून दे; माझेच प्रतीक घे," हा दुराग्रह तत्त्वतः व्यर्थ आहे. एक विशिष्ट प्रतीकच सर्वांवर लादणे ही हुकूमशाही झाली! मला लाडू आवडतो म्हणून सर्वांनी लाडूच खाल्ला पाहिजे, असे म्हणण्यासारखे हे झाले! कोणालाही रुचिप्रमाणे कोणत्याही प्रतीकाची उपासना करूं देणे ही लोकशाही आहे. म्हणून इतरांच्या प्रतीकांचा आदर करावा. पण आपले प्रतीक मुळीच सोडूं नये.

**ना. भा. दातार**

**email - nanadatar@gmail.com.**

************

# तारेवरची कसरत (करणारी) : डॉ. ललिता गंडभीर



**“ता**रेवरची कसरत” हा डॉ. ललिता गंडभीर यांचा पहिला कथासंग्रह. त्यांतील भावस्पर्शी कथा म्हणजे भारताबाहेरील एका मराठी लेखिकेने साहित्याच्या प्रांगणात टाकलेले दमदार पाऊल. डॉक्टरी पेशांत आणि संसाराच्या चौकटीत वावरणाऱ्या या गृहिणीचे आयुष्य, खरोखरीच ‘तारेवरची कसरत’ होती. परदेशात आलेल्या गृहिणीला आपली मुलं, संसार, नोकरी अथवा अर्थार्जनाचा व्यवसाय सांभाळून साहित्यनिर्मिती सारख्या कलेला वाहून घेण्याचा छंद, यांचा मेळ जमवणं फार फार कठीण असतं. स्वयंपाकापासून ते मुलं सांभाळण्याच्या आणि व्यवसायाच्या सर्व जबाबदाऱ्या, नोकराच्या आणि मोलकरणीच्या मदतीशिवाय पार पाडाव्या लागतात.

‘तारेवरची कसरत’ या लेखमालेत ललिता गंडभीर यांनी केलेले विश्लेषण, त्या दृष्टिकोनांतून अतिशय महत्वाचे आणि वाचनीय आहे. स्थलांतरीत स्त्री-जीवनाचा घेतलेला हा आढावा, केवळ माहितीवजा नसून त्यांत एक प्रकारचा द्रष्टेपणा आहे, हे मान्य करावे लागते. ललिता गंडभीर यांच्या लिखाणात वस्तुस्थिती आणि वास्तवता यामधील फरक जाणवून देण्याची प्रवृत्ती दिसून येते. त्यामुळे त्यांचे लिखाण, वाचकाला एका वेगळ्या अनुभूतीच्या पातळीवर घेऊन जातं.

अमेरिकेतील व कॅनडातील सर्व लेखक-कवी हे नुसत विद्याविभूषितच नाहीत, तर ते चांगले सुसंस्कृत आणि अनुभवसिद्ध आहेत. ही सर्व मंडळी व्यावसायिक साहित्यिक जरी नसली तरी त्यांचा मराठी आणि इंग्रजी साहित्याचा व्यासंग जबरदस्त आहे. त्यांचे लिखाण बरेच वेळा चाकोरीबाहेरील असते. कारण त्यांचे अनुभव-विश्व वेगळ्या प्रकारचे असते, ते जास्त विशाल असणे स्वाभाविकच आहे. या सर्वांनी मराठी भाषा-संस्कृती भारताबाहेर मोठ्या प्रयासांने जपली आहे. अशाच एक चाकोरीबाहेरील लेखिका.....डॉ. ललिता गंडभीर. त्यांनी आजपर्यंत स्वत:चे वैयक्तिक असे तीन कथा संग्रह, एक कादंबरी आणि अनेक लेख अमेरिकेतील आणि भारतातील अंकांत प्रसिद्ध केले आहेत. शिवाय दोन सामायिक कथा-संग्रहात

त्यांच्या कथांचा समावेश होता. ललितातार्इंचे कौतुक करावे तेव्हढे थोडेच आहे.

ललिता गंडभीर यांचा जन्म पुण्यात सदाशीव पेठेतला, महाविद्यालयीन शिक्षण फर्ग्युसन मधून व वैद्यकिय इंदूरच्या एम जी एम मेडिकल कॉलेज मधून झाले. त्यांच्या लहानणीच आईचा वियोग झाल्यामुळे प्रामुख्याने वडिलांचे संस्कार त्यांच्यावर झाले. वडिलांना त्यांच्या स्टेशनरी सामान विकायच्या धंद्यात त्या सहाय्य करीत असतांना त्यांचा संपर्क इतर धर्मियांशी आला त्यामुळे त्यांची दृष्टी व्यापक झाली, पुढे इंदूरला वैद्यकिय कॉलेजमध्येही त्यांना भारतातल्या इतर भाषिकांचा सहवास लाभला. तसेच लहानपणी सुट्टीत ललिताताई, मुंबईला चाळीत राहणाऱ्या व कोकणातील खेडेगावात राहणाऱ्या नातेवाईकांकडे जात. वृत्ती अभ्यासक असल्यामुळे, त्यांचे अवलोकन सखोल होते. या सर्व संपर्काचा, अनुभवांचा परिणाम त्यांच्या लेखनांतून दिसून येतो. "तारेवरची कसरत" या त्यांच्या पहिल्या स्वतंत्र कथासंग्रहातील कथांवरून हे लक्षात येते. ललिताताई व्यवसायाने जरी डॉक्टर असल्या तरी त्यांचे लिखाण, विचार आणि अस्तित्व भारतीय लेखकांच्या लिखाणापासून कसे वेगळे आहे याचा दाखला देते. अमेरिकेतील त्यांचे अनुभव आणि पारखलेली व्यक्तिचित्रे, त्या आपल्या सहज सुंदर लेखनशैलीत वाचकांपुढे ठेवतात. त्यांत थोडा मिस्किलपणा पण आहे आणि नर्मविनोदही. 'नवऱ्याची जात' हा लेख त्याचे चांगले उदाहरण आहे.

लहानपणी ललितातार्इंनी लेखिका होणार असे जाहीर केले होते; पण पुढे माठेपणी त्यांनी एका लेखिकेला प्रश्न विचारला 'कथा-कादंबऱ्या लिहून पोट भरता येईल का ?' त्यावर ती लेखिका हसली आणि म्हणाली, 'रोजच्या भाजीपुरते पैसे मिळाले तर आनंद मानायचा.' मग ललितातार्इंनी तो नाद सोडून वैद्यकीय क्षेत्रात जाण्याचा निर्णय घेतला. या क्षेत्रात जाण्याचे दुसरे कारण म्हणजे, लहानपणी त्यांनी जवळूनच विधवा, परित्यक्ता स्त्रियांचे जीवन पाहिले होते, तेव्हां स्वतःच्या पायावर उभे रहाण्यासाठी तरी पैसे मिळवायचे अशी विचारधारा त्यांच्या मनांत दृढ झाली. एम.बी.बी.एस. होऊन त्या १९६३ साली शरद गंडभीर यांच्याशी विवाहबद्ध होण्याकरता कॅनडात आल्या व पॅथोलॉजिस्ट झाल्या. या काळांत, जवळ जवळ १५ वर्षे त्यांचा मराठी वाचनाचा नियम तुटला होता. १९७९ साली जेव्हां कॅनडातील टोरोंटो येथून "एकता" चे त्रैमासिक हातात पडल्यानंतर त्यांच्या मनांतील आकांक्षा जागी झाली. "एकताला" ललितातार्इंनी लेख पाठविला आणि तो प्रसिद्ध झाल्यावर त्यांना हर्षवायूच झाला. तेव्हांपासून त्या सतत लेखन करीत आहेत. वडिलांच्या प्रोत्साहनामुळे, ललिताताई आणखी लिहीत गेल्या. त्यांचे लेख वडिलांनी भारतातील मासिकांतून प्रसिद्ध केले.

वडिलांचेही मनोरंजन होऊन वेळ जाऊ लागला. वडिलांच्या सूचनेप्रमाणे त्यांनी लेखन, कसे सुधारायचे याचा अभ्यास केला, त्यावर पुस्तके वाचली. वडिलांच्या निधनानंतर, भारतात कथा प्रसिद्धीला पाठवायचे त्यांनी थांबवले आणि मग त्या इंग्रजीतून लिहू लागल्या.

वडिलांच्या पश्चात, डॉ. दत्तात्रय पुंडे यांनी ललितातांईना त्यांची 'पक्षी जाय देशांतरा' आणि 'पशुप्रेमियांच्या दुनियेत' ही दोन पुस्तके प्रसिद्ध करण्यास मदत केली. तसेच 'ग्रंथालीचे' दिनकर गांगल यांनी 'दहशतवादाची कथा' या कादंबरीत सुधारणा करायचे सहाय्य केले. पद्मजा फाटक यांनीही ललितातांईच्या कथा वाचून त्यात सुधारणा करण्याच्या सूचना दिल्या. या व्यतिरिक्त, घरचे सहाय्यक-मार्गदर्शक पती, शरद गंडभीर, शुभदा व सुधीर गंडभीर, यांचीही साथ लाभली. 'एकताचे' विनायक गोखले, अनिता रेगे, मीना घाणेकर, दुर्गा पाच्छापुरकर, आदींचेही प्रोत्साहन आणि मदत लाभली. प्र.ब. कुलकर्णी, प्रा. घोंगे, स्मिता पाटकर, मालती कुलकर्णी आणि विनया खडपेकर या मित्र मैत्रिणींनी वेळोवेळी सूचना व प्रोत्साहन दिले, तेही त्या विसरू शकणार नाहींत. लिखाणाच्या अथक प्रयत्नांत पतीचा, शरद गंडभीर यांचा फार मोठा वाटा आहे, हे त्या मोकळेपणाने मान्य करतात.

ललितातांईचे लेखन हे स्वानुभवांवर आणि सभोवती घडणाऱ्या घटनांच्या सखोल अवलोकनांतून उतरले आहे. त्याला मानवतावादी बैठक आहे. त्यांच्या प्रत्येक लेखातून एक वेगळा संदेश असतो, वाचकाने त्याला पाहिजे तसा अर्थ लावावा. त्यातून वाचकाने काय शिकायचे, ते त्याने ठरवावे.

बदलत्या जगाबद्दल ललितातांईचा दृष्टीकोन सरळ आहे. त्या म्हणतात..... "बदलत रहाणं हा जगाचा स्थायीभाव आहे हे सत्य मी फार पूर्वीपासून अंगीकारलं आहे. हवामानाप्रमाणे सतत होत राहणाऱ्या बदलांच मला आकलन होतं न होतं तोच जग फार बदलतं. "बदल हा अपरिहार्य असतो असं मानून, तो समजून घेण्याचा मी सारखा प्रयत्न करत रहाते. परिणामी, मला बदलाविषयी मत बनवायला वेळच मिळत नाही. पिढ्यांपिढ्यांमधे होणाऱ्या बदलांचे सुपरिणाम व दुष्परिणाम, दोन्ही होतात. पिढ्यांमधील फरकांना बरे-वाईट कंगोरे असतात."

ललितातांईच्या मते, मागील पिढीने दूरदृष्टी ठेवून रहावे, जेणेकरून पुढील पिढीशी मिळते जुळते घ्यायला मदत होईल व मतभेदांचा संघर्ष टाळता येईल. त्यांच्या या दृष्टीकोनामुळे, त्यांच्या व त्यांच्या मुलांच्या विचारसरणीत फारसा फरक त्यांना जाणवत नाही. मुलेही मग तुमचा मान राखून असतात. प्रत्येक पिढीला त्यांच्या स्वप्नातील वाट चालण्याची मुभा मिळाली, तरच समाज प्रगतशील होतो. म्हणूनच

कदाचित त्यांना जग जवळ आलं असलं तरी माणूस लांब गेला आहे असं वाटत नाही आणि त्याची मूळ प्रवृत्ती बदललेली आहे असंही वाटत नाही.

साहित्याची आवड ललितातार्इंच्या रक्तातच होती, वाचनाचे वेडही अतोनात होते, घरच्या मंडळींनी ते वेड कमी करण्याचे प्रयत्नही केले, परंतु ते कमी व्हायच्या ऐवजी आणखीच वाढले. लग्नानंतर तर हा छंद टिकवण्यासाठी त्यांना तिहेरी कसरत, करावी लागली..... संसार, व्यवसाय आणि लेखन. जीवनात सर्वांना काही गोष्टींत यश तर काही गोष्टींत अपयश येतेच. या यशापयशामुळे लिखाणाला वेगवेगळे विषय मिळतात. ज्यांच्या लिखाणामुळे समाजात मूलभूत फरक होतात, ज्यांच्या साहित्याचा परिणाम काळ बदलला तरी जाणवतो आणि ज्यांच्या लिखाणातून सत्याचं चित्रण असतं, असे लेखक ललितातार्इंना जास्त करून आवडतात. ललितातार्इ एकूण साहित्यनिर्मितीच्या बाबतीत किती जागरूकपणे आणि जाणीवपूर्वक विचार करतात हे यावरून चांगले लक्षात येते.

गौतम बुद्ध, विजय तेंडुलकर, पु. ल. देशपांडे, मालती बेडेकर, पद्मजा फाटक, शांता शेळके हे मराठी भाषिक साहित्यिक व Thomas Jefferson, John Locke, Jean Jack Rousseau,Toni Morriosn, Ernest Hemingway, James Thurber, Williams Shakespeare, हे इंग्रजी लेखक-लेखिका त्यांच्या विशेष आवडीच्या आहेत.

ललितातार्इ स्वत:ला स्त्रीमुक्तीवादी समजतात. त्यांच्या मते, स्त्री तिच्या दृष्टीने मुक्त असली तरी तिच्या पायात समाजाच्या स्त्रीविषयाच्या धारणेच्या बेड्या असतात. बहुतेक स्त्रिया अजूनही दुय्यम स्थानीच आहेत. स्त्रीच्या मुक्ततेला पातळ्या आहेत. अमेरिकेसारख्या पुढारलेल्या देशातही गर्भपात विरोधी चळवळ जारी आहे. तुलनात्मक दृष्ट्या, अमेरिकन स्त्रीला तिचे जीवन तिच्या इच्छेनुसार व्यतीत करण्याची पूर्ण मोकळीक आहे. तशी मोकळीक भारतीय स्त्रीला अजून लाभली नाही. हव्या त्या मुलाशी लग्न करणे, लग्न झाले तरी मूल होऊ न देणे, समलिंगी विवाह करणे, एकटी जगाच्या पाठीवर रहाणे, इत्यादी गोष्टींपासून ती बरेच कोस दूर आहे. भारतीय स्त्रीवर काही प्रमाणात सासरच्या मंडळींची जबाबदारी असते. येथे नवरा बायकोच्या संसारात इतर कोणी ढवळाढवळ करत नाहीत, ना सासरची ना माहेरची.

लेखनाव्यतिरिक्त ललितातार्इंना नृत्यकलेची आवड आहे. लहानपणी त्या सुप्रसिद्ध नर्तिका, रोहिणी भाटे यांच्याकडे नृत्य शिकल्या होत्या. तसेच त्यांना वेगवेगळे देश पाहण्याचा, निसर्गरम्य स्थळांना भेटी द्यायची आवड आहे. जगाच्या इतिहासाचा व त्या त्या समाजातील चालीरीतींचा अभ्यास करण्याचा त्यांना छंद आहे.

त्यांच्या साहित्यसंपदेची यादी लांबलचक आहे. त्यावरून त्यांनी तिहेरी कसरत करूनही विपुल साहित्याची निर्मिती केली आहे हे समजून येते व ते खरोखर कौतुकास्पद आहे.

**वैयक्तिक मराठी कथासंग्रह:**

'तारेवरची कसरत' - श्रीविद्या प्रकाशन, १९८७

'पशुप्रेमियांच्या दुनियेत' - रश्मी प्रकाशन, १९९१

'पक्षी जाय देशांतरा' - उत्कर्ष प्रकाशन, १९९३

**सामायिक मराठी कथा संग्रह :**

'बापलेकी' ('शेवटचं पत्र') - मौज प्रकाशन, १५ जून २००४

'कुंपणापलीकडले शेत' ('एका वस्तीची कथा') - श्रीविद्या प्रकाशन, १९८४

**कादंबरी :**

'दहशतवादाची कथा' - ग्रंथाली प्रकाशन, २००३

ह्या कादंबरीस महाराष्ट्र शासन राज्य-पुरस्कार- २००३-२००४

**एकांकिका /नाटके :**

'पुनर्भेट' (मूळ कल्पना - अशोक अंबर्डेकर)

'घरखरेदी, अमेरिकन स्टाईल'

वरील दोन्ही नाटकांचे स्थानिक मराठी मंडळात प्रयोग.

त्याशिवाय त्या सातत्याने 'एकता' या त्रैमासिकांतून, 'मिळून साऱ्याजणी', 'निहार', 'चैत्राली', 'वसंत', 'मानिनी', 'अनुप्रिता', 'सुवासिनी', 'अवनी', 'अक्षर दिवाळी' या महाराष्ट्रातील अंकांतून आणि 'लोकसत्ता', 'महाराष्ट्र टाईम्स', 'तरुण भारत', 'आजचा सुधारक' इत्यादी वर्तमानपत्रांतून, त्या लेखन करत आल्या आहेत. 'अक्षर दिवाळी' - १९८५, 'मुक्ताफळ' ह्या लेखाची संपादकातर्फे प्रसिद्धीसाठी निवड झाली होती.

**English Short Fictions :**

The Toronto South Asian Review- Spring 1986 – 'Amba'

Our Feet Walk the Sky : Women of South Asian Diaspora – 1993 – Conformist, Alone & Exhibited

The Massachusetts Review Journal of South Asian Literature – Winter 1988-1989- Free and Equal

Weber Studies, Winter 1998 – 'I am Free'

Her Mother's Ashes, stories by South Asian women in Canada

and U.S.A.

Riksha Magazine - Winter 1994 Bureaucracy is Immortal

India Currents, California - July 1990 – Golden Cage

Journal of South Asian Literature – Spring 1986 – Of Baby Bottles & Crying, Unwritten Laws

**Editorials :**

News India Times, N.Y.

India Triburn, Chicago, IL.

Spotlight, Chocago, IL

The story 'Free and Equal' originally published in the Massachusetts Review, was selected by Robert Atwan for his collection, 'Our Times2', readings from recent periodicals. It was also included in 'Across Cultures' a Reader for writers by Sheenia Succua Gillespie and Robert Singleton.

These books are used in college courses.

सध्या ललिताई, आपल्या वैद्यकीय व्यवसायातून निवृत्त झाल्या आहेत आणि नवीन नवीन लेखन करण्यात मग्न आहेत; त्या 'तारेवरची कसरत' लिहोत, 'कुंपणापलीकडे कथा' लिहोत, 'दहशतवादाची कथा' लिहोत, 'पुनर्भेट' लिहोत अथवा वर्तमानपत्रांसाठी वैचारिक लेख लिहित असोत, त्यांची शोधक वृत्ती अप्रतिहतपणे जागी असते आणि नव्या कल्पनांचा, नव्या अनुभूतीचा त्या पाठलाग करीत असल्याची खात्री पटते. ही वृत्तीच त्यांची आत्मनिष्ठा आहे आणि त्यांच्या यशाचे गमक आहे.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

# छाया

**कॉ**लेजकन्यकेचा फोन आला, "या शनिवारी माझं नाटक आहे. शिवाय माझं नवं अपार्टमेंट तुम्ही बघितलं नाही. या वीकेण्डला तुम्ही दोघं माझ्याकडे याल का? माझ्या बेडरूममधेच रात्री राहायला हरकत नाही."

मी फारसा विचार न करता "येऊ" म्हणून आश्वासन दिलं.

आम्ही दोघं शनिवारी सकाळी भल्या पहाटे उठून निघालो. न हरवता मुलीच्या घरी पोहोचलो.

अपार्टमेंट कॉलेजजवळ होतं म्हणून मी खूष झाले. एका तीन मजली घरातला पहिला मजला माझ्या मुलीला व तिच्या सवंगड्यांना मिळाला होता.

दरवाजावरची घंटी वाजवली. एका नाइट-गाऊनमधल्या मुलीने दरवाजा उघडला. मी "हॅलो! आय ॲम ..." वगैरे सुरू करण्याआधीच ती घाईघाईत बोलली, "हॅलो, युवर डॉटर विल बी हिअर सून. हॅव अ सीट" असं बोलत ती समोरच्या लिव्हिंगरूममधे उघडणाऱ्या अनेक दरवाजांपैकी एका दरवाजातून नाहीशी झाली. आम्ही दोघं उघड्या दरवाजासमोरच लिव्हिंगरूमकडे आ वासून बघत उभे राहिलो.

त्या प्रशस्त खोलीत भिंतीलगत दोन सोफा काटकोनात ठेवलेले होते. कॉफी टेबल व एक बुकशेल्फही भिंतीजवळ सरकवून ठेवलेलं होतं. जमिनीवर, सोफ्यावर व कॉफी-टेबलावर कपड्यांचे व पुस्तकांचे ढीग, कार्डबोर्डची डिशेस, भांडी, सीडीज् व इतर वस्तूंनी भरलेली बॉक्सेस, फोल्डिंग लोखंडी खुर्च्या, टेबल-लॅम्पस् इ.इ. पसरलेले होते. "ही कार्टी "बसा" म्हणून सांगते खरी पण कुठे बसायचं ते का सांगत नाही? असा प्रश्न मनात घोळवत मी स्तब्ध उभी होते. शेवटी नवरा जागा झाला. त्याने मला पुढे ढकललं व स्वत: आत सरकून दरवाजा बंद केला.

"पोरगी असती तर तिला रागावता तरी आलं असतं" नवरा म्हणाला.

"म्हणूनच ती बेपत्ता झाली असावी" मी सांगितलं.

हळूहळू आम्ही दोघेही त्या ऑबस्टेकल कोर्समधून सोफ्याच्या दिशेने वाटचाल करण्याचा प्रयत्न करू लागलो. वाटेतला एक कपड्यांचा ढिगारा मी पायाने दूर सारला. तर "मियू" म्हणत एका पांढऱ्या शुभ्र मांजराच्या पिल्लाने माझ्या पायावर उडी मारली. मी (अर्थातच) किंचाळले. परिणामी त्या लिव्हिंगरूममधे उघडणाऱ्या

दरवाजातून व किचनमधून दहाबारा मुलगे व मुली पजामा, नाइट-गाऊन, गुंडाळलेला टॉवेल अशा धर्तीच्या पेहेरावातून धावत आले.

"किटन पाउन्सड् ऑन हर फुट" ह्या नवऱ्याच्या खुलाश्याला मिस्कील हसून माझ्या ओशाळलेल्या चेहेऱ्याकडे न बघता ते सगळे आपापल्या घुडसुलात घुसून बेपत्ता झाले.

मी म्हटलं, "या कपड्यांच्या ढिगाऱ्यात एखादी गुहाबिहा आहे वाटतं ?"

नवरा म्हणाल, "असेल असेल. त्यात मांजराचं पिल्लूच काय वाघाचं पूर्ण कुटुंबही राहत असेल.

त्याने सोफ्यावरचे कपडे ढकलून स्वत:ला बसायला जागा केली आणि तिथलंच एक पुस्तक घेऊन तो स्थानापन्न झाला.

मला किचनमधलं सिंक लिव्हिंगरूमममधून दिसत होतं. सिंकमधे भांडी, मगज्, डिशेस, काटे-चमचे यांचा पिरॅमिड होता. त्या पिरॅमिडच्या कळसावर विराजमान झालेल्या कपाला बोट लावलं असतं तर अख्खा पिरॅमिड कोसळला असता. "किचन आवरावं" हा (बायकी) विचार मी मनातून, पायातून काटा उपटावा तसा उपटून टाकला.

एव्हाना लिव्हिंगरूम व किचनलगतच्या बेडरूमस्‌मधून वेगवेगळ्या वाद्यांचे आवाज येऊ लागले होते. त्या कलाकारांच्या कॉलेजमध्ये म्युझिकची प्रॅक्टिस अपेक्षितच होती. तरीसुद्धा मी नवऱ्याला विचारलं, "ह्या गोंगाटाला म्युझिक म्हणतात का ? "

तो म्हणाला, "ते तुला आणि तुझ्या मुलीला माहीत ! असलं ज्ञान माझ्यासारख्या रुक्ष माणसाला कसं असेल ?"

एव्हाना मला चहाची तल्लफ आली होती. डोकं किणकिणायला लागलं होतं. वाद्यांच्या ठणठणाटामुळे डोकेदुखी हळूहळू तीव्र होऊ लागली.

मी म्हटलं, "मला एक कप चहा हवाय."

"मलाही हवाय" असं म्हणत नवऱ्याने किचनकडे बोट दाखवलं. नवऱ्याचं आज्ञापालन करायचं ठरवून मी नाइलाजाने चहा करण्याचा साहसी निर्णय घेतला. तोच ती दार उघडणारी सुंदरी (मेंटल टेलिपथीने संदेश मिळाल्यासारखी) किचनमधे उगवली.

"आय ॲम सपोझड् टू मेक टी फॉर यू" असं म्हणत किचन कॅबिनेटमधून छोट्या रंगीत बॉक्समधून चहाच्या पुड्या काढू लागली. "ग्रीन टी ? जास्मिन ? चाममाइल ? अर्बल ? व्हॉट वुड यू लाइक ?"

तिच्याकडे खरा चहा सोडून सगळं काही होतं. खरा चहा नाही ह्या विचाराने

माझ्या डोक्याची किणकिण आणखीच वाढू लागली. तोच दरवाजा ढकलून आमची कन्या कपडे तुडवत, बॉक्सांवरून उड्या मारत धावत आत आली. मिठ्याबिठ्या मारून झाल्यावर म्हणाली, "मी तुमच्यासाठी खरा चहा लपवून ठेवलाय." कॅबिनेटमधल्या बॉक्सेस्, कॅनस्, डिशेस्, बोलस् इ.इ. च्या जंगलातून तिने एका प्लॅस्टिकच्या सँडविच बॅगेतून खऱ्या चहाच्या पुड्या काढल्या. "मी घरून येतानाच आणल्या होत्या." तिने सांगितलं. तिची ही दूरदृष्टी ओळखून मी खूष झाले.

मग तिची बडबड सुरू झाली. "सकाळी नाटकाची शेवटची प्रॅक्टिस होती. दुपारी चार वाजता मला थिएटरमधे पोचायचं आहे. आपण कुठेतरी लंचला जाऊ आणि मम्मी, आम्ही सगळे फार बिझी असतो ना म्हणून इथे एवढा पसारा आहे. नाटक झाल्यावर आवरू." वगैरे वगैरे.

चहानंतर अपार्टमेंट बघण्याचा कार्यक्रम झाला. प्रत्येक खोलीत दोनतीनजण तरी होते. सगळ्यांची तिने ओळख करून दिली. (मी सगळी नावं ताबडतोब विसरले.) मग लंचला गेलो. ऑर्डर दिल्यावर नवऱ्याने विचारलं, "तुझ्या अपार्टमेंटमधे चौघेजण राहणार असं म्हणत होतीस. मग येवढी मुलं कुठून आली?"

"काय करणार? येतात." तिने सांगितलं. "आम्ही सगळे फार पॉप्युलर आहोत."

"ह्या काम्यूनमधे तुझा अभ्यास कसा होणार?"

"तुम्ही काळजी करू नका. मी नीट अभ्यास करते." तिने आश्वासन दिलं व वरती मखलाशी केली, "हा प्रश्न तुम्ही मला विचारणार असं मला वाटलंच होतं." (मुलं आईबापांना ओळखतात.)

चार वाजता आम्ही तिला थिएटरसमोर सोडलं. मग अडीच तास इकडेतिकडे घालवून सातला नाटकाला गेलो. नाटक एडस् विषयी होतं. नाटकात तरुणतरुणींना एडस् दाखवला होता. माझी मुलगी पांढरा कोट घालून व गळ्यात स्टेथॉस्कोप लटकवून डॉक्टर झाली होती. नाटक उत्तम झालं. ग्रीक ट्रॅजेडीसारखं ते नाटक बघून मी खिन्न झाले.

नाटक संपल्यावर कास्ट पार्टी व जेवण होतं. त्या पार्टीला आमच्यासारखे नटनटींचे आईवडीलही उपस्थित होते. पार्टीत उत्साही, खिदळणाऱ्या मुलामुलींना बघून माझी उदासी विरली.

एका मुलीच्या आईने मला सांगितलं, "पूर्वी लग्नाआधी मुली प्रेग्नंट होतील अशी काळजी होती. या एडस्मुळे ती काळजी पत्करली असं मला वाटायला लागलं आहे."

त्या पार्टीत मुलंमुली परत उल्हसित झाल्या. पण आमच्यासारखे सगळे आईवडील

मालवल्यासारखे झालेले होते.

ती पार्टी संपून मुलीच्या अपार्टमेंटला पोचेपर्यंत रात्रीचे बारा वाजले.

अपार्टमेंटमधे पाऊल टाकताच लिव्हिंगरूममधे एक मुलींचा घोळकाच मला दिसला. आम्हाला बघताच एक मुलगी त्या घोळक्यातून बाहेर पडली व धावत येऊन हुंदके देत माझ्या मुलीच्या गळ्यात पडली. "ओ, दॅटस् टू बॅड. वुई आर हिअर टू हेल्प यू" अशी बडबड मुलीने सुरू करताच कुणी तरी स्वर्गाला पोचलं अशी माझी खात्री झाली. तो घोळका परत त्या मुलीभोवती जमला व तिची समजूत घालण्याचं काम करू लागला.

मधेच एक मुलगी, "फरगेट हिम. ही वॉज अ जर्क टू डू धिस टू यू " असं म्हणाली आणि माझ्या डोक्यात प्रकाश पडला. कुणी स्वर्गाला पोचलं नव्हतं. त्या मुलीचा प्रेमभंग झाला होता.

मग माझ्या मनात विचार आला, "प्रेमभंग आणि मृत्यू यांच्यात साम्य नक्कीच आहे. आपण त्या माणसाला मुकतो." तो विचार मी नवऱ्याला बोलून दाखवला तर तो म्हणाला, "शहाणी आहेस. मेलेला माणूस परत भेटण्याची शक्यता असते का ?"

माझा नवरा अगदी प्रॅक्टिकल माणूस आहे.

सांत्वन करणाऱ्या घोळक्यातून एक एक करून मुलगे व मुली फुटू लागल्या. मग मला बाजूला ओढून एक मुलगी एडस्‌विषयी प्रश्न विचारू लागली. हळूहळू माझ्याभोवती एक घोळकाच जमला. मी त्या मुलांना समजेल अशा भाषेत उत्तरं देऊ लागले.

त्या दिवशी ह्या मुलांच्या उफाळत्या तारुण्यसुलभ उर्मीवर एडस्‌ची भीषण छाया पडली होती हे मला तीव्रतेने जाणवलं.

एका मुलीने मला "मधून मधून काही जण रक्तदान करायला जातात. रक्त घेतलं नाही तर आपण एच्. आय.व्ही. पॉझिटिव्ह आहोत असं समजतात" म्हणून सांगितलं. (ही ट्रीक मला प्रथमच कळली.) "रक्त न स्वीकारायला इतरही कारणं असू शकतात." मी त्या मुलीला सांगितलं. "तुम्ही सगळे प्रोटेक्शन वापरता का ?" हा जिभेवर आलेला प्रश्न मी परतवला.

माझी मुलगी अजूनही सांत्वनात गुंतली होती. त्या सांत्वनातून ती अकस्मात जागी झाली. "मॉम, डॅड, यू मस्ट बी टायर्ड." असं म्हणत आम्हाला तिच्या खोलीत घेऊन गेली.

तिच्या खोलीच्या दरवाजावर "कीप द डोअर क्लोजड्" असं लिहिलेला कागद स्कॉच टेपने चिकटवलेला मी सकाळीच पाहिला होता. अभ्यासात व्यत्यय नको म्हणून तिने तो चिकटवला असेल असा मी अंदाज केला होता व खूषही झाले होते.

त्या कागदाकडे बघत ती म्हणाली, "मॉम, डॅड, माझ्या खोलीत एक साप आहे."

ओठापर्यंत आलेली किंकाळी मी दाबली. मुलगी सांगू लागली, "सकाळी रस्ता क्रॉस करताना तो मला सापडला. कारखाली मरेल म्हणून माझ्या खोलीतल्या रबर प्लँटमधे मी त्याला सोडला."

"मी साप असलेल्या खोलीत झोपणार नाही!" मी जाहीर केलं.

नवरा वैतागला, "इथले साप विषारी नसतात. तो साप तुला काही करणार नाही. उलट रात्री तो तुझ्या अंगाखाली आला तर तोच चिरडून मरेल. उगाच तक्रार करू नकोस."

एव्हाना मुलगी रबर प्लँटमधे साप शोधत होती. तो अर्थात बेपत्ता होता. "मॉम, मी साप सापडवते. मग तो आपण वुडस्‌मधे सोडून येऊ." नवरा पण साप शोधू लागला. मी पाय वर घेऊन बेडमधे बसून राहिले. शेवटी तो साप एका फोटो फ्रेममागे सापडला. साप कसला, सापाचं लहानसं पिल्लूच होतं.

मग मुलगी वडिलांना सोबत घेऊन सापाला वुडस् अभयारण्यात सोडायला निघाली. ती लिव्हिंगरूममधे पोचताच सापाला बघून मुलांनी काढलेले "हाउ क्यूट" वगैरे उद्‌गार माझ्या कानी आले. त्यात दोन तीन किंचाळ्यांचाही समावेश होता. किंचाळ्या ऐकून मला बरं वाटलं. (माझ्यासारखे काहीजण भित्रे होते म्हणून माझं समाधान झालं.)

निजानिज होऊन शांतता पसरेपर्यंत दोन तरी वाजले असतील. जरा झोप लागते न लागते तोच दरवाजावरची घंटी वाजू लागली. मी झोपून राहिले पण नवरा उठून कोण आलं बघायला गेला. "ब्रॉडवे शोची प्रॅक्टिस करायला चौघेजण आले आहेत." तो परत येत म्हणाला.

"ब्रॉडवे शो!" मी ताडकन उठून बसले. न्यूयॉर्कच्या ब्रॉडवे शोला जाण्याची माझी महत्त्वाकांक्षा क्वचितच पुरी होत असे. इथे तर शो राहत्या जागीच स्वतःच्या पावलांनी चालून आला होता. मी डोळे ताणत उठले व लिव्हिंगरूममधे गाणी व म्युझिक ऐकत बसले. मगासच्या म्युझिकपेक्षा हे म्युझिक सुसंगत व गोड होतं. अर्धवट झोपेतही ते मला आवडत होतं.

तासाभराने परत दरवाजाची घंटी वाजली. दरवाजा उघडून बघितलं तर बाहेर एक मुलगी उभी - हातातल्या पिंजऱ्यात कुत्र्याचं पिल्लू.

ती आत आली व तावातावाने तिचं आणि बॉयफ्रेंडचं भांडण कसं झालं हे तिच्या सभोवताली जमलेल्यांना सांगू लागली. (ती रडायच्याऐवजी चिडली म्हणून माझ्यातल्या स्त्रीमुक्तीच्या अंशाला आनंद झाला.) ती बॉयफ्रेंडच्या नावाने शंख करत असताना मांजराचं पिल्लू कुठून तरी उगवलं. आणि पिंजऱ्यातल्या कुत्र्याच्या पिल्लाकडे

बघत गुरगुरत, होतं त्याच्या दुप्पट फुललं. कुत्र्याचं पिल्लू घाबरून पिंजऱ्याच्या एक कोपऱ्यात दडू लागलं. शेवटी कुणी एक मुलगी नवागत पाहुणीला म्हणाली, "तू इथे राहू शकशील. पण या पिल्लाचं काय करणार ?" मग दोन तीन फोन केले गेले. एक मुलगा थोड्या वेळात आला व कुत्र्याच्या पिल्लाला घेऊन गेला. मी ब्रॉडवे शोचा नाद सोडून झोपायला गेले.

चांगलं उजाडेपर्यंत वाद्यवादन व गाणी चालू होती.

दहा वाजता उठून आम्ही परत जायला तयार झालो. अपार्टमेंट सुस्त झोपेत होतं. एका किचनमधे खुडबुडणाऱ्या मुलाला मी माझ्या मुलीला उठवायला पाठवलं.

त्याने तिला खोल्या शोधून एका खोलीमधून उठवून आणली. डोळे चोळत ती "आपण ब्रेकफास्टला जाऊया" म्हणू लागली. मी म्हटलं, "तू झोप. आम्ही निघतो. वाटेत ब्रेकफास्ट घेऊ." ती मानेनेच "हो" म्हणाली आणि अपार्टमेंटच्या दरवाजापर्यंत आम्हाला सोडायला आली. आम्ही तिला "बाय" म्हणत जायला निघालो. तिने दरवाजा बंद करण्याआधी मी मनात घोळत असलेला प्रश्न विचारला, "हा काय प्रेमभंगाचा वीकेण्ड होता ?"

ती म्हणाली, "ममी, इथे असं नेहेमीच चालतं. त्या दोघींचं हे तिसरंचौथं प्रेमप्रकरण असेल."

आम्ही पाठ फिरवताच तिने दरवाजा बंद केला आणि आम्ही कारपर्यंत पोचतो न पोचतो तोच ती "मम्मी, डॅडी" अशा हाका मारत अनवाणीच आमच्या मागे धावत आली.

"काय ग ? अशी का आलीस ?" मी विचारू लागले. तिने सहज प्रश्न फेकला, "तुम्ही मांजराचं पिल्लू नेता का ?"

"तुझ्या बदली मांजराला पाठवतेयस का ?" मी हसत म्हटलं.

"तसं नाही मम्मी" ती थोडी अडखळली. "आमचा चवथा पार्टनर येतोय ना त्याची एच.आय.व्ही. टेस्ट पॉझिटिव्ह आलीय. डॉक्टरांनी त्याला मांजराकुत्र्यांपासून दूर राहा म्हणून सांगितलंय."

ती फक्त छाया नव्हती. शत्रू घरातच घुसला होता.

Lalita Gandbhir
65 Oxford Rd.Newton,
MA 02459 U.S.A.
**email - lalitagandbhir@hotmail.com.**

************

## पडद्यामागील सूत्रधार : विनायक गोखले



**''ए**कता'' आणि विनायक गोखले हे जणू समीकरणच झाले आहे. टोरोन्टोचे श्री. विनायक गोखले आणि तेथूनच गेली ३० वर्षांहून अधिक काळ प्रसिद्ध होणाऱ्या ''एकता'' या त्रैमासिकाबाबत मी बोलतो आहे. विनायकरावांशी या पुस्तकासाठी संपर्क साधण्यासाठी कारखानीसांनी मला त्यांचा ई–मेलचा पत्ता पाठवला. तो होता **meparlekar@gmail.com.** विनायकरावांना मी ई–मेल पाठविली आणि त्यांना जेव्हा सांगितले, की मीहि पार्लेकर आहे तेव्हा त्यांना तेव्हढाच आनंद झाला. त्यांना मी माझ्या संपर्क साधण्याचे कारण सांगितले.

" **विनायकराव, तुमची मुलाखतवजा माहिती आमच्या या अमेरिकावासी/ कॅनडावासी लेखकांच्या पुस्तकाला हवी आहे.**"

" अहो, मी काही लेखन केले नाहीं, कथासंग्रह, कवितासंग्रह वगैरे प्रसिद्ध केले नाहीत तर मी कसा या तुमच्या पुस्तकाच्या विषयाला योग्य होईन ?"

" तुम्ही भले काही कथासंग्रह प्रसिद्ध केले नसतील, तरी 'मराठी', भारताबाहेर जपण्याचे भरीव, अमूल्य कार्य तुम्ही गेले ३२ वर्षे अविरत परिश्रम करून चालू ठेवले आहे, त्याला तोड नाही. 'एकता' साठी लेखन प्रसिद्ध करायच्या मागे किती परिश्रम असतात, हे तुमच्या "एकता"च्या कामगिरीवरून सर्व वाचकांपर्यंत आम्हाला पोहोचवायचे आहे. शिवाय, तुम्ही तुमच्या स्पष्ट आणि परखड विचारांचे संपादकीयही एकता मधून इतकी वर्षे लिहित आला आहात की. तेव्हां त्यात कसला संकोच मानू नका. तुमचा हा विनयच सर्व काही सांगून गेला. मला कल्पना आहे की "एकता"चे सूत्रधार तुम्ही आहात."

" **बरं,या संदर्भात मला हे सांगा की, "एकता " हे त्रैमासिक चालू करायची कल्पना तुम्हाला कशी सुचली आणि त्याची पार्श्वभूमी काय?**"

" 'एकता' ह्या त्रैमासिकाची मुहूर्तमेढ आम्ही १९७८ च्या दिवाळीच्या दरम्यान

बसवली. त्याचं काय झालं, की टोरांटो, कॅनडा मधील अशोक पांगारकर, प्रकाश अढावकर, अशा उत्साही मंडळींच्या डोक्यात उत्तर अमेरिकेत एखादे मराठी त्रैमासिक चालू करावे, अशी कल्पना आली. त्यानंतर १९७८ च्या दिवाळीला अमेरिकेतील पिट्सबर्ग येथील डॉ. जोशी यांच्या घरी आम्ही जमलो असताना, ह्या कल्पनेवर शिक्कामोर्तब झाले व "एकता" हे नांवही एकमताने मंजूर झाले. टोरोन्टो मराठी भाषिक मंडळाच्या "स्नेहबंध" ह्या हस्तलिखित वार्तापत्राच्या संपादनाची जबाबदारी माझ्यावर होती. त्यामुळे कदाचित म्हणा, "एकता"च्या संपादनाची जबाबदारीही सर्वमुखाने माझ्याकडेच आली."

**" एक नवीन मासिक सुरू करतांना तुम्हाला इतरांचे सहाय्य लागले असेलच आणि बऱ्याच अडचणी आल्या असतील, नाही का?"**

" हो. नवीन मासिक काढणं हे काम एकट्याचे नाही. त्याला सांघिक कार्याची, ज्याला येथे आपण Team Work म्हणतो, त्याची जरुरी आहे. सुदैवाने, मला मेहनतीने, आवडीने काम करणारे स्वयंसेवक लाभले. त्यात सुरुवातीपासून सहाय्य देणाऱ्यांमध्ये, सह-संपादक दुर्गा पाच्छापुरकर, न्यूयॉर्कच्या सुषमा येरवडेकर, लेखनिक म्हणून राजश्री मनोहर, विनिता उटगीकर, छाया कुलकर्णी, ललिता गोडसे, जाहिराती, प्रसारण आणि वितरणाचे काम करणारे अशोक पांगारकर तसेच, सदाशिव आणि शोभा धारवाडकर यांचा उल्लेख करता येईल. ही सहाय्यकांची यादी मग वाढतच गेली. जुने कार्यकर्ते निवृत्त होऊन नवीन आले. त्यात, व्हांकूवरच्या विद्युल्लेखा अकलूजकर, वॉशिंगटन डी.सी. चे दिलीप चित्रे, लॉस एंजलीसचे श्रीनिवास माटे, पिट्सबर्गचे अरुण जतकर यांची भर पडली. सुरुवातीची दहा वर्षे अंक हस्तलिखितच होता. संगणकाचा सर्रास वापर व्हायला लागल्यावर मिशिगनचे प्रा. माधव देशपांडे यांनी बनवलेला मराठी फॉन्ट वापरायला सुरुवात केली व पुढे कॅलिफोर्नियातील श्रीकृष्ण पाटील यांनी बनवलेला मराठी फॉन्ट वापरायला सुरुवात केली. एकताचे काम करत असतांना मला अनेक मान्यवर व्यक्ती भेटल्या व त्यांचा परिचय झाला; त्यांच्याकडून शिकायला मिळाले; मैत्री दृढ झाली; ती अजूनही टिकून आहे. या सर्व यशात माझ्या सहचारिणीला, प्रतिभाला विसरून चालणार नाही. तिच्या आणि राजीव व अनिल या दोन मुलांच्या सहकार्याशिवाय हा एकताचा मेरू मी यशस्वीपणे उचलू शकलो नसतो. या व्यतिरिक्त, ईलीनॉयच्या जयश्री हुपरीकर, कॅलिफोर्नियाच्या संध्या कर्णिक आणि शालिनीताई सराफ यांचा एकताचा प्रसार करण्यास बहुमोल सहाय्य लाभले."

"सुरुवातीच्या अडचणी म्हणाल तर, सध्या सहजा सहजी उपलब्ध असलेल्या सोयी त्यावेळी नव्हत्या. अंक सोमवारी छपाईला जाणार असेल तर, त्याआधीच्या शनिवार/रविवारी आमची तरांबळ असते. सर्वांना कामे आधीच वाटून दिलेली असतात. तपासून प्रसिद्धीला तयार झालेले साहित्य आणि जाहिराती यांचा मेळ घालून पानांची जुळवा-जुळव करायची व अंक छपाईला द्यायचा. त्याच्या प्रती शुक्रवारी आल्या की त्याच रात्री पाकिटात घालून पोस्टात टाकण्यास तयार ठेवायच्या व दुसऱ्या दिवशी स्वत: जाऊन पोस्ट करायच्या. अर्थात, अद्यापही ही कामे मी इतर सहकार्यांच्या मदतीने करत असतो."

**" एकताच्या साहित्य निवडीबद्दल किंवा लेखकांच्या निवडीबद्दल काही सांगू शकाल का?"**

" 'एकता' निर्मितीवेळी सर्वानुमते सारखे धोरण आखले गेले ते हे, की अमेरिका आणि कॅनडातील लेखकांना प्राधान्य द्यायचे. हाती आलेल्या साहित्यातील लेख, कथा, कविता तपासून त्यांच्यावर संपादकीय संस्कार केले जातात. छोटे फेरबदल करण्याचा अधिकार निवड समितीकडे रहातो. इतर देशातील लेखकांचेही साहित्य आम्ही वेळोवळी प्रसिद्ध करतो. एकताच्या मुखपृष्ठासाठी व इतर सजावटीसाठी, अमेरिकेतील वीणा शहा आणि टोरोन्टोतील अरविंद नारळे यांचे सहाय्य गेली बरीच वर्षे लाभत आले आहे."

" 'एकता' हे नि:खळ वांङमयीन नियतकालिक नाही. परदेशात ज्या पार्श्वभूमिकेवर या नियतकालिकाची सुरुवात झाली, त्यात सर्व प्रकारच्या जीवन क्षेत्रासंबंधी वाचकांना जागरूक करणे, हे एकताचे ध्येयधोरण राहिले आहे. त्यामुळेच, 'एकता' ला एक वेगळीच वैशिष्ठ्यता लाभली आहे. एकताला लाभलेले यश आणि त्याचे रहस्य लक्षात घेता, तिच्या निर्मितीशी संबंधित असलेली मनें प्राय: महाराष्ट्रापासून कित्येक योजने दूर आहेत. या सर्वांचे शिक्षण महाराष्ट्रातील वेगवेगळ्या प्राथमिक व माध्यमिक शाळांतून झालेले आहे. आपल्या गुणवत्तेचे आणि शिक्षणाचे चीज करण्याकरता आलेली ही मंडळी, आपली भाषा, आपली संस्कृती, आपले ग्रंथ आणि साहित्य-कलांचे संस्कार बरोबर घेऊन आली. या प्रत्येकाचे कामाचे आणि अर्थार्जनाचे क्षेत्र वेगवेगळे आहे व कोणत्याही आर्थिक फायद्याची अपेक्षा न धरता, ही मनें काहीतरी वेगळे करण्याचा प्रयत्न करीत आली आहेत. एखाद्या प्रगत, अनोख्या अशा विश्वात कितीही रममाण झालो तरी आपल्या मनाच्या कोपऱ्यातील दारे केव्हांतरी एकांतात किलकिली होऊन पूर्वस्मृतींमध्ये बुडून जातातच!"

**"तुमच्या लहानपणाबद्दल थोडसं, आणि एखाद्या अविस्मरणीय घटनेबद्दल काही सांगाल का?"**

" माझा जन्म आणि ९-१० वर्षापर्यंतचे बालपण रत्नागिरी जिल्ह्यातील विजयदुर्ग येथे झाले. कोकणांत कैऱ्या, चिंचा, बोरे आदींची रेलचेल होती, त्या मोसमात ही फळे झाडावर चढून चाखायची लज्जतही औरच होती. एक न विसरणारी आणि काळजाला भेदणारी घटना मी अनुभवली. एकदा बरोबरच्या वात्रट सवंगड्यांनी मला तुडुंब भरलेल्या हौदात ढकलले. पोहोता येत नसल्यामुळे मी गटांगळ्या खायला लागलो, त्याची त्या वात्रट सवंगड्यांना मजा वाटली. मी बुडणार असे पाहून, एका मुलाने मला वर काढले, पालथा घालून पोटात गेलेले पाणी बाहेर काढले. मी अर्धवट शुद्धीवर असल्याने पुसटच आठवते. मला अजूनही वाटते, की माझा त्या दिवशी पुन:र्जन्म झाला."

**"तुमचे तत्त्वचिंतन, साधना, सामाजिक जागृती याबद्दल काय मत आहे?"**

" तत्त्वचिंतन हे प्रत्येकाच्या आयुष्यात हवे, साधनेची बैठक हवी आणि स्वत:च्या बरोबर इतरांचेही मनोरंजन करणारे लिखाण, संभाषण करण्याचा प्रत्येकाने प्रयत्न करावा असे मला वाटते. ज्या समाजाने आपल्यास इथपर्यंत आणून पोहोचवले, त्या समाजाचे आपण काही ऋण लागतो ही भावना जागृत ठेवली पाहिजे. त्यासाठी आपण समाजासाठी काहीतरी केले पाहिजे, हे नक्की. १९८४ साली कॅनडात इतर तिघांबरोबर 'महाराष्ट्र सेवा समिती' या धर्मादाय संस्थेची स्थापना केली व अजूनही त्या संस्थेसाठी शक्य होईल तेव्हढी मदत करत असतो."

**"दोन पिढींमधील मतभेद, मुलांची संस्कृती आणि बदलत्या जगाबद्दल तुम्हाला काय वाटते?"**

"पिढ्यां पिढ्यांमध्ये होणारे बदल अटळ आहेत, मग तुम्ही जगात कोठेही असा. जुन्या गोष्टी कालबाह्य झाल्यासारख्या वाटल्या तरी 'जुने ते सोने' ह्या विचाराने त्या अवलंबन करण्यास काहीच हरकत नसावी. आपल्या आधीच्या पिढीतील लोकांना त्यापासून बरेच काही शिकायला मिळाले आहे, हे निश्चित."

"मुलांच्या संस्कृतीबद्दल म्हणाल तर, मी ४५ वर्षापूर्वी भारत सोडला, मुलांचा जन्म येथे झाला, त्यांना आपल्या व इथल्या संस्कृतींची ओळख, घरच्या वातावरणातून, शाळा-कॉलेज मधून, समाजातल्या लोकांकडून मिळाली आहे. सारासार विचार

करून प्रत्येक संस्कृतीमधून ज्या काही चांगल्या गोष्टी आहेत त्या जरुर घ्याव्यात. एखादी गोष्ट परंपरेनुसार चालू आहे म्हणून ती बदलायची नाही, हे मनाला पटत नाही. पुढील पिढीला तर बिलकुल पटणार नाही. बदलत्या जगात चांगल्या व वाईट गोष्टी येत आहेत आणि येत रहातील. अशावेळी आपण आपल्यासाठी आणि मुलाबाळांसाठी काय घ्यायचे हे विचारपूर्वक ठरवणे आवश्यक आहे. नवीन पिढीने जुन्या पिढीला मान द्यावा, पण गैरवाजवी नको. वडीलधाऱ्या मंडळींना सगळ्या गोष्टींचे ज्ञान असते असे नाही, तेव्हां त्यांनी पुढील पिढीकडूनही शिकण्यात कमीपणा मानू नये."

**"मग या बदलत्या जगात माणूसही बदलला आहे किंवा लांब गेला आहे असं तुम्हाला वाटतं का?"**

" कालौघाबरोबर माणूस बदलणे अपरिहार्य आहे असं मला वाटतं. त्याचं कारण म्हणजे, त्याचं वागणं. काहीजण इतरांचा विचार न करताच वागत असतात. त्यामुळे ती एकमेकांपासून दूर होतात. पण माणुसकी बदलली आहे असं मला नाही वाटत. माणुसकीची मूल्ये शाश्वत असतात. कोणत्याही कालांत आणि माणूस कितीही बदलत गेला, तरी माणुसकी शिल्लक रहाणारच आहे."

व्यवसायाने तुम्ही स्थापत्य विशारद (Architect), असं असतांना तुमच्यात मराठी साहित्याची आवड कशी निर्माण झाली ? तुमचे आवडते साहित्यिक कोण ?

"शाळेत असतांपासून वाचनाची आवड होती व त्यावेळचे माझे आवडते लेखक म्हणजे, पु.ल.देशपांडे, आचार्य प्र.के.अत्रे, व.पु.काळे, द.म.मिरासदार हे होते, ह्या सर्वांचे साहित्य वाचून आवड निर्माण झाली."

**"भारताबाहेर, 'मराठी' भाषा, संस्कृती तुम्ही जपलीत, तर तुम्हाला भारताची ओढ वाटते का?"**

"भारताच्या एकूण प्रगती बद्दल चांगले वाचायला, ऐकायला मिळाले की अभिमान वाटतो, आणि भेट देण्याची इच्छा बळावते."

**"तुमच्या पिढीत आलेल्या मंडळींची मुले येथेच जन्माला आली आहेत. साहजिकच, त्यांचा दृष्टीकोन, आयुष्याकडे पहाण्याची दृष्टी वेगळी असेल, त्यांचे विवाहही आंतरदेशीय होऊन राहिलेले दिसून येत आहेत. त्याबद्दल तुम्हाला काय वाटतं?"**

"आंतरदेशीय विवाह आता सर्रास होता आहेत, आणि त्याचे प्रमाण वाढतच राहिल, असं वाटतं. आमच्या मुलाने नुकतेच चीनी मुलीशी लग्न केले. लग्न हिंदू व कॅथलिक अशा दोन्ही पद्धतीने झाले. दोघांपैकी कोणीही धर्म बदलला नाही. आमच्या माहितीतल्या मित्र मंडळींच्या मुला/मुलींनीही आंतरदेशीय जोडीदार निवडले आहेत. त्यांच्या मुला-बाळांनी कोणता धर्म स्वीकारायचा व कोणते संस्कार आचरणात आणायला पाहिजेत, ते मुलांच्या आई-वडिलांनी ठरवायला हवे. आपण मार्गदर्शन करावे, परंतु निर्णय त्यांचा त्यांनीच घ्यावा, असे वाटते."

विनायकराव गोखले कदाचित तुमच्या मनांत भरावे अशा व्यक्तिमत्वाचे नसतील, पण जसजसा त्यांचा परिचय आणि सहवास वाढत जातो, तसतसे त्यांच्या चिंतनशील आणि प्रबुध्द व्यक्तिमत्वाचे पैलू उलगडत जातात. मायबोलीचा सेतू बांधणारा हा संपादक आमचे मानचिन्ह आहे, हे प्रत्येक मराठी अनिवासियाने लक्षांत घेतले पाहिजे.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

## इवलेसे रोप लावियले दारी...
## तयाचा वेलु गेला गगनावेरी...

एकता ह्या अंकापासून रौप्यमहोत्सवी वर्षात पदार्पण करत आहे यावर क्षणभर विश्वासच बसत नाही. सुरुवातीच्या काळातील बऱ्याच घटना व प्रसंग पडद्यावरील चित्रांप्रमाणे झपाझप डोळ्यांसमोरून जात असताना अनेक व्यक्तींच्या सहकार्यामुळे एकताने ही मजल गाठली याची जाणीव झाली. इवल्याशा रोपाची बरीच वाढ होऊन आणखी उंची गाठायला ते निघाले आहे याचा अतिशय आनंद होतोय.

एकताशी माझा संबंध येणं हे देवाजींच्या मनात किंवा विधिलिखित असावं. कारण मी स्वत:हून त्यादृष्टीने प्रयत्न केले नव्हते. १९७८ साली टोरांटोतील मराठी भाषिक मंडळाच्या कार्यकारिणीवर येण्याचा आग्रह मला श्री. अजित कुकडे यांनी केला व हस्ताक्षर चांगले असल्यामुळे 'स्नेहबंध' ह्या वार्तापत्रिकेचा संपादक म्हणून माझी नेमणूक झाली. त्याच सुमारास श्री. अशोक पांगारकर व काही मित्रमंडळी एकता त्रैमासिक सुरू करण्याच्या विचारात होते. 'स्नेहबंध'ची माझी कामगिरी त्यांना इतकी आवडली की एकताच्या संपादकपदाची जबाबदारी मी स्वीकारावी असा त्यांनी हट्ट धरला. अंकाच्या स्थापनेतील गोष्टींचा निर्णय घेण्यात मी सामील झालो व ह्या उपक्रमाची माहिती देणारी निवेदने सुवाच्य अक्षरात तयार करण्याची व पत्रव्यवहाराची जबाबदारी पुढील काही महिने सांभाळली. अनेक अडचणींशी मुकाबला करून १९७९ मध्ये फेब्रुवारी महिन्यात पहिला अंक प्रसिद्ध झाला. वाचकांनी पत्रे पाठवून व दूरध्वनीने अभिप्राय कळविल्यावर अंकाचे उत्तम प्रकारे स्वागत झाल्याचे आमच्या लक्षात आले व कामाचा उत्साह वाढला.

वाचकांच्या कल्पना-सूचना विचारात घेऊन योग्य ते फेरबदल करत राहिलो व अंक सर्वांना वाचनीय वाटावा असे प्रयोग कसोशीने चालू ठेवले. श्री. सुभाष व सौ. मनिषा भागवत यांच्या सूचनेनुसार 'गाठभेट' सदर दुसऱ्या अंकापासून सुरू झाले तर 'आजीव सभासद' योजना डॉ. मनोहर केळकर यांच्या पुढाकाराने सहाव्या अंकापासून सुरू झाली. अंक हस्तलिखित असल्यामुळे चांगले हस्ताक्षर असणाऱ्या सौ. राजश्री मनोहर, सौ. ललिता गोडसे, सौ. दुर्गा पाच्छापूरकर, सौ. छाया कुळकर्णी व सौ. विनिता उटगीकर यांची सुरूवातीच्या काळात खूप मदत झाली. ठिकठिकाणी एकताचा प्रसार करण्यासाठी सौ. शालिनी सराफ, कै. वासंती अभ्यंकर, सौ. शुभा

जोशी, सौ. जयश्री हुपरीकर, सौ. सविता जोशी, सौ. संध्या कर्णिक यांच्यासारखे गावोगावचे अनेक प्रतिनिधी पुढे आले. अंक टोरांटोत प्रसिद्ध होत असल्यामुळे सोयीसाठी म्हणून कार्यकारी मंडळी गावातील असत परंतु बाहेरगावच्या अनेक उत्साही मंडळींना सामावून घेण्यासाठी विशेषांक काढण्याची कल्पना सुचवली गेली व जानेवारी ८१ चा अंक 'फिलाडेल्फिया विशेषांक' म्हणून प्रसिद्ध झाला. त्यानंतर आणखी १० विशेषांक प्रसिद्ध झाले.

मराठीतून लेखन करण्याची प्रेरणा आणि आत्मविश्वास जागृत करण्याचे मोलाचे कार्य एकताने केले व लिखाण करण्यासाठी उत्तेजन व प्रोत्साहन दिले याचा आनंद होत आहे. एकतामुळे अनेक मान्यवर लोकांशी माझा परिचय झाला व हुशार, जाणकार व्यक्तींबरोबर काम करण्याची संधी मिळाली. खूप जणांशी मैत्रीचे संबंध निर्माण झाले व ते आजही टिकून आहेत हे मी माझे भाग्यच समजतो. डॉ. विद्युल्लेखा अकलूजकर, तसेच कै. यशवंत कानिटकर व कै. अजिता काळे यांच्याबरोबर काम करताना बरंच काही शिकायला मिळालं हे मी विसरू शकणार नाही.

कौटुंबिक जबाबदाऱ्या व नोकरीधंदा सांभाळून लष्कराच्या भाकऱ्या भाजण्याचा हा उद्योग चालू असताना घरच्या लोकांचे सहाय्य लाभले नसते तर हा नाद केव्हाच सोडून द्यावा लागला असता व त्याकरता सौ. प्रतिभाचे विशेष आभार मानायला हवेत. आमच्या धाकट्या अनिलच्या जन्मापासून एकता घरात आली तर मोठा राजेश त्यावेळी पाच वर्षांचा होता त्यामुळे आज इतकी वर्ष त्यांचेही सहाय्य ह्या उपक्रमास लाभले हे वेगळे सांगावयास नको.

आपणा सर्वांच्या आपुलकीचा लोभ यापुढेही चालू राहून एकताची भरघोस उन्नती होवो ही प्रार्थना!

– विनायक दा. गोखले

**email - meparlekar@gmail.com.**

'एकता'च्या सौजन्याने

************

# अभिनंदन!

एकता ह्या अंकाबरोबर तिसाव्या वर्षात पदार्पण करीत आहे. त्यानिमित्ताने झटणाऱ्या आपणा सर्वांचे हार्दिक अभिनंदन व अव्याहत सेवेबद्दल मन:पूर्वक आभार! आमचे जुने मित्र किंवा एकताचे पहिल्यापासूनचे वाचक कुठे भेटले, की अजून देखील सुरुवातीचे अंक कसे त्यांना घरून पत्र आल्यासारखे वाटायचे आणि त्यांत किती आपलेपणा असायचा यासारख्या गप्पा मारत मला भूतकाळात घेऊन जातात व एकेक आठवण अगदी अलीकडे घडल्यासारखी ताजीतवानी होते.

१९७९ मधे एकता सुरू झाले त्यावेळी मराठी टाइपरायटर किंवा टाईपसेटिंगच्या सोयी येथे उपलब्ध नसल्यामुळे सुरूवातीचे अंक हाताने लिहिण्याखेरीज दुसरा पर्यायच नव्हता. आपल्या सर्वांमधे आपुलकीचा व जिव्हाळ्याचा भाव निर्माण व्हावयाला छापील शब्दांपेक्षा सुरूवातीचे हस्तलिखित स्वरूप सहाय्यकर ठरले असण्याची शक्यता आहे. नंतर मराठी फॉण्ट्स उपलब्ध झाल्यावर संपूर्ण अंक संगणकावर टंकित होऊ लागला. ज्यांच्यापाशी प्रतिभा आहे अशांना लेखनाचे माध्यम मिळवून देऊन अवतीभवतीच्या अनेकांना एकताने 'लिहिते' केले आणि त्यांतील काही मराठी साहित्याच्या मध्यवर्ती प्रवाहात समाविष्ट झाल्याचे आनंददायक चित्र आपल्याला दिसते. म्हणून म्हणावेसे वाटते की उत्तर अमेरिकेतील मराठी माणसांच्या सांस्कृतिक व साहित्यिक चळवळीचे मुखपत्र म्हणून 'एकता'चा स्पष्टपणे निर्देश करायला हवा.

'एकता' हे निखळ वाङ्मयीन नियतकालिक नाही. परदेशात ज्या पार्श्वभूमीवर या नियतकालिकाची सुरूवात झाली, त्यात सर्व प्रकारच्या जीवनक्षेत्रासंबंधी वाचकांना जागरूक करणे हे 'एकता'चे ध्येयधोरण राहिले. एकताला लाभलेले यश आणि त्यामागील रहस्य लक्षात घेता तिच्या निर्मितीशी संबंधित असलेली मने प्राय: महाराष्ट्रातून कित्येक योजने दूर आहेत. या साऱ्यांचे शिक्षण महाराष्ट्रातील वेगवेगळ्या प्राथमिक, माध्यमिक शाळांमधून झालेले आहे. आपल्या गुणवत्तेचे आणि शिक्षणाचे चीज करण्याकरता आलेली ही मंडळी आपली भाषा, आपली संस्कृति, आपले ग्रंथ आणि साहित्य-कलांचे संस्कार बरोबर घेऊन आली. या प्रत्येकाचे कामाचे, अर्थार्जनाचे क्षेत्र वेगवेगळे आहे व कोणत्याही आर्थिक फायद्याची अपेक्षा न करता ही मने काहीतरी वेगळे करण्याचा प्रयत्न करीत आली आहेत. एका प्रगत आणि

अनोख्या अशा विश्वात कितीही रममाण झालो तरी आपल्या मनाच्या एका कोपऱ्याची दारे केव्हातरी एकांतात किलकिली होऊन ती पूर्वस्मृतींमधे बुडून जातातच!

प्रारंभीचे एकताचे ध्येयधोरण, त्याला मिळालेला प्रतिसादा आणि अत्यंत धडपडीतून, चिकाटीतून व जिद्दीतून सिद्ध झालेले सुरूवातीचे अंक व पुढे वाढत-विस्तारत गेलेला व्याप, वेगवेगळ्या वेळी वेगवेगळ्या टप्प्यांवर लाभत गेलेला उत्साही कार्यकर्त्यांचा आणि लेखकांचा मदतीचा हात यांतूनच 'एकता' ची दमदार वाटचाल चालू राहिली. आजकाल भारतातली बरीचशी नियतकालिके 'इंटरनेट' वर वाचायला मिळण्याची सुविधा निर्माण झाल्याने अनेकजण तिकडे आकर्षिले गेलेले दिसतात. आपल्या एकूण जीवनातच आता फार वेगाने बदल होत आहेत. वैज्ञानिक प्रगतीबरोबर प्राप्त होणाऱ्या सुविधा व दृश्य-श्राव्य माध्यमात सतत पडणारी भर यामुळे येथेही सांस्कृतिक स्थित्यंतर, धर्म कल्पनांची पीछेहाट, पाश्चात्य संस्कृती, कला आणि त्यांचा झपाट्याने प्रसार करणाऱ्या माध्यमांचा वाढता प्रभाव या सर्व गोष्टी सर्वांना जाणवत आहेत. प्रगत देशात, भिन्न संस्कृतीत आणि भाषा-वातावरणात आपल्या मुलांची जीवनदृष्टी बदलण्याची शक्यताही नाकारता येणार नाही. त्यासाठी कटाक्षाने जागरूक राहणे जरूरीचे आहे.

आपणा सर्वांना व एकताला नवीन वर्षासाठी व भविष्य काळासाठी अनेक शुभकामना!

- विनायक दा. गोखले

**email - meparlekar@gmail.com.**

'एकता'च्या सौजन्याने

************

## योगिता : विद्या हर्डीकर - सप्रे



**का**ही व्यक्ती जन्मतःच आपापले कार्य घेऊन जन्माला येतात. मग त्या कोठल्याही क्षेत्रातील असोत. काही अंशी त्या समाजाचे ऋण फेडण्यासाठीच जन्म घेतात असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. अशाच कर्तबगार, सामाजिक बांधिलकीचे व्रत घेतलेल्या उत्तर अमेरिकेतील सुविद्य समाजकार्यकर्त्या म्हणजे **सौ. विद्या हर्डीकर सप्रे.** जॉन केनेडीनी म्हटल्याप्रमाणे.... "Efforts and Courage are not enough Without Purpose and Direction" याच धैर्याने सौ. विद्या हर्डीकर-सप्रे यांचे कार्य असेच, पद्धतशीरपणे आणि सामाजिक बांधिलकीचा उद्देश पूर्ण करण्याकरता इतकी वर्षे चालू आहे. उत्तर अमेरिकेत त्यांचे नांव ऐकलं नसलेली मराठी व्यक्ती विरळाच. सध्या त्या बृहन् महाराष्ट्र मंडळाच्या सल्लागार समितीच्या अध्यक्ष म्हणून कार्यरत आहेत. व्यवसायाने, विद्याताई संगणक-तज्ञ असून त्याशिवाय, त्या योग-शिक्षिका म्हणून उप-व्यवसाय करतात.

विद्याताई, मूळच्या पुण्याच्या. त्यांचे शालेय शिक्षण हुजुरपागेत, तर महाविद्यालयीलन शिक्षण फर्ग्युसनमध्ये व एम.एस्सी. पुणे विद्यापीठातून झाले. दहावीत असतांनाच, त्यांनी आपल्या लेखनाची मुहूर्तमेढ 'साधना' या मासिकातून एक कथा लिहून केली व नंतर अखंड लेखन त्यांनी आजतापावेत चालू ठेवले आहे. फर्ग्युसनमध्ये असतांना त्यांनी "फर्ग्युसोनियन" नियतकालिक चालविले व त्याचबरोबर "साहित्यसहकार" या उपक्रमात सक्रीय सहभाग घेतला. ही झाली त्यांची साहित्याच्या प्रेरणेची तोंडओळख.

१९८३ च्या दरम्यान त्या अमेरिकेत आल्या. त्या पदार्थ विज्ञान आणि संगणक शास्त्र, अशा दुहेरी पदव्युत्तर आहेत. सामाजिक आणि साहित्यिक अशा दोन्ही क्षेत्रात त्यांचे कार्य भरभक्कम आहे, हे आपल्याला त्यांच्या एकूण कार्याचा आढावा घेतांना लक्षात येईल.

विद्याताईंच्या साहित्याचा मागोवा घ्यायचा झाला तर त्यात कथा, कविता, ललित

लेख, वैचारिक लेख असे विविध प्रकार आढळून येतील. त्यांनी "अमेरिकेतील मराठी समाजाविषयी" चिंतनपर लेख लिहिले, "महाराष्ट्रातील रचनात्मक कार्याच्या दिशा" हे सदर 'एकता' मध्ये १९८२ ते १९९२ या कालावधीत सलग प्रसिद्ध केले व नंतर तेच वेळोवेळी प्रसिद्ध केले. त्या व्यतिरिक्त, "या नोकरीत मला काय आवडते" ही मराठी स्त्रियांच्या मुलाखती घेऊन अजिता काळे यांच्याबरोबर वृत्तांत लेखमाला सादर केली. मराठी साहित्यिकांचा परिचय करून देणारी लेखमाला, व्यक्तीपरिचय, पुस्तक परीक्षणे, मुलाखती, महाराष्ट्रातील विविध क्षेत्रात विशिष्ठ कामगिरी केलेल्या स्त्रियांचा "तेजोमयी" या मालिकेतून परिचय, इत्यादी उपक्रमही त्यांनी पार पाडले आहेत. त्यांनी एकूण ६० ते ७० लेख प्रसिद्ध केले आहेत.

**साहित्य:**

➢ महाराष्ट्रातून प्रसिद्ध होणाऱ्या 'हंस', 'मिळून साऱ्याजणी', 'रुचि', 'छात्रप्रबोधन', 'महाराष्ट्र टाईम्स', 'लोकसत्ता', इत्यादी नियतकालिकांत लेखन.

➢ अमेरिकेतील 'बृहन् महाराष्ट्र वृत्त', 'एकता', 'सावली', 'रंगदीप', इ. नियतकालिकांतून नियमित लेखन. विविध अधिवेशनांच्या स्मरणिकांत लेखन.

➢ मराठी मंडळे, अधिवेशन व अन्य कार्यक्रमांसाठी संहिता लेखन.

➢ पुणे आकाशवाणीसाठी श्राव्य लेखन व सादरीकरण.

➢ 'मायबोली', 'अंतराळ' इ. अंतरजाल (इंटरनेट) नियतकालिकांत लेखन.

➢ ग्रंथालीतर्फे "निरंतर" हा कथासंग्रह व "ल्याले ऐलपैल" हा लेख संग्रह (दोन्ही संपादित) प्रसिद्ध.

➢ अमेरिकेत साहित्यमंडळे, साहित्यसभा या सारख्या उपक्रमांचे संयोजन, "अभिव्यक्ती" हा साहित्यप्रेमी गट संयोजित करून गौरी देशपांडे, पु.शि. रेगे अशा नामवंत साहित्यिकांच्या साहित्यावर आधारित कार्यक्रम.

विद्याताईंच्या लेखनातून सामाजिक कार्याबद्दलची कळकळ, जागृती निर्माण करण्याची धडपड दिसून येते. त्यांच्या मते साहित्यातून समाजाचे प्रतिबिंब उमटते, तशीच त्यातून सामाजिक कार्याबद्दल जागृती करण्याची ताकदही असते. फक्त हे कार्य मनापासून निस्पृहपणे राबविणारा सामाजिक पुढारी हवा, आणि विद्याताईंनी हे कार्य स्वत:चा वेळ, पैसे खर्च करून निस्पृहपणे केले आहे.

विद्याताईंच्या जीवनात दोन पैलू आढळतात. एक व्यक्तिगत तर दुसरा सार्वजनिक. दोन्ही भूमिकांतून त्यांना लेखनाची प्रेरणा मिळाली. व्यक्तिगत जीवनात त्यांना अनेक अनुभव आले, स्नेह जडले, नातीगोती जपली. या सर्व गोष्टींच्या अनुषंगाने त्यांनी

एका प्रकारच्या लेखनाची दिशा ठरवली. त्यांचे दुसऱ्या प्रकारचे लेखन; समाजसेवेच्या तळमळीतून, समाजसेवेचे कार्य करताना आलेल्या अनुभवांतून झाले. या दुसऱ्या प्रकारच्या लेखनाला, त्या जास्त प्राधान्य देतात, कारण लहानपणापासूनच या कार्याचा वसा त्यांनी घेतला आहे. शालेय जीवनात, स्वामी विवेकानंदांचे विचार.... "जोवर माझ्या देशातील कुत्राही उपाशी आहे तोवर मला स्वर्ग नको" हे मनावर कायमचे कोरले गेले व त्यामुळे, प्रेरित होऊनच विद्याताईंनी समाजसेवेचे व्रत घेतले व त्यावर लिखाण केले. त्यांत, त्यांची समाज जागृतीची तळमळ दिसून येते. त्या म्हणतात.... "सामाजिक सेवा ही जनताजनार्दनाची सेवा" आणि म्हणूनच त्या ही सेवा, हे नुसते एकटीचे स्वयंसेविकेचे कार्य म्हणून करीत नाहीत, तर "मिशन" म्हणून करतात आणि त्यांची त्यातील तळमळ लोकांना जाणवते आणि तीच कृतीत आणि लेखनात उतरते. त्यातून त्यांचा उत्साह अधिक दुणावतो. या लेखनातून त्यांना एका वेगळ्या निर्मितीचा अपार आनंद अनुभवयास मिळतो. त्यांना विश्वास वाटतो की "History is a relentless master, it was no present, only the past rushing into the future. To try to hold past is to be swept away."

वैचारिक लेखनाबाबत विद्याताई, मनात विचार करण्यासारखा विचार आला की कागदावर त्या विचारांचा टिपणीवजा आराखडा तयार करतात. त्यावर लेख लिहून झाला की, त्याचे वाचन, पुर्नवाचन, करून फेरफार करून पुनर्लेखन करतात. हे सर्व कार्य सिद्धीस नेण्यास संयम, वेळ, चिकाटी, चिंतन इत्यादी सद्गुणांची जोड लागते. किंबहुना, या सर्वांचा अजोड मिलाफच लेखनाची योग्यता सांगून जातात. "चांगल्या संपादकांकडून काही सूचना घेतल्यास लेखकाने कमीपणा मानू नये. वैचारिक लेख वाचताना, वाचकाला क्लिष्ट वाटू नये, आणि त्याचबरोबर त्या लेखाचा, विचाराचा आशय सर्व सामान्य वाचकांना समजण्यासारखा हवा," असे त्यांना वाटते.

एक पानी कथेचे प्रयोगही विद्याताईंनी यशस्वीपणे केले. लेखकाला नेमके काय सांगायचे आहे हे त्याने विचारपूर्वक जाणले आणि त्या अनुषंगाने कथानक रचले, तर एक पानी कथाही उत्कृष्ट आणि प्रभावी ठरू शकते, हे विद्याताईंनी "जवळीक" या कथेवरून अनुभवले. म्हणून, त्यांचे काही लेख कथेच्या अंगाने जातात. अशा कथेचे नामकरण त्यांनी "लेकथा" अथवा "लेखता" या स्वतंत्र प्रकारांनी केले आहे. कथा उत्तम होण्यासाठी चिंतन, परिश्रम, शैली, कौशल्य ही सर्वच महत्वाची ठरतात. भरपूर चिंतन नसेल तर कथा कदाचित फसण्याचा, फसफसण्याचा संभव असतो. कथा-लेखनाला लागणारा निवांत वेळ विद्याताईंपाशी नसल्यामुळे, त्यांनी

कथांपेक्षा लेख जास्ती लिहिले आहेत.

ललित लेखनाविषयीही त्यांचे मत असेच आहे. कथा किंवा ललित लेखनाचा विषय मनात बरीच वर्षे रुजत असतो, मनांतल्या मनात त्याची उजळणी होत असते, आणि मनाच्या गाभाऱ्यात कल्पना आकार घेऊन उमलत असते. ते वाचकांपर्यंत जसंच्या तसं पोहोचवायची विद्याताईंची धडपड असते. वाचकांना काय वाटेल या पेक्षा वाचकांनी त्या लेखनात काय वाचावं, काय समजून घ्यावं असं त्यांना वाटतं. त्यांच्या दृष्टीने ते महत्वाचं असतं.

त्यांच्या लेखनाचे आणखी वैशिष्ट्य म्हणजे नर्म विनोद, काहीसा खुसखुशीतपणा, विषयाची तर्कशुद्ध मांडणी, शब्दांचा अचूक, लाघवी वापर. त्यांचा लिहिण्याचा एकूण कल सामाजिक जागृती करण्यासाठी दिसून येतो. लेखांतून स्वतःला असा व्यक्तिगत आनंद हा मिळतोच आणि म्हणूनच कदाचित, लिहिण्याची उर्मी जागृत होते. त्यांच्या मते, आयुष्य आणि लेखन हातात हात घालून चालत असल्यामुळे त्यांच्या लेखनात व्यक्तिगत आणि सामाजिक अशी दोन्ही प्रतिबिंबे उमटलेली आढळून येतील.

त्यांच्या खुसखुशीत विनोदी लेखनाचे उदाहरण म्हणजे त्यांनी लिहिलेल्या "मांजरपण" या लेखतावरून समजून येईल. ही लेखता त्यांनी 'राजसगौरी' या टोपण नांवाने लिहिली आहे. अमेरिकेत माणसांपेक्षा प्राण्यांचे लाड जास्त होतात. आमचे कॅलिफोर्नियातील एक स्नेही गंमतीने नेहमी म्हणतात, की पुढील जन्म अमेरिकेत, "अमेरिकन कुटुंबात, 'कुत्र्याचा यावा', म्हणजे या जन्मी लाड कोणी पुरवले नाहीत ते पुढील जन्मी पूर्ण करून घेता येतील." 'मांजरपण' या विद्याताईंच्या लेखतावरून त्या लाडांची थोडी फार कल्पना येईल.

त्यांच्या सामाजिक कार्याचा पसाराही लेखनाएवढाच पसरलेला आहे. सामाजिक बांधिलकीचे व्रत त्यांनी घरापासूनच घेतले. आई-वडिलांचा, कोंकणातील आजी-आजोबांचा, शेजार-पाजाऱ्यांना मदतीचा हात सदैव पुढे असायचा. शाळेतील स्काऊट चळवळीतील एक बोध-वाक्यही कायम मनात ठसले होते....'रोज एक तरी सत्कृत्य करा.' समाजकार्य करण्याचा सर्वात प्रभाव त्यांच्यावर पडला, तो श्री. आप्पा पेंडसे यांचा. आप्पा हे त्यांचे सामाजिक कार्याचे दैवत. विद्याताईंच्याच शब्दांत आप्पांबद्दल सांगायचे झालेच तर........

"जवळ जवळ चाळीस पन्नास वर्षांपूर्वी सिंहगडाच्या माथ्यावर एक तडफदार तरुण उभा होता. त्याचं नांव 'आप्पा पेंडसे!' तीनशे वर्षांत उलटलेले पावसाळे, मावळच्या त्या मूठ मूठ झोपड्यांच्या खेड्यापर्यंत पोहोचलेसे वाटत नव्हते. तिथले ऐश्वर्य कांदा-भाकरी पलीकडे वाढलेले दिसत नव्हते. महाराष्ट्र परिवहन मंडळाची

बस दिसत होती. 'दोन किंवा तीन पुरेत' चा त्रिकोण पोहोचला होता. पाच वर्षांनी जनतेला 'टिनोपाल' हसू दाखवणाऱ्या पुढाऱ्यांच्या जीपा तिथे पोहोचल्या होत्या. हातभट्ट्या पोहोचल्या होत्या. गरीब मजुरांच्या घामाच्या पैशांवर फटफट्या उडवणारे गावगुंड पोहोचले होते. पोहोचली नव्हती ती माणुसकी.

त्या तरुणाच्या मनात संकल्प उमटले, "हो उदंड येथे नीतिमंत श्रीमंती । या घराघरातून वसो क्षेम सुख शांती ।। आनंदे भुवने उभारुया येथे......"

हातात पैसा, सत्ता, माणसं यातलं काही नव्हतं. पण रक्तात नवी सळसळ आणि मनात संकल्पांचं पाथेय घेऊन तो तरुण, कल्याण दरवाजानं पायउतार होऊ लागला.... त्यानंतर पंचवीस वर्षात शिवगंगा आणि गुजवणी नद्यांच्या खोऱ्यातल्या दोन तीनशे खेड्यांच्या विकासाचं काम उभं राहिलं. ते उभं राहत असलेलं पहातांनाच मी लहानाची मोठी झाले. त्या कामाचा लहानसा भाग उचलतानाच मी त्या भव्य स्वप्नाचे काही कवडसे पहिले, आपलेसे केले आणि त्या स्वप्नातल्या दगडमातीचा जिव्हाळा घेऊन अमेरिकेत आले."

**सामाजिक कार्य उपक्रम**

➢ आप्पा पेंडसे यांच्या "ज्ञान प्रबोधिनी"त ५-६ वर्षे पूर्णवेळ कार्यकर्ती.

➢ गेली २५ वर्षे बृहन् महाराष्ट्र मंडळाच्या विविध उपक्रमात सातत्याने सक्रीय भाग.

➢ बृहन् महाराष्ट्र मंडळाच्या वृत्ताचे १० वर्षे संपादन.

➢ महाराष्ट्र फाऊंडेशन या संस्थेच्या कार्यकारिणीवर उपाध्यक्ष, वितरण समिती सदस्य व अध्यक्ष.

➢ महाराष्ट्रातील रचनात्मक कार्यावर 'एकता' या त्रैमासिकात सुमारे साठ लेखांची लेखमाला लिहून अमेरिकेतील मराठी बांधवांत १५ वर्षे जागृती निर्माण केली.

➢ महाराष्ट्रातील अनेक सेवा संस्थांबरोबर रचनात्मक प्रकल्पांवर काम.... "खेडे दत्तक योजना" (Social Reform of a village) या योजनेची संकल्पना अमेरिकेतील लोकांना समजावून देऊन ४ खेड्यांच्या विकासाचे स्वप्न साकार करण्यात (नियोजन व उपयोजना) सक्रीय सहभाग व त्यासाठी निधी संकलन कार्यक्रमाचे संयोजन.

➢ अमेरिकेतील प्रत्येक मराठी मंडळाने किमान एक खेडे दत्तक घ्यावे हे स्वप्न.

➢ १० वर्षे 'एकल विद्यालय', 'प्रथम', 'योगभारती' इ. भारतीय संस्थांबरोबर काम.

➢ वाय एम सी ए, कम्युनिटी कॉलेजेस् इ. अमेरिकन संस्थात "योगशिक्षिका" या नात्याने योगदान.

**सन्मान ... पारितोषिके:**

विद्याताईंना, बृहन् महाराष्ट्र मंडळाने १९९८ साली आणि २००२ साली, असे दोनवेळा सामाजिक सेवा व साहित्य सेवा या कार्यांसाठी सन्मानित केले आहे. बृहन् महाराष्ट्र मंडळातर्फे हा दुहेरी सन्मान मिळवणाऱ्या त्या एकमेव व्यक्ती आहेत.

विद्याताई आणि तसेच त्यांना त्यांच्या कार्यात साथ देणारे त्यांचे सुविद्य पती, श्री. अशोक सप्रे दोघेही सदर्न कॅलिफोर्नियात एक सालस, निगर्वी जोडपे म्हणून परिचित आहेत. पैसा, शिक्षण, कार्य या कोठल्याचाच त्यांना गर्व जडला नाही आणि म्हणूनच मला वाटते की त्यांच्या हातून, ही निस्पृह समाजसेवा घडत आहे.

त्यांच्या हातून असेच कार्य पुढे चालू राहावे, त्यांना त्यांच्या कार्यात अमेरिकेतील सर्व मराठी मंडळांची सक्रीय साथ लाभून त्यांचे "एक खेडे दत्तक" हे स्वप्न साकार होवो अशी आपण सर्वांनी प्रार्थना करू या.

महात्मा गांधींनी म्हटले आहे की.....

"A small body of determined spirits, fired by unquenchable faith in their mission can alter the course of history."

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

# मांजरपण

"**अ**हो सविताबाई, ऐकलं का? वरच्या मजल्यावरच्या अलकाताई मुलीच्या बाळंतपणाला अमेरिकेत निघाल्यात म्हणे!" असे संवाद पुण्यामुंबईच का, अगदी कोल्हापुरातल्या सोसायट्यांतही रोज ऐकू येतात असं म्हणतात. अमेरिकेत जन्मलेल्या मुलींचे आईबाप अशा बाळंतवाऱ्या करताना ऐकू येत नाही. माझी एक मैत्रीण एकदा महिनाभर रजा घेऊन कॅलिफोर्नियातून कोलोराडोला भर थंडीत बर्फ तुडवत गेली होती मुलीच्या बाळंतपणाला, तर पंधरा दिवसात परतली. मुलगी "पेरेंटींग" वगैरे मासिकं वाचून बाळंतपणात स्वयंभू झाली आणि आईला म्हणाली, "मॉम आय कॅन मॅनेज नाऊ!"

मी तर तेव्हाच ठरवून टाकलं की आपण मुळीच आपल्या मुलींच्या बाळंतपणाला जायचं नाही! शिवाय आमच्या मुलींनीं लग्नाचं मनावर घेतलं तर मग बघू बाळंतपणाचं असा विचार केल्यानं सध्यातरी हा 'मुळीच जायचं नाही' निर्धार करायला आणि सांगायला काही धोका नाही अशी स्वतःची समजूत करून मी अगदी निर्धास्त होते. त्यामुळे फोनवर बोलता बोलता थोरल्या कन्यारत्नानं आपण तीन आठवडे सुट्टीवर जाणार असल्याची घोषणा केली तेव्हा मी काहीशी बेसावधच होते. "अगं, एवढे दिवस तुझी मांजरं त्या मांजरपोळात का ठेवणार आहेस?" मी मठ्ठ प्रश्न विचारला आणि आमच्या चलाख मुलीनं मला मांजरानं उंदीर पकडावा तसं पकडलं! झाऽऽलं. त्यानंतर तिनं मला शाब्दिक खेळ्या आणि भावनिक चपळाया (इंग्रजीत आम्ही त्याला इमोशनल ब्लॅकमेलिंग म्हणतो) करून घायाळ करून टाकलं.

मांजर मांजरपोळात (म्हणजे पेट हॉटेलमध्ये) ठेवल्यानं त्यांचं मानसिक संतुलन कसं बिघडतं यावर माझं भलं मोठं बौद्धिक घेण्यात आलं. "मॉम, यू डोन्ट अंडरस्टँड" असं धृपद दर पाच वाक्यानंतर टाकल्यानं माझं मानसिक संतुलन पार बिघडून आपण शून्य डिग्रीखालचे मठ्ठ आहोत असं मला वाटायला लागलं. त्या परिस्थितीचा फायदा घेऊन नवऱ्यानं संगणकावर टिचक्या मारून विमानाची दोन तिकिटं काढूनदेखील टाकली. (म्हणजे बापलेकींचं आधीच संभाषण झालं होतं तर! अस्सं!) वर त्यानं $१५ × २० = $३०० हे गणित करून कन्येचे तीनशे डॉलर्स वाचतात आणि "तुझं तिकिट फक्त दोनशे पन्नास

डॉलर्सला म्हणजे पन्नास कसे वाचतात" हे भास्कराचार्यांना बुचकळ्यात टाकणारं तत्वज्ञान मला ऐकवलं! कोणाचे का होईना पैसे वाचतात असं कळलं की मला नेहेमीच बरं वाटतं हे नवऱ्याला बरोब्बर माहिती!

क्षणभर तसा आनंद झालादेखील, पण दुसऱ्याच क्षणी मला प्रश्न पडला की, "मग नवऱ्याच्या तिकिटाचं काय?" "अगं, असं कसं तुला कळत नाही? तनिष्का तिथून फक्त वीस मैलावर आहे. ती नाही का भेटणार? मुलीला भेटण्याचा आनंद मोठा की तुझे दीडदोनशे डॉलर्स महत्त्वाचे!" नवऱ्याने पुन्हा एकदा तो "यू डोन्ट अंडरस्टँऽऽड" चा टोला हाणलाच शिताफीने!

तनिष्कानं म्हणजे धाकटीनं तेवढ्यात फोन करून (हिला कसं कळलं - हा प्रश्न आलाच मनात) "मॉम, आय एम सोऽऽ एक्सायटेड दॅट यू आर कमिंग" म्हणत आनंद व्यक्त केल्यावर माझं दीड-दोनशे डॉलर्स गेल्याचं दु:ख विरघळून गेलं आणि बिनपगारी रजा घेतल्यामुळे गेलेल्या पगारांचंही.... थोडक्यात मुलगी गावाला निघाली आणि आम्ही मांजरपणाला! - अमेरिकेत रहातो म्हणून बरं. पुण्यात असतो, तर आमची शेजारीण पलीकडल्या शेजारणीच्या कानात कुजबुजली असती, "अहो, ऐकलं का, ते मुलीकडं मांजरपणाला निघालेत म्हणे!"

मी आपली मनातल्या मनात कुजबुजले, "बरं झालं बाळंतपण नाही!" नाहीतर पेरेंटींगचं पुस्तक वाचून हिनं मला "मॉम, यू डोन्ट अंडरस्टँऽऽड हाऊ टू टेक केअर ऑफ बेबी" म्हणून माझी बोळवण केली असती. शिवाय ते 'मांजरपण' तिच्यासमोर करायची वेळ येणार नव्हती.

मांजरांचं मला एवढं वावडं नव्हतं. लहानपणी पुण्यात घरातले उंदीर कमी करण्यासाठी एक मांजरीण पाळली होती. ती आणि तिच्या पिलावळीच्या दोन तीन पिढ्या घरात आणि वाड्यात सुखासीनपणे नांदत होत्या.

"अमेरिकेत उंदीर नसल्यामुळे मांजरं पाळण्याची आवश्यकता नाही" हे मी ठासून सांगत आले आहे. मांजरं गराजमध्ये चोरून पाळण्यामुळे झालेले मुलींचे आणि माझे दोन तीन समर प्रसंग सोडले तर मुली तशा समजूतदारपणे वागल्या होत्या. विद्यापीठांच्या आवारात आणि नंतर आपल्या नोकरीच्या गावी आपल्या घरात नांदायला गेल्यावर त्यांनी प्रत्येकी दोन मांजरे पाळून आपली मांजरांची हौस भागवून घेतली आणि मीही दरवेळी न चुकता मांजरचौकशी करून माझं मांजरप्रेम दुरून का होईना भरभरून व्यक्त करत असते! अगदी मांजरांचे वाढदिवस लक्षात ठेवून त्यांना भेटकार्ड सुद्धा पाठवतो आम्ही! आमच्या वाढदिवसांनाही मांजरांच्या पावलांचे ठसे मारलेली कार्ड येत असतात.

विमानतळावरून आम्ही कनिष्काकडे पोहोचलो. कनिष्कानं दार उघडलं तेव्हा दोन अक्राळविक्राळ मांजरं (उंची सुमारे वाघाएवढी आणि वजन तीनचारशे पौंड असावं) समोर दिसली. "अगं, तुझे मुमुक्षू आणि सावळी कुठे गेले ? कित्ती गोड पिल्लं होती मागच्या वेळी पाहिली तेव्हां!" हे नवऱ्यानं म्हटलं म्हणून बरं! मी म्हटलं असतं तर ते वाघाचे मावसामावशी माझ्यावर चालच करून आले असते!

"डॅडी, यू आर सच अ क्यूऽऽट जोकर! दीज आर मॅक्स अँड झोई! दे आर ग्रोन अप बाय वन इयर नाऊ! - मॅक्स, से हाऽऽय टू ग्रँडपा अँड ग्रँडमा!"

बापरे! आता यांचं आम्ही काय "बेबीसिटिंग" उर्फ मांजरपण करणार ? मी एवढा विचार करेपर्यंत कनिष्कानं मॅक्स उर्फ मुमुक्षु आणि झोई उर्फ सावळी यांचं लालनपालन कसं करावं याबद्दलच्या सूचना असलेली दोन लठ्ठ पुस्तकं नवऱ्याच्या हातात कोंबली आणि तासाभरात तयार होऊन 'अभ्यासवर्गाला' येण्याचं फर्मान सोडलं!

"माझ्या बाई अलिकडे लक्षात रहात नाही. तू तुझ्या बाबालाच दे धडे! 'ट्रेन द ट्रेनर'. मग तो मला शिकवेल सगळं हं" असं म्हणत मी स्वयंपाकघरात सटकले! आणि दुसऱ्याच क्षणी नाकाला हात लावत बाहेर आले! आमच्या कन्यकेनं दोन मांजरांची 'शिशूघरं' चक्क स्वयंपाकघरात ठेवली होती!

"अगं, ही 'शिशूघरं' इथे ठेवणं चांगलं नाही आरोग्याला. तू बेसमेंट नाहीतर बाथरूममध्ये का नाही ठेवत ?" मी न रहावून बोललेच.

"अगं, असं काय करतेस ? बेसमेंटमध्ये त्यांना थंडी वाजत नाही का ? आणि बाथरूममध्ये जंतू असतात - ते त्यांच्या आरोग्याला चांगलं नाही! शिवाय मी कुठे स्वयंपाकघर वापरते ? आणि बरं का, तूही स्वयंपाकघरात तुझ्या फोडण्या करू नकोस - मॅक्सला अस्थमा आहे!"

माझी काय बिशाद होती 'त्या' स्वयंपाकघरात उभं राहून फोडण्याबिडण्या करत साग्रसंगीत स्वयंपाक करण्याची! मी शांतपणे या गावात आमचे कोण मित्र आहेत याचा शोध घ्यायला सुरुवात केली आणि भराभरा आमचे वार लावून टाकले.

आता हिनं स्वयंपाकघराचं 'शिशूघर' केलं म्हणजे मांजरांचं भोजनघर बहुधा पाहुण्यांच्या खोलीत असणार असं म्हणत मी 'आमची' म्हणजे पाहुण्यांची खोली गाठली. तिथं मांजरखाऊचे दहा दहा किलोचे दोन उंच डबे होते आणि मांजरांची चित्रं असलेल्या चटयांवर शिगोशीग भरलेले दोन वाडगे होते. शिवाय पिण्याच्या पाण्याचा झरा वाहत असलेलं एक यंत्र होतं.!

घरात जागोजागी मांजरखेळणी विखुरलेली होती. बाहेरच्या दर्शनी भागात एक

विटकी, मुडकी पेटी होती. तिच्यावर 'डिझायनर लेबल' वाले एक ब्लँकेट होते. त्यावर मांजराचे केस सांडलेले होते. ते मॅक्सचे शयनगृह! हा 'मुमुक्षु' तिथे बसून दिवसातले सोळा तास चिंतन करत असतो! जेवणाच्या टेबलाखालचा गालिचा मांजरांनी कुरतडून आणि ओरखाडून 'पुरातन' केला होता. "अरे, हाच ना तो आपण भेट दिलेला गालिचा? चांगले दोन हजार डॉलर्स मोजले होते!" मी हळूच नवऱ्याच्या कानात कुजबुजले! "अगं, असू दे! मांजरांनी त्याची पुरातनता (अँटिक व्हॅल्यू) वाढवल्याने कनिष्काला दहा हजार मिळतील त्याचे!" नवऱ्याने स्वत:ला पैशाबिशातलं बायकोपेक्षा जास्त कळतं हे पुन: एकदा सिद्ध केलं. दोन तासाच्या मांजर अभ्यासवर्गात मांजरनिष्णात होऊन आलेल्या नवऱ्यानं आणि तेवढ्या वेळात मांजर हे कोणत्याच देवाचे वाहन का नाही या विषयावर सखोल चिंतन केलेल्या 'मी'नं नंतरची संध्याकाळ कनिष्का आणि आम्हाला भेटायला वीऽऽस मैल ड्राईव्ह करून आलेल्या तनिष्काबरोबर मांजरांच्या गोष्टी करत घालवली.

तीन प्याले 'मार्टीनी' नंतर नवरा एक मेलेल्या मांजराचा विनोद सांगू पहात होता, तेव्हां मी चपळाईनं त्याला शर्ट धरून उपहारगृहाबाहेर काढलं आणि गाडीत कोंबलं!

मांजरांचे एक लाख पापे घेऊन "मॉमी विल मिस यू" असं त्यांना सांगत आमची वरिष्ठ कन्यका सुट्टीवर जायला विमानात चढली तेव्हां मी हुश्श केलं. "ग्रँडपा विल टेक केअर ऑफ यू हं" असं तिनं माऊलोकांना सांगितलं होतं. तेव्हां 'ग्रँडमा'नं यांचं काही करावं अशी तिची अपेक्षा नाही हे सोयिस्करपणे लक्षात घेऊन मी निवांतपणे पुस्तक वाचायला घेतलं!

दोनच मिनिटात झोई उर्फ सावळीनं पुस्तक आणि माझ्यामधे ऐसपैस पसरून "आता माझे केस विंचर" अशा आशयाचं शेपूट वर केलं! मी टेबलावरचा मांजरकंगवा घेऊन तिचे केस विंचरायला लागले तोच, नवरा धावत आला, "अगं, तो कंगवा मॅक्सचा! त्यानं नको विंचरू - नाही तर त्याच्या पिसवा तिच्या अंगावर जातील!"

"पिसवा?" मी ताडकन उठले! (तरीच मला काहीतरी चावल्यासारखं वाटत होतं!)

कन्यकेनं "ट्रेन द ट्रेनर" च्या गळ्यात शिताफीनं मॅक्सची पिसवा ट्रीटमेंट, झोईची "वार्षिक आरोग्याची तपासणी" आणि काही इंजेक्शने इ. प्राण्यांच्या डॉक्टरकडे जाऊन करण्याच्या गोष्टी (अर्थातच खर्चासकट) मारल्या होत्या हे माझ्या लक्षात आलं. नशीब या मांजरांना मधुमेह वगैरे दुखणी नाहीत. माझ्या ऑफिसात माझ्याबरोबर काम करणाऱ्या अमेरिकन बाईच्या मांजराला मधुमेह आहे तर ती रोज त्याला इंजेक्शने देते. तिच्या स्वयंपाकघरातल्या दिनदर्शिकेवर विषम तारखांवर खुणा होत्या. ते

दिवस डाव्या "टूशी" वर सुई मारण्याचे! सम दिवस उजवीकडचे! पण आपलं मांजर बरोबर विषम दिवसांना डावी बाजू समोर करून कसं तय्यार रहातं हे ती दर विषम दिवसाला मला कौतुकानं सांगत असते. "तुझ्यापेक्षा ते हुशार आहे ही मला खात्रीच आहे" हे मी तिला मनातल्या मनात सांगत असते. तात्पर्य, 'मधुमेह नसल्याने प्राण्यांच्या डॉक्टरचा भूर्दंड आपल्याला कसा कमी पडणार आहे' हे पटवून देण्याचा नवरा प्रयत्न करणार हे लक्षात घेऊन मी चाणाक्षपणे "पिसवा उपाया"ची जबाबदारी घेऊन दवाखान्याचा रस्ता धरला.

त्या प्राणिवैद्याने मला आपादमस्तक न्याहळले आणि एक प्रश्नावली समोर टाकली. त्यात "मांजर पिसू चावल्यावर हसतं का?" इथपासून अनेक (माझ्यामते) निर्बुद्ध प्रश्न होते. मी 'सम-विषम' अंकांप्रमाणे 'हो, नाही' ठोकून मग 'पिसवाउपायां'वर त्याला प्रश्न विचारले आणि माहिती काढून घेतली. हात्तिच्या! हा उपाय सोपा आहे. हा तर घरी करता येईल, हा विचार करून फक्त पिसवांच्या औषधाची पूड मी दवाखान्यातून घेतली आणि दरवेळचे $२५ गुणिले १५ म्हणजे आपले भरपूर पैसे वाचले ह्या आनंदात मी घरी! लहानपणी उवा झाल्यावर मोलकरीण डोक्याला औषध लावून न्हायला घालत असे तसंच या मांजरांचं करायचं होतं. फक्त या तीनचारशे पौंडी मांजराला उचलून टबात टाकून आंघोळ घालणे हा एक किरकोळ प्रश्न होता. त्या झटापटीत आमचं दोघांचं आणि मॅक्सचं वजन आठ दिवसात घटलं. सकाळी उठून मी दिसले की मॅक्स शेपूट वर करून अत्यंत केविलवाणा रडे! दुसऱ्या बाजूने नवरा पटकन त्याला टबात टाकी! त्याला छान घासून पुसून आंघोळ घालून तो वाळल्यावर मी त्याचे केस विंचरून सुगंधी टाल्कम पावडर लावून देई! एकाची अशी वेणीफणी आणि दुसऱ्याचं चारापाणी करेपर्यंत आमची सकाळ संपे! दुपारी जरा काही वाचन करावं किंवा संगणकावर बसावं तर झोई वाचनाच्या कागदावर नाहीतर संगणकाच्या टंकलेखणी (उर्फ कीबोर्ड)वर ऐसपैस पसरे! सम विषम दिवसागणिक तिच्या 'या' नाहीतर 'त्या' पृष्ठभागावर चापट मारून काहीही फरक पडत नसे! काही लिहायला घेतलं तर लेखणी आणि माझ्यामध्ये तिचे डोळे आणि मिशा जवळ जवळ माझ्या नाकात! चार दिवसानंतर मी कोणतीही बौद्धिक गोष्ट करणं सोडून दिलं आणि दोन लठ्ठ मांजरांमध्ये मठ्ठमणे बसून रहावं असं ठरवलं.

मांजरपालिकेची (कॅट सिटर) दैनंदिनी असं मुखपृष्ठ असलेली एकेक वही आम्हाला देण्यात आली होती. त्यात नोंदी करण्याची सक्त ताकीद होती! (मुद्दे

दिले होते म्हणून बरं!) त्यात पूर्वी एका मांजरपालिकेनं केलेल्या नोंदी वाचून आम्हीही तसल्याच नोंदी करू लागलो. मॅक्सनं मिशा कशा फेंदारल्या, झोईनं कितीवेळा म्याऊ केलं - तिला प्रेमानं कसं थोपटलं, तिनं माझ्या मांडीवर किती तास ताणून दिलं - इ. इ. बऱ्याच गुजगोष्टी त्यात लिहायच्या असत. पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट माझ्या लक्षात आली की मांजरपालिका एक तास घरी येण्याची सोय गावात आहे. त्या तासाचे ती पंचवीस डॉलर्स घेते. मी नवऱ्याला सुचवलं की यापुढे दोघांनी 'मांजरपालन' हा व्यवसाय केला तरी भरपूर पैसे मिळतील.

त्यामुळे आठ दिवसांनी आमच्या धाकटीनं म्हणजे तनिष्कानं आपला सुट्टीचा बेत जाहीर केला तेव्हां मी तिला चाणाक्षपणे 'मांजरपालिके'चा उपाय सुचवला! (तरीच "शी वॉज सोऽऽ एक्सायटेड व्हेन वी वेअर कमिंग" हेही माझ्या लक्षात आलं!)

पण ती कसली खमंग, तिनंही तिची भावनिक चपळाई (इमोशनल ब्लॅकमेलिंग - लक्षात आहे ना?)ची नखं बाहेर काढली - वर आपल्या मांजरीला मधुमेहाचं दुखणं आहे (हं? हे नव्हतं हिनं पूर्वी सांगितलं! बापरे - म्हणजे सुया टोचाव्या लागणार?) हे सांगताना तिनं मॅव मॅव करायचंच बाकी ठेवलं होतं. "अगं, पण तू इतकी लांब रहातेस. आम्ही रोज कसं येणार तुझ्याकडे" माझा चतुर प्रश्न. "यू डोन्ट अंडरस्टँड... मी नाही का हल्ली तुम्हाला भेटायला दर दिवसाआड येते?" तनिष्काचं अतिचतुर हृदयाला हात घालणारं भावनिक उत्तर.

"हे बघ, तू आमच्याबरोबर जेवायला म्हणून येतेस. कधीही बिल देत नाहीस आणि दुसऱ्या दिवसासाठी "फूड" घेऊन जातेस! आणि हे अंतर लांब नाही तर मग तुझ्या बहिणीची मांजरं बघायला का नकार दिलास?" नावरू पहाणारं हृदय आवरून, मन घट्ट करून नवऱ्याचा प्रतिहल्ला! (कधी नव्हे तो माझ्या मदतीला आला बाई!) शेवटी बऱ्याच वाटाघाटी होऊन तनिष्काकडेही मांजरपालक या नात्यानं जाण्याचा निर्णय तीन विरूद्ध दोन मतांनी घेण्यात आला. तीन म्हणजे तनिष्का, मोरू (मार्सेलस) व सीता (सीसी) आणि दोन म्हणजे आम्ही "आजी-आजोबा"!

पुन्हा आणखी दोन सूचनावह्या आणि शिवाय पंधरा हजार तोंडी सूचना यांच्या अभ्यासक्रमातून जाणे आलेच! मी ते अर्थातच शिताफीनं टाळलं. नवऱ्याच्या डोक्यात बौद्धिक गोंधळ - एकीनं बेसमेंटचं दार रात्री उघडं ठेवायला सांगितलं तर दुसरीनं बंद. त्या रात्री नवरा झोपेतून दचकून उठला - "अगं, मी तनिष्काच्या बेसमेंटचं दार बंद करायलाच विसरलो" असं म्हणतांना घामाघूम झाला होता. "विशेष काही फरक पडणार नाही. उद्या जाऊ तेव्हा बेसमेंट मध्ये जाऊन त्यांनी

केलेली 'शी-शू' निस्तरावी लागेल. झोप आता. आत्ता मध्यरात्री उठून आपण वीस मैल मुळीच जाणार नाही. गेलो तरी उपयोग नाही. त्यांची 'विधी' करण्याची वेळ रात्री नऊ वाजून पंधरा मिनिटांनी असते असं तांबड्या रंगात टाईप केलेलं आहे त्या मोरूच्या बाईंडरवर!" असं नवऱ्याला सांगून मी शांतपणानं मांजरासारखंच 'गुरगुर' असं घोरायला सुरुवात केली.

दुसऱ्या दिवशी मांजरानं तोंड घातलेला चहा शांतपणे पिणारा नवरा पाहताना मात्र मी धसकलेच! "अरे, अरे, त्या मोरूला बाजूला कर आणि तो चहा फेकून दे!" असं ओरडले. तर हा शांतपणाने सांगतो, "अगं, मला काहीही होणार नाही. आमच्या लहानपणी मांजराचं पिल्लू चक्क दुधात पडलं होतं. तेव्हां आमच्या आईनं त्याचं मानगूट धरून त्याला बाहेर काढलं आणि नंतर ते दूध चहाबिहाला वापरलं. एवढं सगळं दूध फेकून थोडीच देणार? 'मोरूनं चहा प्यायला' ही गोष्ट तनिष्काला सांगू नकोस. ती वकील आहे. आपल्यावर उगाच खटला भरेल!"

खटल्याचं ते वेगळंच. पण त्या आधी या बयेनं मांजराला मानसोपचार तज्ञाकडं नेलं तर आपलं अधिकच आर्थिक नुकसान होईल या विचारानं मी अर्थातच गप्प बसायचं ठरवलं.

माझ्या शेजारणीच्या सुनेनं तसं काही केल्याचं मला सुनीती एकदा बोलली होती. म्हणजे अमेरिकेतले मराठी पालक आपल्या मुलाबाळांच्या कुत्र्या-मांजरांचा वारसा घेतात तसं सुनीतीच्या सुनेनं तिचं मांजर एकदा सुनीतीकडे वारसाहक्कानं दिलं होतं. (म्हणजे शी-शू सुनीतीनं बघायचं आणि मुलगा-सुनेनं पापे घेण्याचं बघायचं) तर त्या "मांजर-इन-लॉ" समोर सुनीती सरळ "मांजरं अगदी यूसलेस प्राणी असतात" असं मोठ्यानं बोलली.. ते सुनबाईनं वाटतं ऐकलं आणि "मांजराच्या मनावर याचा परिणाम झाला" म्हणत माऊला ती मांजरमनतज्ञाकडे घेऊन गेली.

ते काही असो, आम्ही आता बौद्धिक पातळीवरून घसरत घसरत मानसिक पातळीवरूनही खाली लोळत लोळत येऊन पडल्यामुळे आम्हाला तरी मानसोपचाराचं भय उरलेलं नाही.

मांजरवेळ झाली की आम्ही पलंगातून लोळत खुर्चीवर येऊन पडतो. मांजरांना आंघोळी घालतो. मग आम्ही पाण्यात लोळतो - मांजरांनी खाल्लं की आम्हीही खातो. त्यांच्याशी खेळतो - आयुष्याला आम्ही मस्तपैकी सुस्तावलो आहोत. हो, एका प्रश्नाचं उत्तर मला सापडलं आहे. "मांजर हे कोणत्याच देवाचं वाहन का नाही?" कारण ते स्वतःच देव आहे!

तळटीप :

(या लेखातील मुलींची नावे सोडून सर्व जसेच्या तसे आहे. मुलींना मराठी समजत नसल्याने हा लेख मराठीत लिहिला. कृपया याचा इंग्रजी अनुवाद करू नये. केलाच तर निदान धाकटीला दाखवू नये. "मांजर नको पण वकील आवर" अशी आमची स्थिती होईल!)

- rajasgauri - **सौ. विद्या हर्डीकर-सप्रे.**

**email - vidyahardikar@hotmail.com.**

************

# एक आगळे व्यक्तिमत्व : दिवाकर कारखानीस



**का**ही वर्षापूर्वी कै. वसंत बापट लिखित आणि सौ. मीना नेरुरकर दिग्दर्शित "सुंदरा मनामध्ये भरली" हे लावण्यांवर आधारित नृत्य नाट्य पाहिले, त्यात कै. बापट यांनी एक वाक्य टाकले आहे... "भारतीय संस्कृती भारतात टिकली नाही तरी ती अमेरिकेत टिकवलीच पाहिजे." याचा प्रत्यय अमेरिकावासी लेखक, कवींनी लिहिलेल्या विविध कादंबऱ्या, कथा संग्रह, त्रैमासिक, वार्षिक मराठी अंक तसेच इतर अनेक व्यक्तींनी राबविलेल्या विविध मराठी कार्यक्रमांवरून गेली ३० वर्षाहून अधिक दिसून येत आहे. या सर्व मराठी भाषाप्रेमींनी आपली साहित्याची नाळ साता समुद्रापलीकडे गेली ३५-४० वर्षे राहूनही ब्रह्मगाठेसारखी जखडून ठेवली आहे.

यातील असेच एक व्यक्तिमत्व म्हणजे श्री. दिवाकर, तथा दादा, भाई, आणि नानासाहेब कारखानीस. कारखानीसांनी गेली ३० वर्षे मराठीची सेवा, येथे रंगदीप, स्नेह, सावली इत्यादी वार्षिक दिवाळी अंकापासून ते स्वतःची अशी "परतीच्या वाटेवर" आणि "सिमरन" ही दोन पुस्तके प्रसिद्ध करून केली आहे. त्याच बरोबर मुंबईतील नवशक्ती, सकाळ, लोकसत्ता, महाराष्ट्र टाईम्स इत्यादी वृत्तपत्रातून लेखन केले आहे. अजूनही वयाच्या ८१ व्या वर्षी त्यांचा उत्साह, अविरत काम करायचा हुरूप दांडगा आहे. सध्या ते प्रस्तुत... अमेरिका आणि कॅनडानिवासी, मराठी लेखकांवर पुस्तक लिहिण्याचा प्रपंच करीत आहेत, जेणेकरून भारतातील व भारताबाहेरील मराठी बांधवांना त्या लेखकांचा परिचय व्हावा.

श्री. कारखानीसांचा मित्र परिवार फार मोठा आहे आणि तो भारत, इंग्लंड, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कॅनडा इत्यादी देशांत विखुरला आहे. त्यामुळे त्यांच्या मित्रपरिवारात ते दादा, भाई या वेगवेगळ्या नांवाने परिचित आहेत, तर घरातील व नातेवाईकांमध्ये ते "नाना" व नातवंडांमध्ये "बिगा" म्हणून.

प्रसिद्ध कवी मंगेश पाडगावकर यांच्या प्रमाणे ते आपल्या जीवनावर तसेच माणसांवर प्रेम करून राहिले आहेत. मंगेश पाडगावकर यांच्यावरील "नक्षत्राचे देणे" ची V C D जेव्हां मी पाहिली तेव्हां मला अगदी नानासाहेबांची पदोपदी आठवण झाली.

सतत हसतमुख, व विनोदी स्वभावामुळे त्यांना आपल्या दुखण्याची जाणीव होत नाही. त्यांना वयाचे वावडे नाही. अगदी पांच वर्षाच्या सिमरन पणती पासून ते नव्वदीच्या वृद्धापर्यंत, सर्वांमध्ये ते गप्पात रंगून जातात. गप्पा मारायला, त्यांना ना विषयाचे वावडे ना वयाचे. निवृत्ती नंतर करायचे काय? असा प्रश्न बहुतांशी लोकांना पडतो. पण नानासाहेबांच्या मनाला हा प्रश्न कधी शिवला नाही असं मला वाटतं. वाचन, लेखना व्यतिरिक्त फावल्या वेळात ते मागील परसांत भाजीपाल्याची लागवड करताना आढळतील.

कवींच्या कल्पना बहुतांशी काल्पनिक असतात तर लेखकांचे लेख, कादंबऱ्या बऱ्याच वेळा वास्तविक अनुभवांवर आधारित असतात. एखादी गोष्ट सगळ्यांना जरी माहित असली तरीही लिहिण्याची आवड व शैली लागते. ती शैली प्रत्येक लेखकाची वेगळी असते. वाचकांना गोष्ट वाचताना उत्सुकता निर्माण झाली पाहिजे,व गोष्ट व्यवस्थित मुद्देसूद गुंफली पाहिजे. श्री. कारखानीसांच्या 'परतीच्या वाटेवर' या कथासंग्रहामध्ये, अनुभवाबरोबर बरेच चिंतन, भावव्यक्ति आणि समर्पक शेवट साधलेला आढळून येईल.

भावनेचा उत्कट आविष्कार त्यांच्या 'वाट पाहुनी शिणले डोळे' या कथेत पाहायला मिळतो. सुरुवाती पासून एका वेगळ्याच वातावरणांत शिरल्या सारखे वाटते. मन झोपाळ्यासारखं हेलकावे खाते आणि उत्सुकता शिगेला पोहचते. 'खरंच, शांता पुरात वाहून तर गेली नाही ना?' असा प्रश्न मनाला भेडसावू लागतो आणि शेवटी दाराची फळी किंचीत उघडून शांता जेव्हा म्हणते, "ये, रघुनाथ आंत ये ना! मला वाटलंच की तू येणार म्हणून.." हे वाचल्यावर वाचकाचा चेहरा उजळून निघतो, आनंदाने!

"प्रायश्चित" ही कथा अशीच काळजाला हात घालणारी आहे. जिवंतपणी बायकोला कस्पटासारखे वागवणारे महाभाग काही कमी नाहीत आपल्या समाजांत. पण 'ती' कायमची गेल्यावर म्हातारपणी अथवा रोगाने ग्रस्त झाल्यावर याच सुधाकरावर पश्चाताप करण्याची पाळी येते. दादांनी केलेले हे चित्रण या कथेला वेगळ्या उंचीवर नेऊन ठेवते.

दादांच्या कथा वाचताना बरेच वेळा विद्याधर पुंडलीकांच्या कथांची आठवण येते. पुंडलीकां प्रमाणेच दादा घेतलेल्या अनुभवांची परिमाणं, स्वतःशीच तोलून बघतात. असं बघतानां त्यांच्या मनांत जी व्यामिश्रता निर्माण होते, ती ते वाचकांसमोर उभी करतात. 'अर्थ','प्राक्तन','पिंजरा','माझं काही चुकलं कां?' या कथा या शतकांतल्या अशाच संभाव्य, असंभाव्य घटना आणि व्यक्ती यांच्या जीवनाशी निगडीत असलेल्या आहेत. इतकंच नव्हें तर लेखकानें त्याच्या मनांत प्रत्येक घटनेचा आणि

कृतीचा पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष करूनच कथा रचल्या आहेत हे लक्षांत येतं. जुन्या काळांतील हरिभाऊ आपटे किंवा २०व्या आणि २१व्या शतकाच्या संधी कालांतील गंगाधरराव गाडगीळ यांनी त्या त्या कालांतील स्त्रियांची दु:खे चित्रित केली आहेत. थोड्याफार प्रमाणात दादा कारखानीसांनी पण हाच मार्ग चोखाळला आहे असं वाटतं. अर्थात, काळाच्या बदलाबरोबर स्त्रियांच्या दु:खाची कारणे आणि तपशील (details) बदलेला असणं अपरिहार्य आहे. त्या गरजेनुसार दादांची कथा अनुभवांचे नवनवे आकार शब्दांकित करीत राहीली. 'माझं काही चुकलं कां ?' मधली सुमित्रा, 'पिंजरा' मधली पमी, 'आशीर्वाद' मधली अनिता, 'प्राक्तन' मधली अनुराधा या स्त्रिया या काळाच्या प्रातिनिधीक रूप धारण करताना, मानवी मनाचा तिरकस वेध घेतात. आताच्या जीवनामधील गुंतागुंत आणि परिस्थितीनुरूप बदलत जाणारे स्त्रियांच्या भवितव्याबद्दलचे संकेत, अमेरिकेसारख्या प्रगत देशांतही तितक्याच प्रकर्षाने जाणवतात.

ज्या सूक्ष्मतेने कारखानीस स्त्रियांच्या दु:खाचे चित्रण करतात, तितक्याच हळूवारपणाने ते अपंग वृद्धांच्या अगतिक अवस्थेकडे पहात असतात. वृद्धाच्या मनांतील एकाकिपणा, रितेपणा आणि जिवंतपणी बायकोवर केलेला अन्याय आठवून 'सुधाकरला' झालेला पश्चाताप, दादांच्या "प्रायश्चित" या कथेत दिसतो. वृद्धापकाळी हरवलेल्या प्रेमाचा शोध घेण्यासाठी, भर वादळांत निघालेला 'रघुनाथ', आणि त्याची वाट पहाणारी 'शांता' ही दोन पात्रे शंन्नांच्या "तू तिथे मी" या चित्रपट कथेची आठवण करून देतात.

गिरीजा कीर यांनी, त्यांच्या प्रास्तविकात म्हटल्या प्रमाणे या जरी अनुभवकथा असल्या तरी त्यांत आत्मचिंतन आहे, परिश्रम आहेत आणि कथा वाचनीय करण्याचे कौशल्य आहे.

ऐंशी वर्षांपूर्वी, नानांचा जन्म खोपोली जवळील विहारी नांवाच्या खेड्यांत झाला.. त्यानंतरची वाटचाल, त्यांनी आपल्या पणतीला, सिमरनला लिहिलेल्या पत्ररुपी पुस्तकांत आपले सर्व बालपण, तसेच कसे कसे स्थलांतर करीत अमेरिकेत पोहोचलो, कोठल्या अडचणींना तोंड देऊन सुखरूप सुटलो व यशस्वी आयुष्य आनंदाने, न कुढत जगलो याचे सखोल वर्णन केले आहे.

नानांचं शालेय शिक्षण अंबरनाथ येथे, तर महाविद्यालयीन शिक्षण मुंबई येथील सिद्धार्थ महाविद्यालयांत झाले. एम.ए.ला त्यांचा प्रमुख विषय मराठी होता आणि इंग्रजी उपविषय होता. त्यानंतर त्यांनी सिद्धार्थमधूनच कायद्याची पदवी घेतली आणि मुंबई हायकोर्टात जवळ जवळ दहा वर्षे वकिली केली. १९६७ साली, त्यांना युगांडा कॉलेज ऑफ कॉमर्सने प्राध्यापकाच्या नोकरी संबंधाने विचारणा केली. ही चालून

आलेली संधी नानांनी स्वीकारली.

युगांडाच्या तीन वर्षाच्या वास्तव्यांत त्यांनी केनिया, टांझानिया, रवांडा, बुरूंडी, कांगो-किनशासा, इत्यादी आजुबाजूचे देश पाहिले. नुसते पाहिले नाहीत, तर अभ्यासले. तिथल्या चालीरिती, कुटुंब संस्था, स्त्रीयांचे प्रश्न यांचे बारकाईने निरीक्षण केले. तसेच त्या कालांत आजुबाजूच्या देशांत राजकीय घडामोडी काय आणि कशा होत होत्या याचाही अभ्यास केला. या सखोल चिंतनाचे प्रात्यक्षिक त्यांच्या "सिमरन" या पुस्तकांत दिसते.

१९६९-७० साली युगांडात सशस्त्र राज्यक्रांती झाली. इदी अमीन याने सैन्याच्या बळावर त्यावेळी असलेल्या प्रे. ओबोटे विरूद्ध बंड पुकारून राज्यसत्ता बळकावली. त्याच्या जुलमी राज्यसत्तेखाली अनेक भारतीय आणि इतर देशांचे लोक मारले गेले. युगांडामधे पळापळ सुरू झाली. कारखानीस कुटुंबाला युगांडामधून बाहेर पडायला बराच त्रास झाला. पण ते आपल्या तीन मुलांना घेऊन कसेतरी बाहेर पडले. अमेरिकेत असलेल्या एका भावाने त्यांना अमेरिकेचा व्हिसा मिळविण्यासाठी मदत केली.

अमेरिकेत आल्यानंतर त्यांनी एअर इंडिया मध्ये नोकरी मिळविली आणि वीस वर्षे नोकरी करून निवृत्ती घेतली. निवृत्तीनंतर काही दिवस ते अटलांटा-जॉर्जिया मध्ये राहिले व नंतर गेली पंधरा सोळा वर्षे ते ह्युस्टन-टेक्सास येथे स्थाईक झाले. पुण्याजवळील हडपसर येथील 'अथश्री' मध्ये त्यांनी एक सदनिका घेऊन ठेवली आहे व त्यामुळे वर्षातील चार महिने ते आपल्या पुण्याच्या घरी असतात.

सुदैवाने नानासाहेबांना मराठीतील अनेक मान्यवर साहित्यिकांचा सहवास लाभला. त्यांत सौ. गिरीजा कीर, कै. रवींद्र पिंगे, कै. गंगाधर गाडगीळ, कै. माधव गडकरी, सौ. सुनीताबाई नागपूरकर, विजया जोशी, वसुंधराबाई पटवर्धन, विद्या बाळ, प्राध्यापक अनंत काणेकर, बाळ सामंत, सुभाष भेंडे, चंद्रकांत वर्तक, व शं. ना. नवरे. तसेच त्यांच्या न्यूयॉर्क येथील वास्तव्यात विविध क्षेत्रातील नामवंत कलावंतांचा सहवास लाभला. त्यात सी. रामचंद्र, जितेंद्र अभिषेकी, प्रसाद सावकार, वंदना गुप्ते, जयंत सावरकर, प्रशांत दामले, भक्ती बर्वे, एच. एम. व्ही.चे जी.एन.जोशी, तसेच शेषराव वानखेडे, बाळासाहेब ठाकरे, प्रमोद नवलकर, छगन भुजबळ इत्यादीं मान्यवरांचा त्यांच्या मित्रपरिवारांत उल्लेख करता येईल. दोन मुलगे, एक मुलगी, सहा नातवंडे आणि दोन पणत्या, सर्व कुटुंबीय सुशिक्षित, वरच्या पदावर आहेत.

२००४ साली, त्यांनी आपल्या साहित्याची आवड असलेल्या मित्र-मंडळीं समवेत प्रत्येकी ५०० डॉ. संस्थापक सभासद वर्गणी गोळा करून "मराठी मित्र मंडळ" ही संस्था काढली आणि त्या संस्थेतर्फे "सावली" हा वार्षिक अंक श्री गणेश चतुर्थीच्या

सुमुहूर्तावर प्रसिद्ध करीत आले आहेत. सर्व सभासदांचे बिनव्याजी ५०० डॉ. तसेच इतर आजीव सभासदांचे १०० डॉ. परत करून २००९ च्या अखेरीला संस्थेने जवळ जवळ १७,००० डॉ. चा संचय केला. हे सर्व पैसे त्यांनी मंडळाच्या सभासदांच्या सल्ल्यावरून महाराष्ट्रातील विविध धर्मादायी संस्थांना, तसेच अमेरिकेतील Red Cross, American Heart Association, Cancer Research Institute या संस्थांना देणगीदाखल दिले.

काही व्यक्तींशी, अगदी तुमच्या बरेच वर्षापासून ओळख असलेल्या व्यक्तींशी देखील काय बोलायचे हा प्रश्न बऱ्याच वेळा पडतो. परंतु नानासाहेबांबरोबर फोनवर तास-दीड तास कसा सहज निघून जातो ते कळत नाही. गप्पा मारायला त्यांना अमुक एका वयोगटाचे, विषयाचे व स्त्री पुरुषाचे बंधन नसते. एक सहृदय, सत्वगुणप्रधान, प्रसन्न, हसतमुख व्यक्तिमत्व असलेला आणि सामाजिक बांधिलकी मानणारा हा माणूस! तसेच प्रवासाची आवड असल्यामुळे अखंड भ्रमण करणारा, मराठी, हिंदी आणि इंग्रजी साहित्याचा चौफेर व्यासंग असणारा आणि त्यातून जीवनाचा अन्वय लावण्याची वृत्ती असलेला हा माणूस! सदैव कोणाची लग्ने जमव, तर कोणाला नोकरी लाव, तर एखाद्या जोडप्याला कौटुंबिक मार्गदर्शन कर या मध्ये सतत गुंतलेला हा माणूस! सिमरन या पुस्तकाद्वारे त्यांनी पणतीलाच नव्हे, तर पुढील पिढीला मार्गदर्शन केले आहे. अडचणींवर मात कशी करायची, शैशव वयातील बरोबरीच्या मित्र मैत्रिणींचा दबाव आयुष्याला कसा घातक ठरतो व त्या दबावापासून कसे दूर राहायचे याचे उदाहरण, अशा अनेक गोष्टींद्वारे सिमरन हे पुस्तक पुढील पिढीला मार्गदर्शक ठरेल. पणतीला, सिमरनला त्यांनी जरी मराठी शिकण्याचे आवाहन केले असले तरी त्याचे इंग्रजी भाषांतर होणे जरुरीची आहे असे अनेकांचे म्हणणे पडल्यामुळे या पुस्तकाचे भाषांतर इंग्रजीत करण्याचे काम डॉ. विजया बापट यांनी हाती घेतलं आहे. या वर्षअखेर "सिमरन" - Life Without Regrets - या नावाने प्रसिद्ध होईल.

त्यांच्या पहिल्या वहिल्या कथा संग्रहाला त्यांनी जरी "परतीच्या वाटेवर" हे शीर्षक जरी दिले असले तरी त्यांची "परतीची वाट" अजून दूर आहे. त्यांचा या वयातील उत्साह, माणसांचा हव्यास, व मोकळ्या विनोदी स्वभावामुळे त्यांनी शंभरी कधी गाठल्याचे त्यांनाच कळणार नाही. अशा या पारिजातकाचा सुगंध वयाच्या शेवटा पर्यंत सर्वांमध्ये दरवळू दे व नानासाहेबांना शतायुष्य लाभो ही ईश्वर चरणी प्रार्थना.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

“ **भा**ई.. खरं सांगू का तुम्हाला... मी जे लग्न करायचा निर्णय घेतला तो फार विचारपूर्वक घेतला. तुम्ही जर मुंबई मधील अपंगांच्या संस्थांत चौकशी केली तर तुम्हाला माझं नांव अनेकांना ठाऊक असल्याचं कळेल. या संस्थांत मला ‘लताताई कर्णिक’ म्हणून ओळखतात. मी ज्या ज्या वेळी दादर अंध विद्यालयांत जात असे तेव्हां मला शाळेच्या संचालिका सौ. नमीता भट.. पूर्वाश्रमींच्या नमीता आजगांवकर.. तुमच्या बरोबरीच्या आणि सौ. नाईक या मुख्याध्यापिका होत्या.”

“ हो हो.. नमा आजगांवकर माझी सिद्धार्थ मधली क्लासमेट..!”

“ हो .. त्याच..! एक दिवस आम्ही दादरच्या समुद्रावर फिरायला गेलो होतो. नमीताताईंनी माझा हात आपल्या हातांत घेतला व गप्पा मारत आम्ही चौपाटीवर हिंडत होतो. भेळवाल्याकडून भेळेच्या पुड्या घेऊन शिवाजी पार्कच्या कट्टयावर जाऊन बसलो. बोलता बोलता नमीताताई मला म्हणाल्या.

“ कांहो लताताई, एक प्रश्न विचारू कां ?”

“ विचारा ना! काही हरकत नाही. मी तुम्हाला खरं ते उत्तर देईन.”

“ जरा नाजूक आणि Personal आहे.”

“ अहो मी काही तुमच्यापासून आता पर्यंत लपवून ठेवलं आहे का ? खुशाल विचारा..”

“लताताई, तुमचं लग्न झालेलं नाही हे मला माहीत आहे आणि त्याची कारणेही मी जाणूं शकते. पण आता यापुढे म्हणजे ४५ वर्षानंतर आणि वृद्धापकाळी सोबतीविना आपलं आयुष्य कसं जाईल याचा काही विचार केला आहे कां ?”

“ ताई, खरं सांगू, अहो नुसता मनांत विचार आणूनसुद्धां त्याचा काही उपयोग आहे कां ? या माझ्या वाढलेल्या वयांत आणि मुख्यतः माझ्या सारख्या आंधळीशी कोण लग्न करणार ? चेष्टा करता कां तुम्ही माझी ?”

हे बोलताना मला रडू येईलसं वाटत होतं.

“ नाही लताताई, मी तुमची चेष्टा करत नाही. अगदी सिरीयसली मी तुम्हाला तो प्रश्न विचारला. आता जग फार बदललय्. पुर्वीचे दिवस गेले. या १९५० च्या कालावधीनंतर समाज तर बदललाय पण त्याचबरोबर माणसंही बदललीत खूप. स्त्रीयांचे प्रश्न आता निर्वेधपणे वेशीवर टांगले जात आहेत. तुमच्यासारख्या शिकलेल्या

आणि अविवाहित स्त्रीने, या वयांतसुद्धां लग्नाचा विचार करणं म्हणजे काही पाप नाही असं माझं प्रांजल मत आहे. विचार करा घरी गेल्या नंतर."

आम्ही दोघी उठलो.

" भाई, त्यावेळी मला कल्पनासुद्धा नव्हती की आंधळ्यांची सुद्धां लग्न होतात, त्यांचे संसार होतात, आंधळे शिक्षण घेऊ शकतात, त्यांना नोकऱ्या मिळतात. भाई... त्या दिवसानंतर मी माझा-स्वत:चा विचार करूं लागले. माझ्या आंधळेपणाचा.. माझ्या अपंगत्वाचा.. माझ्या भवितव्याचा आणि उरलेल्या आयुष्याचा. त्या दिवशी मी घरी गेले. मन ठणठणत होतं. जुन्या आमच्या वाडीतल्या घरांतल्या एका खोलीत माझी वळकटी होती. मी कुढ्या सारखी ढोपरांत तोंड खुपसून बसली होते कोपऱ्यांत. इतक्यांत दाराशी कुणीतरी आलं आणि माझी चौकशी केली. मी उठून बाहेर येणार तितक्यांत माझ्या भावानं त्या माणसाला काहीतरी उत्तर देऊन वाटेला लावलं. मी 'त्या' घरांत होते आणि नव्हतेही. कारण, घरांतली माझी वाटणारी माणसं, माझं अस्तित्वच मानायला तयार नव्हती. मी एक अडगळीची वस्तू होते. आंधळी.. बोलता येत असून मुकी आणि कुटुंबावरची धोंड! भाई, शप्पथ घेऊन सांगते की घरांतली सर्व कामे मी बिनचुकता करत होते. झाडणे, कपडे धूणे, भांडी घासणे आणि भाज्या निवडणेसुद्धां! भाई, तुम्हाला माहित आहे ना की सर्वच डोळस माणसे काहीवेळां कामं करताना प्रत्येक वेळी डोळे वापरतातच असं नाही!"

" खरं आहे तुझं बोलणं." मी उत्तरलो.

" भाई, मी घरांत नगण्य, अपंग आणि सुशिक्षित कुटुंबावरील डाग म्हणूनच जगत होते."

एवढं एका दमांत बोलताना लताला धांप लागली. तिनं सराईत डोळस माणसासारखं टेबलावरील तांब्यातून फुलपात्रांत पाणी ओतून घटाघटा प्यायला सुरवात केली.

ᏓᏓᏓᏓᏓᏓ

१९८३ च्या नोव्हेंबर महिन्यांत आम्ही मुंबईला होतो. जयंतराव ताम्हाण्यांकडे असताना कौटुंबिक चर्चा चालली होती. कुणीतरी "बाया" चा विषया काढला. बाया माझ्या बायकोची आते बहिण. बाया होती खुजी.. जेमतेम पांच फूट. त्यांत पाठीला कुबड.. 'येरा गबाळा' अवतारच होता तो! बोलायला मात्र होती चतूर आणि वागायला साधी.. विनम्र! बायाचं खरं नांव होतं 'लता'. पण लाडाने सर्व घरची माणसं 'बाया' म्हणायची. मी एकदा बायकोला थट्टेनं म्हणालो की या 'निठव्या'साठी एखादा अमेरिकेतला 'लिलीपुट' शोधला पाहिजे. त्यावर हिनं एवढे

मोठ्ठाले डोळे केले की माझा विनोद, करपट ढेकरासारखा घशातच जिरून गेला.

बारावीनंतर बायानं सकाळचं कॉलेज सुरू केलं. बी.ए. झाली दुसऱ्या वर्गात. बायावर प्रोफेसर खूष होते. तिला M.A. च्या टर्मस् भरायला प्रोत्साहन देत होते. त्याच वर्षी बायाचे वडील हार्ट अॅटॅकने गेले. एक मोठा भाऊ सुरेश, नोकरीला होता आणि धाकटा सच्ची, इंटरला गचके खात होता. पण कॉलेज सोडायला तयार नव्हता. बायाने दादरच्या छबिलदासमध्ये नोकरी घेतली आणि बरोबर M.A. चा अभ्यास सुरू केला. शिक्षण क्षेत्रांत तिला जास्त आवड निर्माण झाली आणि एम.ए. झाल्यावर तिनं B.T. पण पुरं केलं. B.T. झाल्यावर तिला छबिलदासमध्ये बढती मिळाली.

लहानपणापासून तिची दृष्टी अधु होती. वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी बायाला एका डोळ्याचे ऑपरेशन करावे लागले. ऑपरेशन अयशस्वी झाल्यामुळे तिची दृष्टी अधिकच अधु झाली. वय वाढत होतं. तिशी ओलांडल्यानंतर बायानं लग्नाचा विचार मनातून कायमचा काढून टाकला.

बायानं चाळीशी ओलांडली आणि तिचा दुसरा डोळासुद्धा निकामी होऊ लागला. तिला कायमचे अंधत्व येणार याची कल्पना बायाला आधीच आली होती. बायाने वीस वर्ष शाळेत नोकरी केली होती. पण जेव्हां तिला अगदी दिसेनासे झाले तेव्हां शाळेने दोन वर्षाच्या पगाराची भरपाई देऊन तिला नोकरीतून कमी केले. आंधळी बाया जिद्दीची होती. तिनं दादर अंधशाळेत ब्रेल शिकण्यासाठी नांव नोंदवलं. तिची चिकाटी आणि यशस्वी होण्याची ईर्षा बघून प्रि. निमाताई भट तिला खूप प्रोत्साहन देत राहिल्या आणि दुसऱ्या वर्षानंतर तिला अंधशाळेत हंगामी शिक्षक म्हणून नोकरी मिळाली. पहिल्यापेक्षां पगार बराच कमी होता. पण काहीतरी काम मिळालं आणि थोडीफार आर्थिक गरज पण भागत होती. निमाताईंबरोबर काम करताना, दोघी शाळेबाहेरील अंधांना स्वच्छता, आरोग्य, सभ्य वागणूकीचे नियम आणि पैशाचे व्यवहार कसे करावेत याचे शिक्षण देत होत्या. त्यामुळे बायाचे "लताबाई कर्णिक" हे नांव अंध आणि इतर अपंगांच्या संस्थांत नावाजून राहिलं होतं.

नमीताताईंनी लग्नाचा विषय काढल्यामुळे, तिच्या निबर झालेल्या मनाला पुन्हा एकदा आशेची पालवी फुटायला लागली. " काय हरकत आहे लग्न करायला ? ..ती काही कुणावर अवलंबून नव्हती की कुणाची ओशाळी नव्हती.. पैशाने सुद्धां! वय जरी ४५ असलं तरी जोडीदार चांगला मिळाला तर पुढचं आयुष्यतरी सुखासमाधानांत जाईल. आता आईचा आधार आहे. पण ती कां जन्माला पुरणार आहे ? पुढं कुणाच्या तोंडाकडं पहायचं ?" हे विचार मनांत पिंगा घालूं लागले.

दुसऱ्या दिवशी तिनं नमीताताईंना या व्यक्ती बद्दलची माहिती विचारली. नमीताताई म्हणाल्या, " हे गृहस्थ तुमच्यापैकीच आहेत. वयानं जवळजवळ तुमच्या बरोबरीचे आहेत. आता पर्यंत त्यांनी कधी लग्नाचा विचार केला नाही. त्याला प्रमुख कारण म्हणजे ते स्वत: आंधळे आहेत. मिळकत बेताची आणि त्यांत आणखी कुणाची जबाबदारी घ्यावी हे त्यांना योग्य वाटलं नाही."

बाया कान लावून नमाताईंचा एकएक शब्द मन लावून ऐकत होती. तिला आश्चर्य वाटलं. कारण दोघेही एकाच जातीचे आणि आंधळे होते. दोघांच्याही गरजा सारख्या होत्या. हा विलक्षण योगायोग होता.

नमाताई पुढं म्हणाल्या, " लताताई, मला कल्पना आहे की तुमच्या मनांत काय चाललं आहे त्याची. प्रभाकर कर्णिक अशिक्षित नाहीत. पण ते तुमच्या इतके शिकलेले पण नाहीत. जेमतेम नववी-दहावीपर्यंत त्यांचं शिक्षण झालं आहे. पण ते स्वत: रूबी मिलमध्ये नोकरी करून आपलं आयुष्य कंठतात. स्वत:ची त्यांची परळला जागा आहे."

"नमाताई, तुमचे कसे आणि किती आभार मानावे ते मला समजत नाही. माझ्या मोठ्या बहिणी सारख्या आहांत तुम्ही. आतापर्यंत माझ्या कुटुंबानेसुद्धा कधी असा माझा विचार केला नव्हता. आज तसं पाहिलं तर तुमचा माझा संबंध एक शिक्षक आणि संचालक या नात्याचाच आहे. पण तरीसुद्धा जी तुम्ही माझ्या बद्दलची आपुलकी दाखविली, जे निस्वार्थी प्रेम तुम्ही मला दिलेत, त्याची मी जन्मांत आठवण विसरूं शकणार नाही. मला यावेळी माझ्या आवडत्या बहिणाबाईंच्या चार ओळी आठवतात:

" देवा आसं कसं मन ?
आसं कसं रे घडलं
कुठे जागेपनी तूले
असं सपन पडलं !"

नमाताई म्हणाल्या, " वेड्या आहांत तुम्ही लताताई ! अहो मोठ्या बहिणीनं लहान बहिणीचं भलं नाही करायचं मग कुणी ? उद्या मी कर्णिकांना बोलावते आणि मग तुम्ही दोघं ठरवा काय करायचं ते."

प्रभाकर कर्णिक आणि लता कर्णिक यांचे अंधशाळेच्या आवारांत लग्न झालं. सौ. नमीताताई आणि त्यांचे यजमान यांनी लताचे कन्यादान केलं. दोघे आपल्या परळच्या खोलीवर संसार मांडून आनंदात दिवस काढीत होते.

दर दोनतीन वर्षांनी आमच्या भारतात फेऱ्या व्हायच्या. त्याप्रमाणे १९९३ सालच्या

जून महिन्यांत आम्ही दोघं पुन्हा मुंबईला गेलो. प्रभाकर आणि लताचा संसार कसा चाललाय हे पहाण्याची मला तीव्र उत्सुकता होती. फोन करून आम्ही दुपारचे परळला गेलो. बरोबर माझा कॅमकॉर्डर होता.

परळच्या एका मोठ्या दुमजली चाळीत तळमजल्यावर कर्णिकांची खोली होती. आम्ही गेल्यावर दरवाज्यावरची बेल वाजवली. बायाने दरवाजा उघडला आणि "लिले...." म्हणून हिच्या गळ्याला अत्यानंदाने मिठी मारली. क्षणभर मी स्तंभीत होऊन मागेच उभा राहिलो. बायाच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रू वहात होते. त्या दोघींच्या पाठोपाठ मी घरांत शिरलो.

बाया म्हणाली, " लिले, तुला कळणार नाही आम्हाला किती आनंद झालाय् ते. माझी बहिणाबाई जर इथं असती तर म्हणाली असती :

" माझं दुखं माझं दुखं, जशी अंधाराची रात
माझं सुख माझं सुख, हातातली काडवात,
माझं दुखं माझं दुखं, तयघरांत कोंडले
माझं सुख माझं सुख, हंड्या झुंबर लावले.."

" अहो 'बहिणाबाई' आधी घरांत आलेल्या बहिणाबाईंना बसायला तरी सांगा. मग आपले काव्यगायन सुरू करा." खुर्चीवर बसलेले गृहस्थ बोलले.

हेच ते प्रभाकर कर्णिक. ठेंगणे.. जेमतेम पांचफूट तीन चार इंच, गोरटेले आणि गोल-प्रसन्न चेहऱ्याचे. अंगात पांढराशुभ्र शर्ट आणि तसाच पांढरा लेंगा. डोळ्याच्या खाचा झालेल्या आणि गळणारे पाणी टिपण्यासाठी हातांत एक रूमाल. वय असेल अदमासे साठीतील. आम्ही त्यांना प्रथम पहात होतो. बाया मात्र त्यामानाने जास्त म्हातारी आणि थकलेली दिसत होती. केस पिकले होते. गालाची हाडं बरीच वर आलेली. त्यामुळे नाकाचा शेंडा अधिकच दबलेला दिसला. तिच्याही डोळ्याच्या खांचा; पण जास्त खोल. पाठीचं कुबड, कमरेला आणखीनच बांक आणून देत आहेसे वाटलं.

सौ.कडे कॅमकॉर्डर सोपवून कर्णिकांच्या समोरच्या खुर्चीवर मी टेकलो. बायाने गार पाण्याचा तांब्या पेला आणून आम्हाला फुलपात्रांतून पाणी दिलं.

" बरं का भाईसाहेब, कुणी आमच्या घरी आलं की त्याचं स्वागत, बहिणाबाईच्या ओव्यातून करतात आमच्या बाईसाहेब! कुणाला आवडो अगर न आवडो.. बहिणाबाईचा हा पहिला डोस पाजल्याशिवाय हिला चैन पडत नाही." कर्णिकांनी सुरवात केली.

" अहो भाऊसाहेब, त्यांत काही गैर झालं नाही. उलट आम्हां दोघांना बहिणाबाईचे खूप आश्चर्य वाटतं. एका अशिक्षित बाईनं आपल्या ओव्यांतून, जे विचार मांडले,

ज्या भावना व्यक्त केल्या त्यांचा अर्थ आणि तत्वज्ञान समजून घेण्यासाठी अनेक प्रयत्न करताहेत मराठी भाषेचे स्वाभिमानी. अगदी आमच्या अमेरिकेतसुद्धा बहिणाबाईवर लिहिणारे बरेच साहित्यिक आहेत."

" काय म्हणता ? अमेरिकेत बहिणाबाईची ओवी अभ्यासली जाते ? आश्चर्य आहे ! आमच्या लताने M.A. ला असताना तिच्यावर प्रबंध लिहिला होता."

भाऊसाहेबांची भाषाशैली आणि संभाषण चातुर्य पाहून हा माणूस फक्त नववी दहावीपर्यंतच शिकला आहे हे सांगून सुद्धा खरं वाटलं नसतं.

" भाऊसाहेब, आज दहा वर्षानंतर तुमची आमची भेट होत आहे. तुमचं दोघांचं लग्न झालेलं आम्हाला कळलं. आश्चर्य वाटलं, पण तितकाच आनंदही झाला. तुम्ही दोघे पन्नाशीला पोचलेले त्यावेळी. शिवाय दोघेही अंध. दोघांच्या शिक्षणांतही तफावत ! मला सांगा हे तुम्हाला कसं साधलं ?"

माझ्या बायकोनं कॅमकॉर्डर खांद्यावर घेऊन रेकॉर्डिंगला आधीच सुरवात केली होती.

" भाईसाहेब, मी मुळचा डहाणूचा. माझा जन्म १९३० जून महिन्यातला. वडील लवकर वारले. मी पांच वर्षाचा आणि धाकटी बहीण दीड वर्षाची. तिही पुढे चार वर्षाची असताना तापसरीमध्ये गेली. घरची अत्यंत गरीबी. डहाणू त्याकालांत एक खेडेगांव. शेती, मच्छीमारी आणि ताडीमाडीचा धंदा. आई दुसऱ्यांच्या घरी स्वैपाकपाणी करायची. केंबळीचं आमचं घर होतं डोक्यावर. तेवढाच निवारा. सातवीपर्यंत शिक्षणाची गाडी ढकलली. बारातेरा वर्षाच्या मुलाला कसलं काम धंदा मिळणार गावांत ? त्यांत देवी आल्यामुळे माझा एक डोळा गेला होता. आईनं मला दादरला मावशीकडं पाठवलं. मावशी पण गरीब होती. तिला दोन मुलगे आणि चार मुली होत्या. मी घरातली सर्व कामं करायचो. छबीलदास शाळेत नांव घातलं. जेमतेम नववीपर्यंत गाडी ढकलली. त्यांत दुसऱ्या डोळ्यानी अंधुक दिसायला लागलं. परळच्या के.ई.एम. हॉस्पिटलांत, गरिबांना फुकट औषधं आणि उपचार करून मिळत त्या कालांत. तिथं माझं डोळ्याचं ऑपरेशन झालं." भाऊसाहेब खिन्न चेहरा करून कुठेतरी शून्यांत पहात राहिले.

"मग पुढं काय झालं.. ?" माझी उत्सुकता वाढत होती.

"ऑपरेशन यशस्वी झालं नाही. माझा दुसरा डोळा पण गेला. मी संपूर्ण आंधळा झालो. कसे तरी सहा महिने काढले आणि एक दिवशी वरळी येथील राष्ट्रीय अंध संस्थेत चालत गेलो. (National Association for Blinds-Worli), तिथं मला हातमागावर कापड विणण्याचे, बॉबिन भरण्याचे शिक्षण मिळालं. माझी बुद्धी

तल्लख होती. शिकवणारे मास्तर खूष होते. एक वर्षभर मी हे शिक्षण घेतलं आणि मास्तरांनी माझं नांव परळच्या क्राऊनमीलच्या जॉबरला कळवलं. चार रुपये रोजाने मी क्राऊनमील मध्ये नोकरीला लागलो. माझा पहिल्या महिन्यात पगार बारा रुपये तेरा आणे मिळाला. मला खूप आनंद झाला. मी मावशीला पेढे नेऊन दिले."

भाऊसाहेबांनी पेल्यातून पाणी घेतलं.

"कामावरून सुटल्यावर मी वरळीला परत अंधशाळेत जायचो आणि मास्तर सांगतील ती संस्थेची कामे करायचो. मोबदल्यांत ते मला ब्रेल लिपी शिकवायचे. मला वाचनाचा खूप नाद लागला. वेळ मिळेल तेव्हां मी चांगले मराठी साहित्य वाचायचो. मला राम गणेश गडकरी आणि पु.ल.देशपांडे यांची पुस्तके आवडायची. शिवाजीपार्कवर साने गुरूजी, आचार्य अत्रे, कॉमरेड डांगे, दादासाहेब ठाकरे, एस.एम.जोशी, जयप्रकाश नारायण यांची भाषणे ऐकायचो. त्यामुळे मला समाजकारण, राजकारण, अर्थशास्त्र, तत्वज्ञान या विषयांची गोडी लागली. समाजवादी पक्षाचा मी मेंबर झालो व बेचाळीसच्या चळवळीतपण भाग घेतला."

"पण मला आता हे सांगा की पन्नाशी उलटल्यानंतर तुमच्या मनांत लग्नाचा कां व कसा विचार आला ?" मी पृच्छा केली.

"भाईसाहेब, तरुणपणी मी आंधळा झालो. त्यांत माझं शिक्षण बेताचं. मिळकत जेमतेम एका माणसाला पुरेशी. त्यामुळे मी लग्नाचा विचारच मनांतून काढून टाकला होता. पुढे नोकरीत बढती मिळाली. चार पैसे कनवटीला साठूं लागले. ही परळला भाड्याची खोली मिळाली. आजूबाजूला काय चाललंय याचा मला अंदाज येत होता. सुखापेक्षा, माणसं जास्त दु:खच भोगत होती. लोकांना नेहमीप्रमाणं अडचणी येत होत्या. माझे कित्येक सहकारी आणि इतर मित्र, त्यांची गाऱ्हाणी माझ्याकडे घेऊन येत असत. मी त्यांना माझ्या शक्तीप्रमाणे मदतही करत होतो, सल्ला देत होतो. मी त्यांना सांगायचो..

"रडूं नको माझ्या जीवा तुले रडण्याची रे सव
रडूं हांसव रे जरा त्यांत संसाराची चव...
हास हास माझ्या जीवा असा संसारात हास
इडापिडा संकटाच्या तोंडावल्हे काय फास.."

"अरे वा भाऊसाहेब, तुम्हीपण 'बहिणाबाई' गायला लागलात !" मी पुटका टाकला.

" अहो दहा वर्ष हिच्याबरोबर आता संसार करतोय. वाण नाही पण गुण लागलाय थोडासा. नाही कां लता ?"

" हो हो .. कायपण स्तुती करताय माझी उगाचच !"

"ते जाऊ दे. पण तुम्ही बायाशीच कां लग्न केलंत ?" मी विषयाचा धागा धरून

पुन्हा गाडी रूळावर आणली.

"त्याचं असे झालं की मी मधुनमधुन दादर अंधशाळेत तिथल्या अंध विद्यार्थ्यांना स्वच्छता, आरोग्य, शिस्त इत्यादी विषयांत धडे द्यायला जात असे. एका सायंकाळी शाळेच्या संचालिका, नमाताई भट यांना म्हटलं,.. 'ही एवढी मोठी विदुषी.. एम.ए.बी.टी. शिकलेली आणि मी कॉलेजचे तोंड सुद्धा पाहिले नव्हतं. शिवाय ही एका शाळेची हेडमास्तर होती आणि मी आपला एक गिरणी कामगार! नाकापेक्षा मोती जड व्हायचा!'

नमाताई म्हणाल्या, 'अहो कर्णिक, भेटून तर पाहा एकदा आमच्या लताताईना. नाहीच जमलं तर 'हा माझा मार्ग एकला' म्हणत चालू राहील तुमचं आयुष्य!'

मी विचार केला, "मी आंधळा आणि ही बाई पण आंधळी. दोघेही आधार शोधीत आहेत म्हातारपणी! नाहीतरी म्हातारपणी आपल्याला काही आजार वगैरे झाला तर कोण पाणी द्यायला येईल? पडलं झडलं तर उठवायला कुणी तरी हात देईल कां? हा आधार शोधताना, तिनं मला आणि मी तिला एकमेकांच्या सहवासाचं थोडंफार जरी सुख देऊ शकलो तरी ते पुरेसं आहे. अश्या जगण्याला मी 'ममतामय सहजीवन' असं नांव दिलं आहे. हे सहजीवन जगण्याची कल्पना लताला आवडली आणि आम्ही लग्न केलं."

"बाया, आता तू मला सांग की तुम्ही दोघेही आंधळे असताना हा तुमचा संसार कोणत्या कारणांमुळे यशस्वी झाला असावा असं तुम्हाला वाटतं?"

"भाई, संसार ही तडजोड आहे. इच्छा, अपेक्षा जास्त वाढवल्या नाहीत तर मला वाटतं संसारात शांती आणि समाधान जास्त नांदतं. तसंच बऱ्याच संसारातल्या गोष्टी एकमेकांवरील विश्वासावर अवलंबून असतात असा माझा अनुभव आहे. मी प्रथम जेव्हां यांना भेटले.. दहा वर्षापूर्वी, तेव्हां यांचा स्निग्ध आवाज ऐकून भारावून गेले. या आवाजांत जितके गांभीर्य होतं तितकाच आत्मविश्वास आणि सहानुभूती होती. मला दृष्टी नसल्यामुळे ह्यांचे रूप मी पाहू शकले नाही किंवा माझीही कुरूपता ह्यांना दिसली नाही. आमचं लग्न हे एकमेकांना आधार देण्याच्या इच्छेनेच झालं. लग्नानंतर आमची मनें आपोआप जुळली आणि आजतागायत ती जुळलेली मनं कधीच विभक्त झाली नाहीत. मी माझ्या मनाला नेहमी सांगत आले,

"ऐक ऐक माझ्या जीवा पीडायेलाचं कन्हनं..
दे रे गांजल्याचे हात त्यांच ऐक रे म्हननं.."

" भाऊसाहेब, आम्हा डोळस माणसांना खूप हव्यास असतो.. नेहेमी काहीतरी नवीन .. काहीतरी जास्त मिळत रहावं असं वाटत असतं. तुम्ही दोघेही आंधळे आहांत. तुमच्यांत अशी हव्यासाची भावना निर्माण होत नाही कां? दुसऱ्याला जे

मिळतं ते आपल्याला मिळत नाही म्हणून ते मिळवणाऱ्यांचा हेवा किंवा तिरस्कार नाही कां वाटत तुम्हाला कधी ?"

" होतं... काहींच्या बाबतीत जरूर होतं! कारण या मूलभूत मानवी भावना आहेत. पण आम्ही दोघं आमच्या आयुष्यांत इतके तृप्त आहोत की हव्यास आम्हाला शिवत नाही. उलट आमच्याकडून जर कुणाला कशाची थोडीफार मदत झाली तर आम्हाला आनंद आणि समाधान होतं. जगांत आपल्यापेक्षा जास्त गरजू माणसं अनेक आहेत. दुसरं असं, की आम्हाला न मिळणाऱ्या गोष्टी इतरांना मिळतात म्हणून त्यांचा हेवा किंवा तिरस्कार वाटण्याची वेळच येत नाही. कारण दुसऱ्याला काय मिळालं हे आम्ही पाहू शकत नाही. मला वाटतं, की आयुष्यांत काय मिळवलं ? यापेक्षा काय दिलं! याला जास्त महत्त्व आहे."

" पण याचा अर्थ असा नाही कां की जी गोष्ट तुम्हाला हवी आहे, ती गोष्ट तुम्हाला मिळणार नाही याची खात्री असल्यामुळे तुमची हव्यासाची इच्छा कमी झाली असावी ?"

" नाही.. तसं नाही. सर्वांचेच बाबतीत हा नियम लागू पडणार नाही हेही मला मान्य आहे. कारण आपली म्हण आहे की 'व्यक्ति तितक्या प्रकृती'. पण एक गोष्ट निश्चीत. हव्यास हा पुष्कळवेळा संस्कारांवर अवलंबून असतो. हव्यासाचे बाबतीत दृष्टी असणारा अथवा नसणारा यांत तसा फरक काही नाही. फक्त संस्कार! लहानपणापासूनचे होणारे संस्कार या बाबतीत निर्णायक ठरू शकतात. आमच्या बाबतीत मात्र मी म्हणूं शकेन की आम्हाला कसलाही मोह अथवा हव्यास उरला नाही या आयुष्यांत. आमचं ममतामय जीवन चालूच आहे."

२००२ साली कळलं की भाऊसाहेब कर्णिक हृदय विकाराच्या झटक्याने त्यांच्याच घरी निवर्तले. आम्ही दोघांनी बायाला सांत्वनपर पत्र पाठवलं.

तिचं त्यावर चार ओळींचं पत्र आलं.

" सांग सांग धरतीमाता अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंधीसनी मागे सावली उरली
अरे रडता रडता डोये भरले भरले
आंसू सरले सरले आता हुंदके उरले .."

दिवाकर कारखानीस – ह्युस्टन
**email - dkarkhan80@gmail. com.**
'सावली'च्या सौजन्याने

************

## डॉक्टर तुम्हीसुद्धा ? : शिरीष किर्तने



"**डॉ**क्टर तुम्हीसुद्धा.................. ? डॉक्टर किर्तने, तुम्हीसुद्धा पेशंट्सना तपासायचे सोडून, Operations करायची सोडून, लेख वगैरे लिहायचा प्रपंच करायला लागलात ? नाहीं, माझा प्रश्न विचारायचा रोख तसा नव्हता, म्हणजे तुंम्ही डॉक्टर लोक आपल्या कामात एवढे बिझी असता तर तुम्ही वेळ कोठून काढता ?"

"फ्लोरिडाचे डॉक्टर शिरीष किर्तने यांच्याशी मी फोन वरून गप्पा मारत होतो, तेव्हां त्यांना गंमतीने सहज विचारत होतो. यावर ते अगदी मोकळेपणी हसून म्हणाले,"...

"तुम्ही म्हणता ते खरं आहे, पण त्यातूनच कधीतरी वेळात वेळ काढून हौशीने लिहितो. त्याचं काय आहे, तेंडुलकर..... आमच्या वैद्यकीय क्षेत्रात तऱ्हेतऱ्हेचे लोक भेटतात, वेगवेगळे अनुभव येतात, काही प्रसंग तर फार गंमतीदार असतात, तर कधी कींव करण्यासारखे. या सर्वांची गोडी इतरांनाही चाखायला मिळावी म्हणून थोडेफार लिहितो एवढेच."

तसं पाहायला गेलं तर डॉक्टर-लेखक मंडळी बरीच आहेत व होऊन गेली आहेत. उदा. डॉ. अ.वा. वर्टी, डॉ. रमा मराठे, अमेरिकेतील डॉ. ललिता गंडभीर, डॉ. सुशील करमरकर आणि इंग्लंडचे डॉ. चंद्रशेखर प्रधान ह्यांचे एकता, सावली मधून लेख प्रसिद्ध झाले आहेत.

डॉ. शिरीष किर्तने माझ्यापासून अमेरिकेच्या दुसऱ्या टोकाला राहत असल्यामुळे, या पुस्तकाकरिता त्यांची माहिती फोनवरून मिळविण्याशिवाय गत्यंतरच नव्हते. तसे त्यांचे "एकता" या टोरोंटोहून प्रसिद्ध होणाऱ्या त्रैमासिकातून, "सावली" या ह्युस्टनच्या दिवाळी अंकातून प्रसिद्ध झालेले लेख बरीच वर्षे वाचीत आलो आहे. संभाषणातून त्यांनी मला त्यांची सर्व माहिती अगदी मोकळेपणाने सांगितली.

"माझा जन्म इंदूरला व शालेय शिक्षण बडोद्याला झाले. शाळेत असल्यापासूनच मी गोष्टी लिहायला सुरुवात केली."

**"मग तुमची पहिली गोष्ट कशावर आधारित होती?"**

"मी शाळेत असतांना पहिली गोष्ट फकिरावर लिहिली. माझ्या लहानपणी आमच्याकडे ज्योतिषी, साधू, फकीर मंडळी यायची. वडिलांचा त्यांच्यावर विश्वास असल्यामुळे मलाही त्याची आवड निर्माण झाली व मीही त्यात रस घेऊ लागलो."

**"आणखी कोठल्या मासिकांतून तुम्ही लेख लिहिलेत?"**

"वैद्यकीय क्षेत्रात डॉक्टर मंडळींचा इतक्या लोकांशी संबंध येतो की, म्हटलं तर हजारो गोष्टी लिहिता येतील. माझ्या स्वत:च्याच मेडिकल व्यवसायामधील अनुभव सांगायचे झाले तर बऱ्यापैकी करमणुकीचा कार्यक्रम होईल. मी व माझ्या पत्नीने, कल्पनाने मिळून 'कशिदा' हा कथासंग्रह प्रसिद्ध केला. तसेच माझ्या बऱ्याचशा गोष्टी येथील एकता, सावली, स्नेह, अभिरुची या त्रैमासिकातून-दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. किर्लोस्कर, अनुराधा ह्या महाराष्ट्रातील अंकांतूनही माझे लेख प्रसिद्ध झाले आहेत. ओर्लान्डोला मी व माझ्या पत्नीने तीन वर्षे 'रसिका' नांवाचा दिवाळी हस्तलिखित अंकही काढला होता."

**"डॉक्टर, तुमच्या लेखनावर एखाद्या नामवंत लेखकाचा प्रभाव पडला आहे का? म्हणजे मला असं विचारायचे आहे की, तुमच्या लेखनाच्या शैलीची कोठल्या लेखकाच्या साहित्याशी तुलना करता येईल?"**

"मी बऱ्याच नामवंत लेखकांचे साहित्य वाचले आहे. त्यातून मला जास्त करून नारायण धारप आणि रत्नाकर मतकरी यांच्या कथांमधील योगायोग आणि सांकेतिक कलाटणी (twist) याचा माझ्या लिखाणावर थोडाफार परिणाम झाला असावा असं मला वाटतं. माझ्या मते लिखाण वाचकांचे मनोरंजन करणारं असावं, शक्यतो दु:खद नसावं आणि म्हणूनच माझ्या बऱ्याचशा कथा गंभीर नाहीत. अमेरिकेत डॉक्टर लोकांवर पेशंट्स व त्यांचे नातेवाईक केसेस करतात, पण, मी या विषयावर लिहू शकलो नाही. तसेच लिखाण वास्तववादिही असावं. लेखकाला स्वत:ची अशी शैली असावी. माझ्या व्यवसायाकडे यतार्थपणे लक्ष देऊन, संसारातही लक्ष ठेवून मी जे काही लेखन केलं, त्यात माझ्या पत्नीचा, सौ. कल्पना हिचाही मोठा सहभाग व मदत होती, तेव्हां कौटुंबिक आणि व्यावसायिक, अशा दोन्ही जबाबदाऱ्या आम्ही यशस्वीरीत्या पार पाडल्या व त्यामुळे माझ्या व्यावसायिक यशापयशावर विशेष परिणाम झाला नाही."

**"तुमच्या एकता व सावली मधील कथा मी वाचल्या आहेत आणि त्या बहुतेक विनोदी होत्या. "संशय का मनी आला!" ही कथा तुम्ही छान रचली आहे. ऑफिसमधील साहेब आणि त्याची सेक्रेटरी यांच्या संबंधावर आधारित, पण सस्पेन्स राखून शेवटी तुम्ही गोड कलाटणी दिली आहे. त्यामानाने**

**"यक्षप्रश्न" ही कथा गंभीर नसली तरी तुमच्या एरव्हीच्या लिखाणाच्या चाकोरीबाहेरची वाटते."**

"हो. "यक्षप्रश्न" या कथेतून मी अमेरिकेतील ज्येष्ठ, निवृत्त झालेल्या मराठी जोडप्याचा, उर्वरित आयुष्य कसे घालवायचं ही सर्वसामान्य समस्या रेखाटली आहे आणि त्याचे माझ्या मते संयुक्तिक उत्तरही मांडले आहे. शेवटी आयुष्यात सर्वांना तडजोड ही करावीच लागते व तडजोड केली तरच कौटुंबिक स्वास्थ्य लाभते आणि त्यातच सर्व कुटुंबियांचा फायदा आहे, असं मला वाटतं."

**"मराठी लिखाणामुळे तुमचं मन मायदेशी ओढ घेतं का?"**

"अवश्य. ओढ न घेते तर नवल. महाराष्ट्रातील गरजू संस्थांना जमेल तसे आर्थिक सहाय्य करतो आणि कौटुंबिक फेऱ्याही होतातच. आधी सांगितल्याप्रमाणे घरीही तीच संस्कृती आचरणात ठेवल्यामुळे तितकेसे चुकल्या चुकल्या सारखे वाटत नाही."

**"तुम्ही अमेरिकेत आलात तेव्हां इतरांसारख्या तुम्हालाही अडचणी आल्याच असतील, नाही का?"**

"मी मेडिकलला असतांना कॉलेजमधील बरीच मुले अमेरिकेत जायची, त्यामुळे मीही जायचे ठरवले. अमेरिकेत येणारे बहुतेकजण सुरुवातीला परत भारतात जायचं म्हणतात आणि येथील वैभवाच्या मोहजालात अडकून पडतात. मीही त्यातील एक. शल्य विशारदांना अमेरिकेत त्यावेळी तेव्हढीशी मागणी नव्हती, त्यामुळे मार्ग बदलावा लागला. तडजोड करावी लागली. १९७६ साली मी येथे आलो. शल्य विशारदच्या ऐवजी मी Pulmonary Medicine आणि Critical Care ची निवड केली. भारतातून आलेलो असल्यामुळे, सुरुवातीला इतरांना येतो तसा भेदभावाचा त्रास झाला व त्यावेळी जीवनाचा खरा अर्थ कळला आणि आयुष्यात पुढे कदाचित याहीपेक्षा जास्त मानसिक त्रास होणारे अनुभव येतील म्हणून तयारीही झाली."

**"लेखना व्यतिरिक्त आणखी काही छंद?"**

"लेखनाशिवाय मी तबला वाजवतो, बऱ्याचशा एकांकिकांमधून मी कामही केले आहे. मला धार्मिक तत्वज्ञानावरील साहित्य वाचण्याची आवड आहे. 'हिंदू धर्म' व 'Big Bang Theory' यांची सांगड घालून त्यावर आधारित पुस्तक लिहिण्याचे स्वप्न आहे."

**"स्त्रीमुक्ती चळवळीबद्दल तुमचे मत काय आहे?"**

"पुरुष आणि स्त्री यांना समान हक्क जरूर हवेत, पण ते मिळणे अशक्य.

स्त्रीमुक्ती जिथे व्हायला हवी तिथे तिचा मागमूसही नाही. "मिळून साऱ्या जणी" हे मासिक वाचणाऱ्यांना स्त्री मुक्तीची जरुरी नाही. म्हणजे, ते मासिक वाचणाऱ्या स्त्रिया सुशिक्षित समाजातील आहेत, त्यांची स्त्री-मुक्ती झालेली आहे. त्यापेक्षा अनाथ, किंवा सासरच्या मंडळींकडून छळ होणाऱ्या नव-विवाहितांना सहाय्य करावे. मला कल्पना आहे की, 'नारी समता मंच' प्रकल्प सौ. विद्या बाळ यांनी पुण्याला हाती घेतला आहे. मला एव्हढंच म्हणायचं आहे की, मासिकापेक्षा असे विधायक कार्य जास्त उपयोगाचे ठरेल. माझ्या मते स्त्रीमुक्तीच्या नांवाखाली स्वैराचार बोकाळला आहे. पुरुष नेहमीच स्वैराचार करीत असतात. आता स्त्रियाही करू लागल्या आहेत."

**"बदलत्या जगाबद्दल आणि सध्याच्या तरूण पिढीबद्दल तुम्हाला काय वाटते?"**

"बदलते ते जग आणि न बदलणारा तो गज......गजानन. माणूस बदलला तरी देव तोच आहे तो कधी बदलणार नाही असं मला म्हणायचं आहे. या एकविसाव्या शतकात जग एवढे जवळ आले असूनही, माणूस मात्र लांब गेल्यासारखा वाटतो. सर्वत्र स्वार्थ, तोंड-दाखलेपणा दिसून येतो. कदाचित हा पाश्चात्य संस्कृतीच्या सान्निध्याचा (Influence) परिणाम असावा, राजकारणी लोकांत भरलेला संपत्तीचा, सत्तेचा हव्यास हेही त्याला कारण आहे. "कुणी कुणाचे नाही.... जो तो अपुले पाही" अशी गत आहे."

"आजच्या मुलांना मोठ्या माणसांबद्दल आदर नाही, त्यांना संस्कृती नाही, असं सोक्रेटीस म्हणाला होता. त्यामुळे आमच्या पूर्वजांनीही हेच म्हटले, पण तरीही आजची पिढी "मी प्रथम" किंवा "मला द्या" या पंथातील आहे. दोन पिढींतील संस्कृतीमध्ये नेहमीच फरक पडत आलेला आहे आणि तो तसाच पडत रहाणार आहे. त्याला तुम्ही प्रगती म्हणा, अथवा अधोगती. संस्कृती टिकवायला, मुलांना घरचे वळण, वातावरण आणि योग्य, अर्थ जाणवून, समजून देणे आवश्यक आहे. पालकांनी ती जबाबदारी आधी स्वत:ला शिस्त लावून, मग मुलांनाही लावली, तर मला वाटते की, तुमची पुढील पिढी मराठी-हिंदू संस्कृती टिकवून ठेवेल. आपल्या हिंदू धर्मात ज्या काही चांगल्या रूढी-प्रथा आहेत त्याचा व्यवस्थित अर्थ मुलांना लहानपणापासून समजावून सांगितला तर ते त्याचे पालनही व्यवस्थित करू शकतील. मी, माझ्या व माझ्या पत्नीचा, कल्पना हिचा मोठेपणा म्हणून सांगत नाही, पण आमची दोन्ही मुले आज येथील महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करूनही आपल्या रीतीरिवाजांचे न सांगता आचरण करीत आहेत. दोघेही येथे जन्मलेले, वाढलेले असूनही स्वच्छ

मराठीतून बोलतात, मारुती स्तोत्र, गणपती अथर्वशीर्ष म्हणतात. धाकट्या मुलांनी तर त्याचा पदवीदान (Graduation) समारंभ Duke University मधून, हिंदू पद्धतीतून घेतला व त्यावेळी त्याने मराठीतून हिंदू धर्माबद्दल छोटेसे भाषणही केले."

"ही खरोखरच कौतुकास्पद आणि अभिमानाची गोष्ट आहे. मला वाटते मराठी कुटुंबातील जेमतेम १-२ टक्के मुले जी येथे जन्मलेली आणि वाढलेली आहेत, ती मराठी मधून बोलत असतील. माझ्या कॅलिफोर्नियातील येथे जन्मलेल्या आणि वाढलेल्या दोन्ही पुतण्या आता जवळ जवळ ४० च्या आसपास आहेत. त्याही चांगले, मराठीतून बोलतात आणि मोठी पुतणी तर तिच्या मुलांकडून रोज संध्याकाळी श्री गजाननाची प्रार्थना म्हणवून घेते."

डॉक्टर किर्तने, आपला बहुमोल वेळ काढून तुम्ही मला हा संवाद साधून या पुस्तकासाठी माहिती दिलीत, त्याबद्दल धन्यवाद.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

## संशय का मनी आला

**आ**ता मात्र मीनाला राग आला होता. आता, राग आला होता, का शंका-कुशंका-संशय- माहीत नाही पण लोभ आणि कौतुक मात्र नक्कीच नाही. मीनाच्या टीमचे project संपले होते. आजच ते approve पण झाले होते. यामुळे एक छोटी पार्टी झाली होती आणि लवकर घरी जायला मिळणार होते. या project मुळे काम बरंच वाढलं होतं. त्यामुळे घरी यायला जरा उशीरच व्हायचा. अर्थातच त्याचा अवीला काहीच फरक पडला नव्हता कारण त्याला घरी यायला सात साडेसात नेहमीच व्हायचे.

पण आजच्या यशामुळे मीनाने अवीला कॉल केला. घरी लवकर ये. मग बाहेर जेवायला जाऊ मग 'लेकवर' चालायला जावे असा मीनाचा विचार होता. पण अवीच्या उत्तराने तिची निराशा झाली. मग राग आला मग शंका आली आणि मग संशय यायला लागला. म्हणे, "I can't come early today. We are having a party for कॅरन!"

मीनाला बऱ्याच वर्षापूर्वीची गोष्ट आठवली साधारणतः १० वर्षापूर्वीची गोष्ट. ग्रॅज्युएट झाल्यावर M.Sc. करायचं का नोकरी करायची याबद्दल ठरत नव्हते पण एक इंटरव्ह्यू आला आणि मग 'जाऊन तर पाहू.' असा विचार करून ती इंटरव्ह्यूला गेली. मीनाचे ग्रह उंचीला होते का काय माहीत नाही पण तिला जॉब ऑफर आली. आता काय करायचे हा प्रश्न पडला. पण मग "Let's make some money." असा विचार करून तिने जॉब घेतला आणि मग नोकरी सुरू झाली. "बाटलीवाला-बाटलीवाला आणि दारूवाला" या कंपनीत तिला पर्सनल सेक्रेटरी म्हणून काम मिळाले होते. तसे काम करायला डोकं लागणार नव्हते, म्हणजे challenging वगैरे काही नव्हते पण कंपनी प्रेस्टिजियस होती आणि ६ फूट उंच Handsome बॉस! मीनाला वाटले, आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो.....

अविनाश म्हणजे अवी, एक Computer Engineer असून त्याने MBA केलेलं होतं. त्यामुळे या कंपनीत त्याच्या बुद्धीला चॅलेंज होते. कामही भरपूर जबाबदारीचं पण खूप. त्यामुळे मीनाकडे लक्ष द्यायला त्याला वेळ नव्हता. (असं अर्थात मीनाला वाटले) पण मीना स्मार्ट होती आणि लाघवी होती, सांगितलेली कामं तर चटकन करायची, पण त्याने सांगायच्या आधीच "anticipate" करून तयार

ठेवायची. त्यामुळे ओळख वाढली. एखाद्या दिवशी ऑफिसवर नंतर थांबायला लागले तर मग चहा, वडे वगैरे व्हायचे. तशी घरची काहीच जबाबदारी नव्हती. त्यामुळे तिला थांबायला हरकत नसे. मग अवी तिला गाडीतून घरी सोडायचा.

एकदा का संशयाचं भूत मानगुटीवर बसलं की ते उतरता उतरत नाही आणि मग 'मनी वसे ते स्वप्नी दिसे' अशी अवस्था होते. जशी मीनाची झाली तशी.

एक दिवस त्याने तिला एक लेटर घेण्यासाठी बोलविले. त्याने पत्र डिक्टेट करायला सुरूवात केली.

To Ms. Joshi,

I have had chance to examine the product that you brought to market 22 yrs ago, and I have.....liked it. I think in 22 yrs. the product has matured, now I would like to keep it for lifelong. I would like to discuss, this with you- if this is OK with Miss Meena Joshi.

आता मीना जोशी वय वर्षे २२च्या डोक्यात प्रकाश पडला की अवी तिच्याबद्दल बोलत होता आणि ते लग्नाचे प्रपोजल होते. तिला वर पाहायचा पण धीर झाला नाही.

अर्थात मग रीतसर विचारून सर्व सोपस्कार करून लग्न झाले. लग्नानंतर एक दीड वर्षानी अवीने अमेरिकेत MBA साठी अर्ज टाकला आणि त्याला ॲडमिशन पण मिळाली. त्यानंतर अर्थातच मीनाचे पण जाणे झाले. मग अमेरिकेत त्याला नोकरी लागताच हिने पण computer मध्ये डिग्री घेतली आणि हिची पण नोकरी सुरू झाली.

अवीला नोकरी करून ३-४ वर्षे झाली असावी आणि मीनाने त्याला फोन केला. फोन लागला पण अवीच्या आवाजाऐवजी एका बाईचा आवाज "Mr. पॅटनकर्स office may I help you?" प्रथम मीनाला काय बोलावे हेच कळेना. एकतर तिला ३० सेकंद समजायला लागली की ही बाई आपल्याच आडनावाचा असा उच्चार करते आहे. आता हिला काय सांगावे. त्याला अवी म्हणावे का अविनाश का मिस्टर पॅटनकर. स्वतःच्या नवऱ्याला Mr. पॅटनकर म्हणणे म्हणजे तिला जरा गंमतच वाटली. तसे ती त्याला गंमतीने "अहो, पाटणकर उठा. ८ वाजले." असे म्हणायची. पण आज. पण त्या बाईनेच तो प्रश्न सोडवला.

"May I Know who is calling?"

मीनाच्या बाजूची शांतता ऐकून तिने प्रश्न केला.

"This is his wife - Meena."

मग तो फोनवर आला. "हवंय काय ?" त्याने विचारले. (Hi honey वगैरे

जाऊनच द्या. एकदम प्रश्न-काय हवंय ?)"अरे ही नवी बाई कोण आहे ? आणि ती का तुझा फोन उचलतेय ?" तिने विचारले.

"अग, कॅरन - She is my PA मला प्रमोशन मिळाले. कामं वाढली म्हणून मला organise करायला मदत करते."

"मग तू मला काहीच बोलला नाहीस ते." मीनाने जरा तक्रारीच्या सुरात विचारले.

"अग त्यात काय बोलणार. She is here so many years" आता फक्त मला मदत करायला- PA म्हणून सांगितले आहे. पूर्वी ती इतरही कामे करत असे- आता फक्त माझ्या कामासाठी." त्याने उत्तर दिले. तिच्या सुरातल्या तक्रारीचा त्याला बोधपण झाला नव्हता. "येताना फळं घेऊन ये. आज आपल्याला त्या नाडकर्ण्यांकडे जायचंय ! मला बरीच कामे आहेत. येताना ते farmer's market तुझ्या वाटेवर आहे."

"बरं." म्हणून त्याने फोन ठेवला. नेहमीप्रमाणे हा पाऊणे आठपर्यंत आला नाही. मीना वाटच पाहात होती. आधीच नाडकर्ण्यांना उशीरा गेलेलं चालत नाही. त्यानं यात फळे आणली असली म्हणजे मिळवली नाहीतर ती घेण्यात आणखी २० मिनीटे.

"चल लवकर कपडे बदल आणि चहा गाडीतच घे. कपडे मी काढून ठेवले आहेत." ती म्हणाली,"हो नाहीतर पुन्हा TV लावेल तो ओरायलीचा मोनालॉग पाहायला, तिने विचार केला.

"आणि ते कागद कुठे आहेत ?" त्याने विचारले.

"आता कसले कागद..." तिने प्रश्नार्थक चेहरा केला.

"अग, त्याच्याकडे मी काय बोलायचे, काय बोलायचे नाही. बुश नाही क्लिंटन नाही वगैरे म्हणजे माझे तू लिहीलेलं script!"

तिने मान हलवत म्हटले,"बरं फार शहाणा आहेस. पण फळं आणलीस का नाही ?"

"अं... हो. पण एक घोटाळा झालाय."

"काय ?"

"अग, मला बरंच काम होतं त्यामुळे निघायला उशीर होणार होता म्हणून मी कॅरनला फळं आणायला सांगितली तर तिने हे आणलं -" गाडीत निरनिराळ्या फळांचे बास्केट सिलोफेम मधे रॅप केलेली त्याने काढली. आहे. गंगेत घोडं तर नाह्यलं असा विचार करून ते नाडकर्ण्यांकडे गेले.

*******

फळांचे बास्केट बघून अर्थातच विचारणा झाली. मग अथंपासून तिथंपर्यंत गोष्ट सांगितल्यावर "काळ्यांच्या" म्हणाल्या, "का मीना, भेटलीस का तू त्या कॅरन

का फॅरनला ? मागे एकदा त्या निलेश कार्डीयालॉजीस्टचं झालं तसं व्हायचं आता त्याची बायको हायर करते. त्याच्या नर्स प्रॅक्टीशनरला."

"म्हणूनच सध्याचा आहे. एक सहा फूट उंच दाढीवाला."

मीनाने गोष्ट हसून उडवून लावली पण एक क्षण तिच्या मनात आले, एकेकाळी आपणही अवीच्या PA होतो.

त्यानंतर २ महिन्यानंतरची गोष्ट, पाच वाजले होते.

"Mr. Patankar's office. Miss Caren speaking. May I help you."

"Hi, Caren. This is Mina. Is he there?"

"He is in a meeting. May I take the message?"

"आता घरी येताना हे घेऊन ये का ते घेऊन ये हा निरोप त्या कॅरनबाईंना कसा देणार ? त्यात आज शोभा म्हणाली होती की farmer's market मध्ये छान तोंडली आणि गवार आली आहे. आता हे कॅरनला सांगायचे म्हणजे Tondali नको ग बाई !"

पूर्वी बरे होते ! फोन केला की हजर ! आता ही मध्ये येते.

"Can you have him call me!" असं म्हणून मीनाने फोन ठेवला.

अर्ध्या तासातच अवीचा फोन वाजला, "अग, मी तुला फोन करणारच होतो. बोल काय म्हणतेस ?"

"येताना farmer's market मधून जरा तोंडली आणि गवार घेऊन येशील का ? Please."

"शक्य नाही. त्या N.Y. च्या office मध्ये काहीतरी घोटाळा झाला आहे म्हणून मला Emergency meeting साठी तिथे जावं लागणार आहे."

"केव्हां ?"

"आज रात्रीचीच flight आहे. मी आणि कॅरन जाणार आहोत."

"अरे, पण कपडे सूट वगैरे ?"

"Don't worry. Caren picked up my laundry. She has packed everything for me. I'll be home tomorrow. She is so good, - I do not have to worry."

"But I do have to worry." मीना मनातल्या मनात म्हणाली आणि तिने फोन ठेवला. मागे एकदा असाच तो cardiologist निलेश त्याच्या secretory/ RN ला घेऊन गेला होता meeting साठी आणि मग उघडकीला आलं की ती meeting नव्हतीच तर mating होतं. शी ! काहीतरीच काय विचार करतेय मी ? मीनाच्या मनाने तिला झापले.

आणि आता आजचीच गोष्ट पाहा ना बायकोबरोबर सुरवात ( ?) तीन तास घालवायचे तर हा प्राणी चक्क म्हणतोय की I can't का तर म्हणे कॅरनसाठी पार्टी आहे. मीनाला पेच पडला. आता काय करणार ? उलट्यासुलट्या विचारांनी तिचे डोके फुटायची वेळ आली होती. मग ती उठली एका निश्चयाने. आज खरं-खोटं याचा शहानिशा करायचाच. पार्कींग लॉटमधून तिने गाडी चक्क अवीच्या office कडे हाणली.

डोक्यात नको ते विचार येत होते. अवी आपल्या प्रेमात पडला, तेव्हां आपणही त्याच्या PAच होतो. हल्ली नाहीतरी त्याचं लक्ष नसतंच. इतके दिवस तिच्यावर dependant असणाऱ्या अवीची सगळी कामे ती-कॅरनच करत होती. परवा मी पर्म केला तरी त्याच्या लक्षात यायला तीन तास लागले. एक ना दोन office च्या पार्कींग लॉटमध्ये गाडी पार्क करून ती लॉबीत गेली, पाच वाजायला आले होते. गार्ड अजून होताच. सही करून ती elevator मध्ये गेली.

पाचव्या मजल्यावरच्या त्याच्या office च्या दारासमोर उभी राहिली. आतून music आणि हसण्याचे आवाज ऐकू येत होते. ती आत गेली. आवाजाच्या दिशेने ती conference room मध्ये गेली. अवी उभा होता. आणि आणखी १०-१५ लोक त्याच्या भोवती होते. आता यातली कॅरन कोण हा प्रश्न तिला पडला. निळ्या डोळ्यांची आणि blond केसवाली का brown eyed आणि ब्रुनेट ?

तिला पाहून अवी पुढे आला. त्याच्या वागण्यात जराही चलबिचल नव्हती. सराईत चोर दिसतोय मीनाने विचार केला. तो म्हणाला, "हे मीनू, How come you are here. Hi everybody, this is my sweet-heart."

आणि मग तो वळून म्हणाला, "मीनू, this is Caren." मीनाने वळून पाहिले. पांढऱ्या केसांची जरा जाडसर, आणि साधारण ६०-६५ वर्षे वय असलेल्या कॅरनने हसून हात पुढे केला. मीनाने ही हसून शेकहँड केला.

"She is retiring today." अवीचे बोलणे ऐकून मीनाने आ वासलेला बंद केला. पण तेवढ्यात कॅरन म्हणाली, "Meet Lisa, She is going to be the new secretory/ PA" मीनाचे डोळे मोठ्ठे झाले. Lisa एक २२ वर्षांची गोंडस, blond & blue eyed तरूणी होती.


शिरीष किर्तने

1730, Fifeshire CT Longwood, FL 32779S

407-310-5748O 407-869-5716.

**skirtane1@aol.com.**

# एक छांदिष्ट माणूस : जयंत कुळकर्णी



**फा**र वर्ष झाली असतील त्या गोष्टीला.

कमीत कमी २५ वर्षे तरी.

न्युयॉर्कच्या थंडीला नुकतीच सुरवात झाली होती.रविवारचा दिवस होता.

जवळपासच अनिल देशमूख एका अपार्टमेन्ट बिल्डिंगमध्ये तळमजल्यावर राहात होता. गाडी पार्क करून मी खोलीच्या बाहेर आलो. दरवाजा बंद होता. बेल वाजवली. अनिलने दरवाजा उघडला.

"अरे वा. दादा आज अगदी आमच्या घरी देव प्रवेश करता झाला !"

अनिलला अलंकारिक भाषेत बोलण्याची संवय होती.

"म्हणजे..आज देव आनंद तुझ्याकडे येणार होता कां ?" मी चेष्टेनं म्हटलं.

"तसं नाही दादा..तुम्ही अगदी देवासारखे आलात. अतिथीचे स्वागत असो! दादा, आज अगदी सुवर्ण योग आला आहे. आज माझ्याकडे आमचे इथले शेजारी जयंत कुळकर्णी आलेले आहेत. तुम्हीपण अचानक न बोलावता आला आहांत. अगदी मणी कांचन योग आहे हा!"

"अनिल. आता तुझी अलंकारीक भाषा जरा आवर अन् या तुमच्या मित्राचा परिचय करून दे पाहू. काय म्हणालास यांचं नांव..जयंत कुलकर्णी !"

"बरोबर..हे जयंत कुळकर्णी. आमच्या इथंच जॅक्सन हाईटस्ला राहतात आणि बरं का जयंत, हे आमचे जुने स्नेही दादा कारखानीस." अनिलने ओळख करून दिली.

जयंतने नमस्कार केला. हंसला आणि म्हणाला,

"अरे वा..बरेच दिवस मी कारखानीसांचे नांव ऐकतो आहे. दादा कारखानीसांना कोण ओळखत नाही न्यूयॉर्कमध्ये ! दादांची ओळख तुझ्या घरी होतेय याचा मला खूप आनंद झालाय."

"आपण काय करता ?" मी चौकशी केली.

"दादा, जयंत नामांकित चित्रकार आहेत." अनिलने मधेच माहिती दिली.

“नामांकित आहे कां नाही हे मला माहीत नाही. पण मी चित्रे काढतो. लोकांना ती आवडतात.” जयंत विनयाने बोलला.

“मग तुम्ही कुठे आर्ट स्टूडियोमध्ये वगैरे काम करता कां ?” मी विचारलं.

“दादा, मी मुंबईच्या J.J. Institute of Applied Art मधून G.D.Art-Graphic Designer चा कोर्स पूरा केलाय. इथं अमेरिकेत येण्यापूर्वी मी भारतांत आणि मध्यपूर्वेच्या आखाती देशांत ग्राफिक डिझायनर म्हणून काम केलय्.”

“मग इथं पण त्याच क्षेत्रांत काम करता कां ?”

“हो. मी इथं मॅनहॅटनला अशाच Advertising कंपनीमध्ये ग्राफिक डिझायनर म्हणून काम करतोय.”

या आमच्या पहिल्या भेटीत जयंत कुळकर्णीबद्दल बरीच माहिती मिळाली.

जयंत मुंबईचा..शिवाजीपार्कचा. लहानपणी क्रिकेटचा भयंकर नाद. मुबईतल्या जवळ जवळ सर्व मोठ्या टूर्नामिन्टस् मध्ये आणि ब्रेबॉर्न स्टेडियमपासून ते शिवाजीपार्क जिमखान्यापर्यंतच्या सर्व धावपट्टयांवर तो खेळला होता. शाळकरी आयुष्य आणि कॉलेजमधले दिवस क्रिकेटग्राऊंडवर धांवा रचण्यांत घालविले. जे.जे. आर्टमध्ये असतानासुध्दा हा क्रिकेटचा छंद कमी झाला नव्हता.

त्याचे वडील प्रा. वि. ह. कुळकर्णी. आमच्या काळांत म्हणजे १९५० ते १९६० च्या काळांत, वि. ह. कुळकर्णी म्हणजे मराठी साहित्यातील मोठी आसामी. त्यांनी १९२१ ते १९६२ पर्यंत रूईया कॉलेजांत अध्यापन केले. अध्यापनाबरोबर त्यांचे नांव मराठीतील चांगले चरित्रकार आणि टीकाकार म्हणून प्रसिध्द होते. याच कालांत ते प्रतिमा आणि ज्योत्स्ना या मासिकांचे संपादक होते. तसेच त्यांनी ‘शोभेचा पंखा’ नावाने एक नाटकही लिहीले होते.

जयंतच्या लहानपणी त्यांचे शिवाजीपार्कचे घर म्हणजे साहित्यिकांचे भेटण्याचे, एकत्र येण्याचे ठिकाण होते. वि.स.खांडेकर, कवि यशवंत, प्रभाकर पाध्ये, माडखोलकर, सिध्दार्थचे रा.भि.जोशी आणि अनंत काणेकर यांचा राबता वि.हं.च्या घरी नेहमी असायचा. यामुळे जयंतची आई नेहमी मिस्कीलपणे म्हणत असे की “घरांतच साहित्यसंमेलन भरते मग बाहेरच्या साहित्य संमेलनाला जाण्याची काय गरज ?”

वि.हं. चे टीकाग्रंथ आणि चरित्रे आम्हा एम.ए.च्या मराठीच्या विद्यार्थ्याचे ऋग्वेद-सामदेव होते. प्रा.वि.ह.कुळकर्णी, वा.ल. कुळकर्णी, न.र.फाटक, माधव मनोहर, वाळिंबे ही प्रचंड बुध्दिवादी समिक्षक मंडळी, आम्हाला मराठी साहित्याचे न ढासळणारे बुरूज वाटायचे. यांचे टीकाग्रंथ वाचताना, अभ्यासतांना, मराठी साहित्याची व्याप्ती

आणि झेप किती प्रचंड होती याची कल्पना यायची. त्यावेळचे हे टीकाकार किती व्यासंगी होते, त्यांचा संस्कृत आणि इंग्रजीधरून कितीतरी भाषांचा सखोल अभ्यास होता याचा अंदाज, त्यांच्या ग्रंथवरून येतो.

अशाप्रकारे लहानपणापासून मराठी साहित्याचे बाळकडू जयंतला मिळत गेले. लेखकाला ही घडणचढण नेहमीच उपयोगी पडते. जयंतच्या आयुष्यांत आलेल्या अनेक संगीत दिग्दर्शक, गायक, चित्रकार, चित्रपटांतील नटनट्या, साहित्यिक आणि इतर प्रज्ञावान लोकांचा सहवास व त्यांचे विचार आणि स्वभाव विशेष याचे प्रतिबिंब त्यांच्या लिखाणांत उमटले आहे.

जवळजवळ तीस वर्ष जयंत कुळकर्णी न्यूयॉर्कमध्ये आहे. न्यूयॉर्क महाराष्ट्र मंडळ, न्यूजर्सीचे मराठी विश्व या संस्थांमधून जयंतने बरेच काम केलं आहे. “रंगदीप” मासिकाची मुखपृष्ठे त्याच्या कुंचल्यातून रेखाटली गेली आहेत. आमच्या ह्युस्टन महाराष्ट्र मंडळाच्या “स्नेह” मासिकाचे आणि “सावली” मासिकाचे मुखपृष्ठ त्याच्याच कुंचल्यातून निर्माण केले होते.

१९८६ मध्ये Statue of Liberty च्या पुतळ्याला १०० वर्षे झाली होती. त्या निमित्ताने Asian Indians for Liberty या संस्थेने चित्रकलेची एक स्पर्धा ठेवली होती. यांत Statue of Liberty चे बोधचिन्ह काढायचे होते. अमेरिकेतल्या अनेक चित्रकारांमधून या स्पर्धेत जयंतचे चित्र ‘सर्वोत्कृष्ट चित्र’ म्हणून निवडले गेले आणि अनेक इंग्रजी पत्रांनी याची दखल घेतली.

सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे जयंतने अगदी लहानपणापासून जोपासलेला १९४० ते १९६० या कालांतील सिनेमा संगिताच्या ध्वनिमुद्रिकांचा संग्रह, त्या कालांतील नटनट्यांचे, गायकांचे मिळवलेले फोटो आणि त्यांच्या दुर्मीळ वस्तुंचासंग्रह (mementoes) याचे शिस्तबध्द वर्गीकरण करुन जमवलेला खजिना.

“जीना इसी का नाम है..” या लेखांत डॉ. उषादेवी कोल्हटकर लिहीतात” ..तो काळ असा होता की, सुरांना त्यांच्या आरोहावरोहांची मिजास सांभाळली जाईल याची खात्री होती. गीतांच्या बोलांतील अर्थपूर्णता बोलकी होती. तालवाद्ये, तंतुवाद्ये आणि इतर अनेक वाद्यांच्या नादमाधुर्यात पूर्वेकडील संगीत साधनेचे वैभवी झंकार सामावले होते. अशा आशयपूर्ण, सूरमधुर, सिनेगीतांचा शिस्तबध्द संग्रह, हे जयंतांच्या छंदाचे मनोवेधक रूप. या छंदाला त्यांनी ३६ वर्षे, पूर्ण तीन तपे, आस्थेने जपले, आनंदाने जोपासले.”

या ध्वनिमुद्रिकांच्या शोधांत जयंतने मुंबईच्या चिराबाजारापासून ते चोर बाजारापर्यंत

किती फेऱ्या मारल्या, किती वेळ खर्च केला आणि किती पैसा खर्च केला त्याची मोजदाद करणे शक्य नाही.

लता मंगेशकर, सी.रामचंद्र (अण्णा चितळकर), अनिल विश्वास, मीना कपूर, सज्जाद हुसेन, लीला चिटणीस, पद्मीनी, नलिनी जयवंत, 'देवबाप्पा' चित्रपटातील मेधा गुप्ते-प्रधान, विनोदी नट मेहमूद, स्टार फोटोग्राफर गौतम राजाध्यक्ष अश्या सिनेमा सृष्टीत गाजलेल्या अनेक कलाकारांच्या मुलाखती घेऊन, त्यांचा नव्याने परिचय जयंतने आपल्या लिखाणांतून केला. या विषयावरील त्याचे लेख रंगदीप, एकता, सावली, स्नेह या अमेरिकेतील मासिकांमधून वेळोवेळी प्रसिध्द झाले आहेत.

या त्याच्या अलौकिक छंदाचा परिपाक म्हणजे सन २००९ साली मॅजेस्टिक प्रकाशनाने प्रसिध्द केलेले त्याचे "सुन जा दिल की दास्ता" हे पुस्तक. हे पुस्तक इतके प्रभावी झाले की ते वाचून पुण्याच्या श्री. प्रकाश आणि सौ. कुंदा भालेराव या संगीतप्रेमी जोडप्याने जयंत कुळकर्णी यांच्याशी संपर्क साधून हा "अभूतपूर्वसंगीत खजिना" मागून घेऊन आणि "जयंत आणि सौ.वीणा" यांचे नांवाने ट्रस्ट करून तो जतन करून ठेवण्याची तयारी दाखविली. जयंतने श्री.भालेराव यांची विनंती मान्य करून हा अमूल्य खजिना, श्री.भालेराव यांना दान केला आहे. अभिनव तंत्रज्ञान वापरून आम जनतेसाठी या संगीताचे डिजीटल स्वरूपांत सादरीकरण करण्याचा श्री.भालेराव यांचा मानस आहे.

या विषयावर बोलताना मी जयंतला विचारलं की हा जो तू उद्योग केलास त्याचा मूलभूत उद्देश काय होता ?

त्यावर जयंतचे उत्तर होतं की तो जरी कुणी मोठा लेखक किंवा गाढा विद्वान नसला तरी, सिनेमासृष्टीत वावरणाऱ्या या लोकांनी भारतीय चित्रपट सृष्टीला आपल्या कलेनं जगांत जो दर्जा आणि मान्यता मिळवून दिली त्यांचे किंचितसे ऋण फेडण्याचा त्यानं प्रामाणिक प्रयत्न केला आहे आणि हेच त्याचे समाधान.

मला वाटतं जयंत मला सांगत होता ..

"जे मी जपलं, जे मला पवित्र वाटलं, ते मी फक्त आठवण म्हणून ठेऊन जाणार आहे."

अशा माणसाच्या सदैव ऋणातच रहावं असं नाही कां वाटत ?

शब्दांकन : दिवाकर कारखानीस ह्युस्टन
email : dkarkhan80@gmail.com

# विज्ञान क्षेत्रांतील एक साहित्यिक : श्री. सुधीर कुलकर्णी



**इं**जिनिअरींगच्या क्षेत्रांत अनेक विभाग आहेत. प्रमुखतः इलेक्ट्रिकल, मेकॅनिकल आणि सिव्हील असे तीनच विभाग पन्नासवर्षापूर्वी समजले जात असत. कॉम्प्युटर्स आल्यानंतर, कॉम्प्युटर इंजिनिअरींगचा विभाग समाविष्ट झाला. विसाव्या शतकांत यंत्रज्ञान आणि तंत्रज्ञान यांची जी झपाट्याने वाढ झाली, त्याचा परिणाम म्हणजेच इंजिनिअरींगच्या प्रमुख विभागांचे पुढे अनेक पोट विभाग होत गेले आणि त्या त्या विभागांत नैपुण्य मिळविण्याच्या सुविधा उपलब्ध होऊ लागल्या.

आता हेच पहाना. लेथम - न्यूयॉर्कचे सुधीर कुलकर्णी हे भारतांतून सिव्हील इंजिनिअरींगची B.E. पदवी घेऊन अमेरिकेत आल्यावर त्यांनी "Bridge Designing" च्या क्षेत्रांत प्राविण्य मिळविले. अर्थात त्याची पूर्वतयारी म्हणून अमेरिकन विद्यापिठांतून पदवीत्तोर अभ्यासक्रम पूर्ण करून, त्यांना निरनिराळ्या परिक्षा द्याव्या लागल्या.

खरं म्हणजे अमेरिकेत आल्यानंतर, आपलं नांव 'सुधीर कुलकर्णी' बदलून, 'सेतू कुलकर्णी' करायला हवं होतं. कारण इंजिनिअरींग क्षेत्रांतील उच्च पदवी घेऊन हा गृहस्थ ''सेतू'' बांधण्याच्या कामांत इतका निपूण झाला की, त्यांनी ''प्रगती पुलांची'' हे पुल बांधणीच्या तांत्रिक ज्ञानावर आणि ''जगप्रसिद्ध पुलांच्या कहाण्या'' हे जगप्रसिद्ध पुलांच्या माहिती वरील पुस्तके प्रसिद्ध केली.

सत्तरी ओलांडलेले सुधीर कुलकर्णी यांचा जन्म तासगांव - सांगली जिल्ह्यांतला. शालेय व कॉलेज शिक्षण मुंबईत. त्यानंतर पुण्याला सिव्हिल इंलिनिअरींगची पदवी घेऊन व भारतांत कामाचा थोडा अनुभव कांखोटीला मारून अमेरिकेला पोहोचले. Wyoming University-Laramie आणि Rensselaer Polytechnic Institute - Troy, NY मधून दोन MS च्या पदव्या प्राप्त केल्या. (Ms in Engineering and Ms in Management) या शिक्षणाच्या बळावर त्यांनी "Bridge Design Engineer" च्या पेशांत प्रवेश केला. फारच थोडे मराठी अभियांत्रिकीचे विद्यार्थी या क्षेत्रांत प्रवेश करतात आणि

मिळविलेल्या अनुभवाचा आणि ज्ञानाचा लाभ आपल्या मातृभाषेत इतरांपर्यंत पोचवितात.

सुधीर कुलकर्णी इंजिनिअर असले तरी त्यांना मराठी साहित्याची चांगली आवड होती आणि पुण्याला इंजिनिअरिंगच्या कॉलेज मध्ये असताना त्यांनी काही जुजबी लिखाण केलं होतं. १९८२ पर्यंत संसार, करियर यांत वीस वर्षे कशी निघून गेली ते कळले नाही. परंतु त्यानंतर त्यांनी मराठी लिहिण्याचा स्फुल्लिंग विझू दिला नाही. प्रथम त्यांनी एकता मासिकासाठी लिखाण पाठविले. ते प्रसिद्ध झाल्यावर जास्त हुरूप आला. नंतर बृहन् महाराष्ट्र वृत्त आणि अधिवेशनाच्या विशेषांकात त्यांनी लिखाण चालू ठेवले. निवृत्ती नंतर २००३ साली मराठी लिखाण सातत्यानं लिहिण्याचे ठरविले. त्यानंतरच्या काळांत त्यांनी खालील पुस्तके प्रसिद्ध केली.

सेतू : लघुकथा, लघुनिबंध आणि प्रवास वर्णने .... २००३

परत मातृभूमीला : लघुकथा संग्रह .... २००४

विदेशी खिचडी : लघुनिबंध आणि प्रवास वर्णने .... २००५

प्रगती पुलांची : पुलासंबंधी तांत्रिक माहिती .... २००७

जगप्रसिद्ध पुलांच्या कहाण्या .... २००९

पुलासंबंधी जास्त माहिती देण्यामागचा हेतू विचारला असताना ते म्हणाले,

"सन २००३ मध्ये मी निवृत्त झालो. तेव्हां पासून मी मराठी लिखाणावर लक्ष केंद्रिभूत केले. मराठीची चांगली जाण होती आणि लिखाणास भरपूर वेळ होता. विचार करताना लक्षांत आलं की आपल्या स्वतःच्या विषयांत पूल बांधणी संबंधाने फार मोठी माहिती उपलब्ध आहे. या विषयावर आपण आपली मातृभाषा वापरली नाही तर कोण वापरणार ? विषय जरी तांत्रिक असला तरी त्याची तोंडओळख वाचकाला करून द्यावी या उद्देशाने मी "प्रगती पुलांची" हे पुस्तक लिहिले."

"तुमचं नुकतंच प्रसिद्ध झालेलं पुस्तक म्हणजे "जगप्रसिद्ध पुलांच्या कहाण्या." या पुस्तकाची कल्पना कशी सुचली ?"

"काय झालं, पहिलं पुस्तक टेक्नीकल. पण भारतांत आणि इथल्याही मराठी मंडळींत त्याचा बराच बोलबाला झाला. पुल बांधताना त्याचे डिझाईन फार महत्त्वाचे असते. ते नुसते आकर्षक असून चालत नाही, तर त्यापेक्षाही महत्त्वाचे म्हणजे तो पुल सुरक्षित आणि टिकावू असला पाहिजे. जगांत असे अनेक पुल आहेत की जे एका शतकापेक्षाही जास्त टिकले आहेत. उदाहरणार्थ आपला ब्रुकलीन ब्रिज घ्या. यांचे डिझाईन अप्रतीम तर आहेच पण तो आज शंभर वर्षांहून जास्त टिकला आहे. अशा जगांतील काही नामांकित पुलांची ओळख करून देण्याचा मी प्रयत्न केला आहे या पुस्तकांत."

"सुधीर, तुमच्या पुस्तकांत जगांतील कोणत्या पुलांची माहिती संग्रहीत केली आहे ?" मी विचारले.

"प्रमुखतः अमेरिकेतील ब्रुकलील ब्रीज, सॅनफ्रान्सीसकोचा गोल्डन गेट आणि वेस्ट व्हर्जिनियांतील-न्यु रिव्हर गोर्ज, भारतातील - रविंद्र सेतू (हावडा ब्रिज) व विद्यासागर सेतू, ऑस्ट्रेलिया मधील सिडनी हार्बर, जपान मधील अकाशी कयाको आणि ततारा, चीन मधील लिपू आणि सूटॉग,अशा साधारण बारा पुलांची माहिती दिली आहे."

"या पुलांची माहिती संकलीत करताना तुम्ही कोणते निकष वापरलेत ?"

"दादा, चांगला प्रश्न विचारलात. मी ही माहिती जमविताना प्रमुखतः तीन निकष वापरले. ते म्हणजे त्या पुलाची लांबी आणि उंची. (Span and Height) या दोन्ही गोष्टींत जागतिक उच्चांक गाठला असलेला पाहिजे. दुसरं म्हणजे पुल बांधणीच्या वेळी वापरलेले नवीन तांत्रिक ज्ञान (Innovative Technology) आणि वापरलेला माल (Material for Construction), आणि तिसरे सर्वांत महत्त्वाचे म्हणजे तो पुल त्या देशाचे, शहराचे एकमेव भूषण ठरले गेले असले पाहिजे."

सुधीर कुलकर्ण्यांचं तिसरे पुस्तक आहे, "विदेशी खिचडी." नांवावरून लक्षांत येतं की, या पुस्तकांत विविध विषयांची खिचडी असणार. तसंच आहे. यांत लघुनिबंध आहेत, प्रवास वर्णने आहेत आणि काही स्फुट लेखन आहे. लघुनिबंधांचे विषय अर्थातच अमेरिकेतील वास्तव्याच्या अनुभवावर आहेत आणि स्फुट लेखनामध्ये थोडासा तिरकस गर्भितार्थ भरलेल्या विनोदाची कारंजी आहेत. 'टोपणनांवे', 'नापास पाहावे होऊन', 'चोखंदळपणा' हे लेख या ठेवणीतील वाटतील तर 'नाव मुंबई! एक मोहिम', 'डॉलरचे रुपये करा बघून भारतीय बँकेत', 'भारत भेट- आठवणी व अनोखे अनुभव', 'माझ्या आवडत्या तक्रारी - भारतभेटी नंतरच्या' हे लघुनिबंध अनुभवसत्यावर आधारलेले पण खोचट आहेत. हा खोचटपणा बोचरा नाही तर सर्वांना आलेल्या अनुभवावर आधारलेला आहे. भारतीय बँकेत खातेदाराला येणारा अनुभव अनेकांच्या परिचयाचा आहे. पण वाईट वाटते ते या बद्दल की सरंजामशाही पद्धतीने चाललेले सरकारी काम स्वातंत्र्यानंतर पन्नास वर्षे उलटून गेली असली तरी त्यांत बदल अथवा पाहिजे तितकी सुधारणा अद्यापही केली जात नाही.

सुधीर कुलकर्णी जेव्हां 'डॉलरचे रुपये करा बघून भारतीय बँकेत' किंवा 'माझ्या आवडत्या तक्रारी - भारतभेटी नंतरच्या' तेव्हां त्यांचा मिस्कीलपणा शब्दरूप धारण

करतो. भावनांचं संतुलन जागोजागी अप्रत्यक्षपणे पाळलं आहे याची खातरजमा होते. ज्याप्रमाणे काणेकरांनी 'रूपेरी वाळू' हे ज्या मिस्किल वृत्तींतून लिहिलं तशाच वृत्तीतून कुलकर्ण्यांनी 'विदेशी खिचडी' पुस्तक लिहिलं आहे. सभ्यतेचं आणि औचित्याचं भान कुलकर्ण्यांनी शेवटपर्यंत ठेवलं आहे ही नमूद करण्यासारखी गोष्ट आहे.

कुलकर्ण्यांनी लघुकथा फार लिहिल्या नाहीत. ज्या लिहिल्यात त्या अनुभव कथा या सदरांत जातात. कथासूत्र आटोपशीर, बांधणी हरी नारायण आपटे धर्तीची. फडके खांडेकरांसारखी शब्दांची आतषबाजी नाही. साधेपणा आणि सौजन्य कथेमध्ये दिसते. कथा लिहिण्यापूर्वी कागदावर तिची रूपरेषा लिहून मग ती सूत्रबद्धरितीने लिहिली जाते असं वाटतं. कथेचा गाभा अनुभवावर आधारित असल्यामुळे लेखकाला त्याचाच पडताळा पहाता येतो. लघुकथांपेक्षा लेखकाने लघुनिबंधात, प्रवासवर्णनांत आणि पुलासंबंधीच्या लेखनांत जास्त रस घेतलेला आहे असे वाटते.

स्वातंत्र्योत्तर कालांत भारतांत राजकारण, समाजकारण आणि अर्थकारणांत वेगाने फरक घडत आहेत. संगणक युगाच्या वाढीमुळे बुद्धीजीवी वर्गाला आर्थिक क्षेत्रांत भरपूर वाव मिळत आहे. पण त्यामुळे समाजांतील विषमता कमी होते किंवा नाही याचा विचारवंतांनी पडताळा घेतला पाहिजे. खेदाने तसं होत नाही असं म्हणावं लागतं.

भ्रष्टाचार, लाचलुचपत आणि सत्तेची पिपासा राजकारण्यांना तख्तावर बसवीत आहे. दिवसेंदिवस बिघडत चाललेल्या परिस्थितीचे सर्वाधिक चटके आजच्या तरूण पिढीला बसणार आहेत. तरूण मनावर राज्य करणारा आणि सुयोग्य मार्गदर्शन करणारा अभिनेता मिळणे कठीण झालं आहे. आजचे अभिनेते पैसा आणि बडेजाव यांत गुरफटलेले आहेत. सुधीर कुलकर्ण्यांच्या लघुनिबंधामध्ये आणि कथांमध्ये ही अगतिकतेची जाणीव प्रकर्षाने दिसून येते.

'सूर्य उगवलाय पण अंधार काही नाहीसा होत नाही' अशी आजची स्थिती आहे हेच जणूं ते सांगताहेत आपल्या लिखाणांतून !

शब्दांकन : दिवाकर कारखानीस ह्युस्टन
email : dkarkhan80@gmail.com

# परत मातृभूमीला

**वि**नयला झोपण्यापूर्वी काही वेळपर्यंत, एखादे चांगले पुस्तक वाचण्याची खोड लहानपणापासून आहे. त्याच्या मते, त्यामुळे दिवसभराच्या कामाचा, घरातील इतरांच्या कुरबुरींचा, येणाऱ्या उद्याचा विसर पडायला होतो.

मुलांना झोपायला ठेवून, आई-अप्पांकडे लक्ष देऊन, घरातील कामे आवरून अनिता बेडरूममध्ये शिरली आणि त्याच्या शेजारी पडता पडता म्हणाली, "विनय, ते पुस्तक थोडं बाजूला सारशील का ?... मी काय म्हणते आहे ते शांतपणे ऐकून घे!"

अनिताचे हे वाक्य ऐकल्यावर, विनयला वादाच्या विषयाचा वास येऊ लागला. बहुधा, अनिताच्या ऑफिसमध्ये काहीतरी प्रश्न उद्भवला असेल आणि ती त्याबद्दल आपले मत विचारत असणार असा एक अंदाज त्याने बांधला. तो आपल्या ऑफिसमधील कटकटी तिला सांगण्याच्या भानगडीत पडत नसे, कारण अनिताबरोबरच्या वादाचा तो एक विषय झाला असता. घरात त्याचा स्वभाव मोठा चिडका होता, परंतु ऑफिसमध्ये कोणी त्याचे तसे वागणे खपवून घेतले नसते. अनिता घरातील त्याच्या चिडक्या वागणुकीवरून त्याला बोलत होती. तिची सहानुभूती त्याला मिळत नसे.

मुलांबद्दलच्या तक्रारी हा त्याचा दुसरा अंदाज! मुलांचे लाड करायचे आणि मग ते डोक्यावर बसले म्हणजे त्यांच्याविरूद्ध कागाळ्या करायच्या!

तिसरे कारण म्हणजे अप्पांबद्दलच्या तक्रारी! अनिताला स्वयंपाक व मुलांचे करण्यासाठी आईचा चांगलाचा हातभार लागत असे. त्यामुळे आईबरोबर तिचे चांगले मेतकूट जमले होते. काही नवीन कारणाने तिला बोलायचे असेल ह्या शंकेने हातातील पुस्तक खाली ठेवून त्याने विचारले, "काय सांगणार, ते लवकर सांग!"

"आई-अप्पांना परत भारतात जायचं आहे!" अनिता म्हणाली.

ह्या वाक्याने आश्चर्यचकित होऊन त्याने प्रश्न केला, "पण ते माझ्याजवळ का नाही बोलले ? त्यांना इथं आणण्याचा निर्णय माझा होता. अर्थात, तुझीही त्याला मान्यता होती!"

"तुझा स्वभाव त्यांना लहानपणापासून माहीत आहे, त्यांनी तुला सांगितलं असतं

तर तू त्यांच्यावर उखडला असतास, म्हणून आईंनी माझ्यामार्फत ही गोष्ट तुझ्या कानावर घालायला सांगितलं!" अनिताने खुलासा केला.

"त्यांना येऊन फक्त तीन महिने झाले आहेत, आई तर आल्या दिवसापासून खूष आहे. आपल्या सर्वांसाठी निरनिराळे पदार्थ करून घालण्यात तिचा बराच वेळ जातो. तिला म्हटलं, थोडी विश्रांती घेत जा; तर म्हणते, मुंबईला आहेच विश्रांती! अमेरिकेत आल्यानंतर काही दिवसांनी; ती माझ्याबरोबर सुपरमार्केटमध्ये आली होती. तेथील भाज्या, फळं, खाण्याचे पदार्थ ह्यांची रेलचेल बघून तिला काय घेऊ नि काय नको असं झालं होतं... ही तुलना एखादवेळेस बरोबर नाही... पण त्यावेळी एखाद्या दुष्काळातून आलेल्या माणसाला अन्न बघितल्यावर जसं होतं तसा तिचा चेहेरा दिसत होता... मुंबईत नेहमी ताज्या भाज्या व फळांचा तुटवडा आणि मिळाल्या तरी महागाईमुळे थोडक्यात भागवावं लागतं... दुधात भेसळ नाही, गव्हाचं पीठ आयतं मिळतं; तसंच, डाळ-तांदुळात खडे सापडत नाहीत ह्याचं आईला केवढं आश्चर्य वाटलं. क्रीम तर भारतातील साईच्या दह्यासारखं तिला वाटत होतं. इथलं आइस्क्रीम तिला इतकं आवडतं की ती ते दररोज रात्री जेवणानंतर खायला विसरत नाही. एकंदरीत, आई आपल्याकडे खूष आहे, मग त्यांना जाण्याचे वेध का लागले?" विनयने विचारले.

"अरे, आईचा स्वभाव आहे प्रेमळ, त्यामुळे त्या कुठल्याही गैरसोयीकडे काणाडोळा करतात, परंतु मुख्य कारण आहे... अप्पांना इथं करमत नाही!" अनिताने खुलासा केला.

विनयला वाटले, जवळजवळ बारा वर्षापूर्वी मुंबई सोडल्यावर, आपण गेल्या तीन महिन्यांच्या कालावधीत आई-अप्पांच्या सान्निध्यात राहिलो. मध्यंतरी झालेल्या दोन भारतभेटीत, आपण काही आठवड्यांसाठी जात असल्याने, त्यांच्या स्वभावातील - विशेषतः अप्पांच्यातील - कंगोरे आपल्याला जाणवत नव्हते. त्यावेळी आपली भूमिका मुख्यतः पाहुण्याची असे, अप्पांचा स्वभाव एका जागी स्वस्थ बसण्याचा नाही याची जाणीव इथे आल्यावर झाल्याने प्रत्येक वीकएंडला - शनिवार व रविवार - जवळपासच्या प्रेक्षणीय ठिकाणी, शॉपिंग मॉलमध्ये, किंवा एखादवेळेस गावातील हिंदू देवळात त्यांना घेऊन जात होतो. त्यांना आठवड्यातील कामाच्या दिवशी बाहेर घेऊन जाणे शक्यच नव्हते. ती दोघे घरातील गणपती विसर्जनानंतर आलेली असल्यामुळे इथे त्यावेळी उन्हाळा चालू होता. परंतु मुंबईत वावरलेल्यांना, इथल्या उन्हाळ्यातसुद्धा, थंडी वाजत असते आणि त्यांतून अप्पांसारख्या वयस्करांना ती

वाजल्याशिवाय राहत नाही. त्यांना मुंबईत बँकेत, विजेचे बिल भरण्यासाठी, वाण्याच्या दुकानात किंवा फिरण्यासाठी घराबाहेर जावे लागत असे. नुसत्या शर्ट-पँटवर व चपला पायात सरकावल्या की बाहेर पडता येत असे. आता, इथल्या नोव्हेंबरच्या थंडीत स्वेटर, जॅकेट, कानटोपी, हातमोजे, पायमोजे व त्याशिवाय बूट घातल्याशिवाय अप्पांना बाहेर पाऊल टाकता येत नव्हते. त्याबद्दलच्या अप्पांच्या कुरबुरी, आईच्या बोलण्यातून मधुनमधून , विनयच्या कानावर येत असत. हळुहळू थंडीची सवय होईल त्यांना, या विचाराने तो त्याकडे दुर्लक्ष करत राहिला.

"अप्पांना करमत नाही तर वेळ जाण्यासाठी त्यांना एखादी पार्ट-टाईम नोकरी बघायला सांगायचं का ?" विनयने अनिताला प्रश्न केला.

"हे बघ, त्यांना निवृत्त होऊन आता बरीच वर्ष झाली आहेत. ह्या वयात त्यांना नोकरी करण्याची इच्छा असेल का ? आपल्या घराजवळ बसची सोय नाही. जरी अर्ध-वेळ एखादी नोकरी मिळाली तरी त्यांना नेणार व आणणार कोण ? मुख्य प्रश्न म्हणजे मग एवढ्या मोठ्या घरात आई एकट्या कशा राहतील ? तुमच्या गिरगावातील चाळीत आजुबाजूला चांगली सोबत असते. इथं कोणी कुत्रं पण विचारत नाही !"

"मग आपण तिच्या सोबतीला कुत्रं ठेवू या का ?" विनय बोलला.

"तुला ह्या वेळी विनोद सुचतो आहे ! थोडा सिरियसली विचार कर ! अप्पा होमसिक झाले आहेत. आपण एका बंदिस्त जागेत - जरी ते आपल्या मुला-नातवंडांत असले तरी - आहोत असं त्यांना वाटत असावं, त्यांना इथं घुसमटल्यासारखं होत आहे असं आई म्हणाल्या, त्यांच्या या उतार वयात (Golden Age) त्यांच्या मनाप्रमाणे होऊ दे असं माझं मत ! तुझे आई-वडील असल्यानं तू ह्या बाबतीत निर्णय घ्यावा असं मला वाटतं !" अनिताने स्पष्ट शब्दांत तिचे विचार मांडले.

"मग त्यांना परत जाऊ द्यावं असं तुला वाटतं ?"

"त्यांना, विशेषतः अप्पांना परत जावंसं वाटतं, त्या दोघांच्या - विशेषतः आईच्या राहण्यानं मला मदतच होते. मुलांनाही आजी-आजोबांचा चांगला लळा लागलेला आहे !"

"ठीक आहे. आपण दोघांनी ह्याबाबत उद्या रात्री त्यांच्याशी चर्चा करू. उद्या शुक्रवार असल्यानं झोपण्याची घाई नाही. मात्र आता... रात्रही फार झाली आहे... तेव्हां झोपू या !"

अनिताला 'शुभरात्री' चिंतून, बाजूचा टेबललँप मालवून विनय झोपेची आराधना

करू लागला. शेजारी पडलेल्या अनिताला लगेच झोप लागली, परंतु विनयचे मन गेलेल्या तपाचा विचार करू लागले.

तीन वर्षापूर्वी, धाकट्या भावाच्या - माधवच्या - लग्नासाठी तो मुंबईत गेला होता. तिथून आल्यानंतर, मुंबईतील एकूण परिस्थिती बघून त्याने अप्पांना ग्रीनकार्डवर कायमचे आणायचे ठरवले. मुख्य दोन उद्देश, एक, आपल्या मुलांना - शिल्पा व समीरला - आजी आजोबांचा सहवास मिळेल. दुसरे, म्हातारपणात त्यांची काळजी घेता येईल. हा निर्णय घेण्यापूर्वी अनिता म्हणाली होती, “माधव लग्नानंतर डोंबिवलीला वेगळा राहू लागला, त्यामुळे आई-अप्पांजवळ कोणी नसल्यानं तुझ्यात अपराधी जाणीव (Gilty Feeling) निर्माण झाली असेल, माणूस जितका लांब तेवढी जवळच्या माणसांबद्दल काळजी जास्त!” मात्र हा निर्णय घेताना आपण त्यांना विचारले नाही की त्यांना इथे कायमचे राहायला आवडेल का म्हणून. इथल्या वातावरणाशी ते रममाण होतील का? आपला स्वत:चा विचार करून, आपण त्यांना इथे आणण्यात त्यांच्यावर अन्याय तर केला नाही ना? निदान आई-अप्पांना इथे आणल्यामुळे त्यांचा सहवास शिल्पा व समीरला सतत तीन महिने मिळाला. ह्या सुखद विचारांच्या तंद्रीत विनयला रात्री केव्हातरी झोप लागली.

शुक्रवारी रात्री, जेवणानंतर, मुले फॅमिली रूममध्ये त्यांच्यासाठी भाड्याने आणलेल्या एका बालचित्रपटाची टेप बघत बसले. आई, अप्पा, अनिता व विनय लिव्हिंग रूममध्ये बसून गप्पा मारू लागली. विनयने विषयाला हात घातला.

निर्णय मी घेतला, इथल्या वैद्यकीय सुखसोयी, जर तुम्हांला पुढेमागे गरज लागली तर, फार प्रगत आहेत. म्हणून तर भारतातील मोठेमोठे पुढारी वैद्यकीय सल्ल्यासाठी किंवा खास ऑपरेशनसाठी अमेरिकेच्या वाऱ्या करतात!”

तेव्हां अप्पा म्हणाले, “सोयी प्रगत असल्या तरी इथले डॉक्टर व रुग्णालयं फार महागडी आहेत. हे बघा, त्या पुढाऱ्यांकडे सफेद व काळा पैसा भरपूर असतो, त्यामुळे ते त्यांना परवडतं. तुमचे पैसे हे घामाचे आहेत. इथं आल्यावर, राहिल्यावर हे आम्हांला समजून आलं. तिथं होतो तेव्हां वाटायचं, ‘जशा लंकेत सोन्याच्या विटा’ तसा अमेरिकेत ‘पैशाचा धूर!’ आम्ही दोघं आपल्या गिरगावच्या दोन खोल्यांत सुखी आहोत. जागा पहिल्या मजल्यावर असल्यानं दररोज सारखा चढउतार करावा लागत नाही. गेली चाळीस-पन्नास वर्षं तिथं राहिल्यानं चाळ म्हणजे आमचं एक ‘विस्तारित कुटुंब’ बनलं आहे. आता, गिरगावात मराठी मध्यमवर्ग फारसा उरलेला नाही, आपापल्या जुन्या जागा अमराठी व्यापाऱ्यांना भरमसाठ किंमतीला

विकून मराठी लोकांनी बदलापूर, विरार वगैरे ठिकाणी बंगले बांधले आहेत. परंतु आम्हांला गिरगावातील तिथं उरलेल्या मित्रांबरोबर उर्वरित आयुष्य काढायचं आहे व जवळच्या चंदनवाडीत देह ठेवायचा आहे!"

"पण अप्पा, शिल्पा व समीर ह्यांना आजी-आजोबांच्या सहवासात वाढण्याचं भाग्य लाभेल तुम्ही इथं राहिल्यानं! आमच्या लहानपणी, माधव व मी उन्हाळ्याच्या, तसंच दिवाळीच्या सुट्टीत आजोबांकडे गावी जात असू; तसं ह्या मुलांना, दूरदेशी असल्यानं, शक्य होणार नाही. फारतर, तीन-चार वर्षांनी काही आठवड्यांसाठी ती भारतात येतील आणि त्यांना तुमच्याबरोबर वेळ काढायला मिळेल, इथं कायम तुमच्या सहवासात राहिल्यानं त्यांच्यावर आपले संस्कार होण्याची संधी लाभेल!" विनयने दुसरा मुद्दा मांडला.

"खरं आहे तुझं म्हणणं, विनय! परंतु आमच्या वयाचा थोडाफार विचार करायला पाहिजे तुला! अरे, तुमच्यासारख्या तरुण रोपट्यांची, ह्या परभूमीत मुळे धरू शकतात. आमच्यासारख्या वृद्ध वृक्षाचं आता इथल्या भूमीत मूळ धरणं फार कठीण आहे. अजून तरी, देवाच्या दयेनं, आमची प्रकृती ठीक आहे. मागच्या रविवारी देवळात माझ्यासारख्या वृद्धानं मला सांगितलं : डिसेंबर ते मार्च पर्यंत इथली हवा चांगलीच थंड -गोठलेली - असते. आता, नोव्हेंबरमध्ये थंडीची फक्त सुरुवात आहे. 'घी देखा लेकिन बडगा नहीं देखा' अशा वाक्यात त्यानं थंडीचं वर्णन केलं. मात्र मला घाबरवण्याचा त्याचा हेतू नव्हता. पुढेमागे काही व्याधी मागे लागली तर त्याच्या खर्चापायी तुम्ही कर्जबाजारी होऊ नये ह्याची खबरदारी घेतली पाहिजे. दर रविवारी इथल्या देवळात भरणाऱ्या बालवर्गात शिल्पा-समीरला पाठवायला हरकत नाही. तिथं त्यांना, बाकीच्या समवयस्क मुलांबरोबर, भारतीय संस्कृतीची तोंडओळख होईल. आता, संस्कार म्हणशील तर ते तुमच्या घरांत होतातच, माझ्या गेल्या तीन महिन्यांच्या अनुभवावरून मी सांगत आहे. तुम्ही त्यांच्याशी मराठीत बोलण्याचा अट्टहास धरा, जरी त्यांनी इंग्रजीमध्ये उत्तर दिले तरी! लहान मुलं निरनिराळ्या भाषा, भाषाशास्त्रज्ञांच्या मते, लवकर आत्मसात करू शकतात. बाहेरच्या वातावरणामुळे इंग्रजी तर घरी मराठी शिकतील. निदान घरात बोललेलं मराठी त्यांना समजू शकेल. त्यायोगे जेव्हां ते मुंबईला भेटीसाठी येतील तेव्हां त्यांना आमचं बोलणं समजायला अवघड पडणार नाही." अप्पा म्हणाले.

"आई, तू काहीच बोलत नाहीस? तुला काय वाटतं?" विनयने विचारले.

"मी इथं पहिल्या दिवसापासून खूष आहे. मुंबईत दोन माणसांचं काम तर इथं

सहा जणांचं. पण इथल्या सुविधांमुळे ते तिप्पट वाटत नाही. नळ देईल त्या वेळात पाणी भरणं, धुणंभांड्याच्या बाईचा खाडा, भाजीपाला साफ करणं, धान्यातील भेसळ निवडणं अशा तऱ्हेच्या रोजच्या कटकटींचा ताप इथं डोक्याला होत नाही. इथलं खाणं सकस, त्यामुळे माझं वजनही थोडं वाढलं आहे असं वाटतं. तसंच, इथं गाडीत बसून - तेसुद्धा आठवडा अखेरीस - सर्वत्र जात असतो. त्यामुळे माझा चालण्याचा सराव मोडलेला आहे. तिथं निदान देवळात किंवा मार्केटमध्ये भाजी आणण्यासाठी चालण्याचा चांगला व्यायाम व्हायचा. नातवंडांच्या व तुमच्या सहवासात दिवस फार छान जातात, परंतु येणाऱ्या बर्फाळ हिवाळ्याच्या चाहूलीनं मीही त्यांच्यासारखी थोडी साशंक झालेली आहे. समजा, आम्ही आणखी एक-दोन महिने राहण्याचा प्रयत्न केला तर तुम्हांला नवीन तिकिटांचा खर्च करावा लागेल. त्यापेक्षा त्या रकमेत, पुढच्या उन्हाळ्यात, तुम्ही अनिताच्या आई-वडिलांना आणू शकाल, त्यांनाही अमेरिकेतील त्यांच्या लेकीचा संसार बघायला मिळेल!"

आईची ही सूचना विनयला गोलंदाजाच्या गुगली बॉलसारखी वाटली. ह्या सूचनेला टोलावले असते तर तो अनिताच्या मर्जीतून आऊट झाला असता. आईची ही खेळी त्याला जपून खेळणे जरूर होते.

मुंबई ते न्यूयॉर्क एकेरी आणि परतीच्या विमानाच्या भाड्यात फारसा फरक नसल्याने आपण त्या दोघांचे परतीचे तिकिट काढले होते; ह्या गोष्टीचा विनयने आई-अप्पांजवळ ओझरता उल्लेख केला होता. त्या माहितीचा फायदा घेऊन त्यांनी परतीची भाषा काढल्याने तो थोडासा खट्टू झाला. पण चेहऱ्यावर तसे न दाखवता तो म्हणाला, "पुढेमागे, आम्ही अनिताच्या आई-वडिलांना आणण्याचा विचार करणार होतो. ह्यापुढे थंडी जरी वाढणार असली तरी घरात गरम हवा खेळत असल्यानं बाहेरच्या हवेचा तुमच्यावर काहीच परिणाम होणार नाही. तेव्हा उद्या मी फोनवर तिकिट आणखी किती महिने वाढवून मिळेल ह्याची चौकशी करतो!"

"नको, त्याची जरूरी नाही. त्यासाठी जादा पैसे भरावे लागतील. त्यापेक्षा माझी एक सूचना आहे, हल्ली मुंबईत फोन कनेक्शन लवकर मिळण्याची सुविधा उपलब्ध झाली आहे. त्यासाठी लागणाऱ्या पैशांची तू तरतूद केलीस तर आम्हांला वरच्यावर तुमच्याशी व शिल्पा-समीरशी फोनवर बोलता येईल. शेजारच्या भागवतांना फोनसाठी त्रास द्यायला नको, शेजारधर्माला जागून त्याबद्दल ते कधी तक्रार करत नाहीत!" अप्पांनी सुचवले.

"विनय, तू ऑफिसमधून घरी आल्यावर दररोज विचारत असतोस - आई,

कसा काय दिवस गेला ? त्याला माझं नेहमी उत्तर असतं - छान गेला! ह्यांचेही पहिले दोन महिने मजेत गेले, इथली नवीन नवीन साधनं, वेगळी भाषा, तसंच संस्कृती ह्या कारणानं ह्यांच्या चौकस बुद्धीला नेहमी खाद्य मिळत असे, शनिवार-रविवार मोठमोठ्या शॉपिंग मॉलमध्ये नुसतं भटकायलाही ह्यांना आवडू लागलं होतं. गेला महिनाभर, जशी थंडी वाढू लागली तशा ह्यांच्या कुरबुरीही वाढायला लागल्या. मी नातवंडांच्यात इतकी रमली होती, की मला कंटाळा म्हणून कधी आला नाही, मी ह्यांना तुझ्या कपाटात ठेवलेली इंग्रजी-मराठी पुस्तकं वाचा असं सांगताच ह्यांचं उत्तर - फार वेळ वाचवत नाही! मग सुचवलं, थोडं दूरदर्शनवरील कार्यक्रम बघत जा. त्यावर त्यांचं उत्तर : मला त्यांचे विषय व बोलणं समजत नाही! मात्र संध्याकाळच्या जागतिक बातम्या ते दूरदर्शनवर बघायला चुकत नाहीत. तो कार्यक्रम पाहणं, मुलांबरोबर थोडंफार खेळणं व दुपारची वामकुक्षी ह्यात दिवसाचा थोडा वेळ जातो, परंतु इतर वेळी ह्यांना कंटाळा येतो. हवा चांगली होती तोपर्यंत सकाळ-संध्याकाळ जवळपासच्या भागात फिरायला जात असत. हल्ली हल्ली, थंडीमुळे संधिवाताचा थोडाफार त्रास होतो असं सांगू लागले आहेत. त्यामुळे ह्यांनी आता फिरणंही जवळजवळ बंद केलं आहे. घराभोवतीच्या लॉनवर, चांगलं उन पडलं की थोडा वेळ फिरतात. मला तर ह्यांचं ते चालणं प्राणिसंग्रहालयातील बंदिस्त वाघाच्या येरझाऱ्यासारखं वाटतं! ह्यापुढे आम्ही इथल्या उन्हाळ्यासाठी चार महिने, जेव्हां तुम्हांला आणणं शक्य होईल तेव्हां, अवश्य परत येऊ. हे सांगतात त्याप्रमाणे तिकिट वाढवण्याच्या भानगडीत पडू नकोस. ह्याच तिकिटावर आता आम्हांला मुंबईला परत जाऊ दे!" अशा काकुळत्या स्वरातील आईची विनंती ऐकून विनय विचारात पडला.

आपण त्यांना इथे कायमचे राहण्यासाठी आणण्याचा निर्णय घेतला, त्यावेळी त्यांना इथे राहायला आवडले नाही तर काय असा विचार मनाला चाटून गेला होता, बहुधा, त्या ओझरत्या विचारामुळेही आपण त्यांचे परतीचे तिकिट काढले असावे, तो ओझरता विचार आता प्रत्यक्षात पुढे ठाकला आहे... त्याला तोंड देणे भाग आहे. आईच्या विनंतीला मान दिल्याशिवाय आता आपल्याला दुसरा मार्ग नाही हे विनयला कळून चुकले. आई-अप्पांना उद्देशून तो म्हणाला, "उद्या सकाळी उठल्यावर एअर-इंडियाला फोन करून तुमच्यासाठी कोणत्या दिवशी रिझर्व्हेशन मिळतं ह्याची चौकशी करीन. मला वाटतं, रविवार सोईस्कर होईल, त्याआधी शनिवारी क्वीन्स्मधील जॅकसन हाईट्सला जाऊन इथून नेण्याच्या सामानाची खरेदी तुम्हांला करता येईल!"

रात्र फार झाली होती. मुले तर फॅमिली रूममध्ये टेलिव्हिजन बघता बघता झोपूनही गेली होती. त्यांना झोपायला ठेवून, विनय अनितासह आपल्या बेडरूममध्ये गेला. तिकडे आई-अप्पाही त्यांच्या बेडरूममध्ये जाऊन झोपण्याची तयारी करू लागले.

अप्पा अंथरुणात पडले, परंतु त्यांना झोप काही लागेना. गेल्या तीन महिन्यांतील अमेरिकेतील वास्तव्य त्यांच्या डोळ्यांसमोरून जाऊ लागले. इथली सार्वजनिक स्वच्छता, 'सारं कसं शांत शांत' वातावरण, स्वच्छ हवा व पाणी, तसेच सकस अन्न ह्यांची प्रशंसा करण्यात पहिले दोन महिने गेले. बऱ्याच वर्षांनी नातवंडांचा सहवास लाभल्याने त्यांच्याशी खेळण्यात व त्यांचे कौतुक करण्यातही वेळ चांगला गेला. शिल्पा व समीर, दोघेही शाळेतून येईपर्यंत आपली दुपारची वामकुक्षी होत असे. घरी आल्यावर थोडेफार खाऊन दोन्ही मुले फॅमिली रूममध्ये टीव्हीवरील खास लहान मुलांचे 'सेसमी स्ट्रीट' सारखे कार्यक्रम न चुकता बघत असत. शाळेतील इतर मुले व शिक्षकांबरोबर इंग्रजी बोलणे होत असल्याने घरी मराठी संभाषण करायला दोघांना थोडे अवघड जात होते. त्यांना बोललेले बहुतेक सर्व समजत असे. विनय-अनिताच्या मराठी प्रश्नांना ते इंग्रजीमधून उत्तरे देत. परंतु आजी-आजोबांशी दोघेही मोडकेतोडके मराठी बोलण्याचा प्रयत्न करत.

गिरगावात सकाळी उठून चहाबरोबर चाळायला मराठी वृत्तपत्र असले म्हणजे आपण खूष असू. वाचल्यानंतर मजल्यावरील इतर बिऱ्हाडांना जाऊन त्यांना आपला पेपर देऊन त्यांच्याकडील मराठी किंवा इंग्रजी पेपर आणून सकाळच्या दुसऱ्या चहाबरोबर आपल्याला त्यातील बातम्यांची वेगळीच चव लागत असे. त्या मानाने इथले स्थानिक वृत्तपत्र म्हणजे रद्दीच! त्यात वाचण्याच्या मजकुरापेक्षा जाहिरातींची पाने फार असतात. मुंबईतील दैनिक 'नवाकाळ' जरी पानांच्या संख्येच्या दृष्टीने छोटा - लंगोटीसारखा - असला तरी त्याचे अग्रलेख मात्र सणसणीत असतात ह्याची त्यांना आठवण झाली.

स्वत:च्या काही सवयींचा इतरांना - विशेषत: सूनबाईला - त्रास होऊ लागल्याची त्यांना जाणीव होऊ लागली. बशीत ओतून फुर्र फुर्र करून गरम चहा पिण्याची त्यांची सवय ही एक, त्यावर उपाय म्हणून त्यांनी गरम चहा थोडा थंड झाल्यावर कपाने प्यायला सुरुवात केली. बशीतून चहा पिण्याच्या आनंदाला त्यांना मुरड घालावी लागली. दुसरी सवय म्हणजे जेवणानंतर तृप्तीची ढेकर देणे; ते इथे शिष्टसंमत नाही असे विनयने सुचवले. बहुधा, सूनबाई - अनिता - नथीतून तीर

मारत आहे असे त्यांना वाटायला लागले. विनयच्या आईला त्याबद्दल बोललो तर तिचे म्हणणे, 'जसा देश तसा वेष' या न्यायाने तुम्ही वागले पाहिजे. त्यानंतर ढेकर देताना आपण आजुबाजूला कोणी ऐकणार नाही ह्याची खात्री करून ती देऊ लागलो.

आणखी काही गोष्टी त्यांना, इथल्या वास्तव्यात खटकत होत्या, परंतु त्या त्यांनी आपल्या मनातच ठेवल्या. त्यासंबंधीचा उच्चार ते फक्त आपल्या गिरगावातल्या मित्रांजवळ करणार होते. विनयचे एवढे जोडाक्षरविरहित तीन अक्षरी नाव असून त्याचे भारतीय मित्रही त्याचा उल्लेख 'विनी' ह्या टोपणनावाने करत असत. त्याच्या ऑफिसमधील अमेरिकन सहकारी म्हणायला सोपे जाते म्हणून त्याला 'विनी' ह्या नांवाने हाक मारू लागले, पण म्हणून काय ह्या देशी मित्रांनी त्या अमेरिकनांचा कित्ता गिरवायला पाहिजे ? मुलीचे असावे अशा वाटणाऱ्या ह्या टोपणनांवाचा उच्चार करायला त्याच्या देशी मित्रांना काय समाधान मिळते ह्याचा त्यांना उलगडा झाला नाही. विनयही त्यांचे खपवून घेत होता, त्यामुळे उगाच ह्या गोष्टीचा बाऊ करण्यात अर्थ नाही असे त्यांनी ठरवले.

दुसरे म्हणजे, त्यांना जेवताना आमटीचे भुरके मारता येत नसत. पहिल्या दिवशी, बाऊलमध्ये चमचा कशासाठी असा प्रश्न त्यांनी विचारला. विनयने उत्तर दिले, आमटीसाठी ! 'आलिया भोगासी...' ह्या अभंगानुसार त्यांनी चमच्याने आमटी प्यायला सुरुवात केली.

इथल्या बाथरूममध्ये आपले पाय ओले होत नाहीत, परंतु शौचानंतर टॉयलेट पेपरने म्हणजे चक्क कागदाने साफ करणे त्यांच्या मनाला पटत नव्हते. पाण्याशिवाय कोठली गोष्ट साफ होत नाही हा भारतीय विचार त्यांच्या मनात खोल रुजलेला होता, ही तिसरी खटकणारी गोष्ट !

विनय राहतो त्या भागात एक देऊळ होते, पण ते घरापासून दूर होते. तिथे फक्त शनिवार-रविवार किंवा काही सणवार असेल तर जाणे होई. तेथील समुदायात बहुतेक तरुणांचा - विनय, अनिताच्या वयाच्या जोडप्यांचा - समावेश होता. वयस्कर लोक फार क्वचित बघायला मिळत - कोणाचे आईवडील आले असले तरच ! ते सुद्धा मराठी बोलणारे असतील ह्याची शाश्वती नसायची. त्यांच्याशी इंग्रजी किंवा हिंदी बोलण्याने गप्पा मारण्याचा आनंद आपल्याला फारसा मिळत नसे. तुम्ही भारतातील कोठले ? काय व्यवसाय तिथे करत होता ? इथे किती दिवस येऊन झाले ? आवडते का इथे ?... असे ठरावीक प्रश्न विचारून झाले की संभाषणाची गाडी फार पुढे जात नसे, आपल्याला अशा वेळी गिरगावातील घराजवळील

स.का.पाटील उद्यानातील मित्रांची उणीव भासत असे. आपल्यासारख्या पेन्शनरांचा अड्डा त्या उद्यानात सकाळ-संध्याकाळ बसतो. आपापसातील गप्पांना चांगला ऊत येतो. मित्रांपैकी कोणाची तरी 'फिरकी' घेण्याची मधुनमधून आपल्याला लहर येते, त्या गप्पागोष्टींना व फिरक्यांना गेले तीन महिने आपण मुकलेलो आहोत ह्याची जाणीव होऊ लागली आहे.

गिरगावातील दिनक्रमाची, चाळीतील सदैव चालणाऱ्या घडामोडींची, तसेच आजुबाजूच्या कोलाहलाने भरलेल्या वातावरणाची उणीव भासत आहे हे आपल्या ध्यानात आले. ह्या उणिवा तसेच काही खटकणाऱ्या बाबींमुळे आता आपल्याला येथे चुकल्या चुकल्यासारखे वाटत आहे. बरे झाले, आपण थंडीची मोठी ढाल पुढे केली ते! तेथील गजबजलेल्या वातावरणाची आपल्या कानांना इतकी सवय जडलेली आहे... पार्श्वसंगीताप्रमाणे ते वाटते, त्याचा उपद्रव आपल्याला जाणवत नाही. उलट, येथील शांत वातावरणामुळे त्याची अनुपस्थिती भासत आहे. शाळा-कॉलेजांत असताना विनय नाही का रेडिओ लावून अभ्यास करायचा? त्यावेळी आपण त्याला रागावत होतो की रेडिओमुळे त्याचे अभ्यासात लक्ष लागणार नाही, परंतु त्याने परीक्षा उत्तम रीतीने पास करून दाखवून दिले की पार्श्वसंगीत - रेडिओवरील गाणी - ऐकून त्याच्या अभ्यासावर परिणाम झाला नाही.

आमच्या दोघांच्या सांगण्यावरून विनयची समजूत पटलेली आहे, की आम्हांला - निदान मला तरी - इथे करमत नाही. निदान आता, तो परतीच्या रिझर्व्हेशनसाठी उद्या एअर-इंडियाला फोन करीन म्हणाला आहे ह्या खुषीत अप्पा निद्रादेवीच्या स्वाधीन झाले.

विनय आपली व्हॅन लाँग आयलंड एक्सप्रेसवरून सावधपणे चालवत होता. गाडीच्या पुढच्या काचेवर मधुनमधून हिमाचे छोटे छोटे थर पडत होते. त्या थरांचे रूपांतर, गाडीच्या आतील गरम हवेच्या परिणामामुळे, पाण्यात होत होते. हवामानाच्या अंदाजाप्रमाणे हलका हिमवर्षाव किंवा पाऊस पडण्याची शक्यता होती. नेमकी आजच हवा अशी बिघडावी ह्याबद्दल तो थोडा हिरमुसला झाला होता. आज त्याचे आईवडील - आई व अप्पा - मुंबईला परत जाणार होते. निदान त्यांच्यासमोर तरी वैतागू नकोस अशी, शेजारी बसलेल्या अनिताची सकाळपासूनची विनवणी त्याला आठवली. आपल्या चेहेऱ्यावर हसण्याचा मुखवटा ओढून तो मागच्या सीटवर बसलेल्या आई-अप्पांना म्हणाला, "आई व अप्पा, आज हिमवर्षाव बघण्याचं तुमच्या नशिबात होतं!"

"तुमच्या हवामानखात्याचा अंदाज खरा ठरला. नाहीतर मुंबईत पाऊस पडण्याची

शक्यता आहे असं रेडिओ किंवा दूरदर्शनवर जाहीर केलं, तरी तो पडेल ह्याची शाश्वती नसते. पूर्वी, उन्हाळ्यानंतर मुंबईत पहिला पाऊस पडला की कारवाले - विशेषतः टॅक्सीवाले - फार सावकाश गतीनं गाडी चालवत असत. तेव्हां रस्ते निसरडे होण्याची शक्यता असते - टायरचे सूक्ष्म तुकडे डांबरात रुतून बसल्यानं! काय रे, इथं पण तशी काळजी घ्यावी लागते का ?" अप्पांनी कुतूहलाने विचारले.

"इथला उन्हाळा मुंबईइतका कडक नसतो. इथले बहुतेक रस्ते काँक्रिटचे असल्यानं तसा प्रश्न उद्भवत नाही. मात्र बर्फाच्या वादळानंतर रस्ते निसरडे होतात, त्यावेळी गाडी काळजीपूर्वक चालवावी लागते!" विनयने खुलासा केला.

आई-अप्पांच्या भारताकडे जाणाऱ्या विमानाची वेळ होती रात्री आठ वाजता. अप्पांचा स्वभाव फार वक्तशीर. गावी जायच्या गाडीच्या आधी निदान पंधरा मिनिटे तरी ते रेल्वे फलाटावर जाऊन बसतात. अगदी वेळेवर जाण्यासाठी धावपळ करून स्वतःला व इतरांना त्रास देण्यापेक्षा रेल्वे स्थानकावर गाडीची वाट पाहत बसणे त्यांना पसंत होते. त्यामुळे अप्पांची दुपारनंतर विमानतळावर जाण्याची गडबड चालली होती. विनयने त्यांना समजावून सांगितले, की सहा वाजेपर्यंत आपल्याला केनेडी एअरपोर्टवर पोचणे जरूर आहे. येथून जायला फारतर एक तास लागतो. ट्रॅफिक जॅम किंवा खराब हवेमुळे आणखी अर्धा तास... फारतर एक तास जास्त लागू शकेल. आपण दुपारी चारनंतर एअरपोर्टवर जायला निघू. तेव्हां अप्पांचा जीव थोडा भांड्यात पडला व ते शांतपणे सोपऱ्यावर बसून मासिक चाळू लागले.

विनयने सर्वांना केनेडी विमानताळाच्या एअर-इंडियाच्या निर्गमन कक्षात सोडले. जवळच्या गाडीतळावर आपली व्हॅन उभी करून तोही निर्गमन कक्षात आला, तोपर्यंत अनिताने आई-अप्पांच्या सामानाच्या बॅगा चेक-इन केल्या होत्या. विमान सुटायला अजून दोन तास अवकाश होता. मुलांना भूक लागल्याने त्याने तिथल्या फूड-कोर्टमध्ये जाण्याचे ठरवले. अनिताने आई-अप्पांसाठी घरून खाण्याचे काही पदार्थ आणलेले होते. सर्वांनी तिथे बसून फराळ केला. त्यावेळी अप्पांच्या चेहऱ्यावर, बंद पिंजऱ्याचे दार उघडताच गगनात झेप घेणाऱ्या पक्ष्यासारखे हावभाव आहेत असे विनयला वाटले.

एअर-इंडियाच्या लंडनमार्गे मुंबईला जाणाऱ्या प्रवाशांना विमानाकडे जाण्याची सूचना ऐकताच अप्पा ताडकन बसलेल्या जागेवरून उठले. शिल्पा, समीर ह्यांचे पापे घेताना तसेच विनय, अनिताचा निरोप घेताना आईचे डोळे पाणावले.

"परत आम्हांला भेटायला केव्हां येणार ?" आईने विचारले, विनयने उत्तर

दिले, “अजून दीड-दोन वर्षांनी... बहुतेक!”

मघाशी फूड-कोर्टच्या काचेतून दूरवर उभे असलेले एअर-इंडियाचे जंबो जेट विमान विनयने अप्पांना दाखवले होते. अप्पा त्याकडे कौतुकाने बघत राहिले होते. पाणावलेल्या डोळ्यांनी आई जड पावलांनी ‘सिक्युरिटी चेककडे’ जाऊ लागली; तर गगनात झेप घेऊन परत मातृभूमीला नेणाऱ्या त्या विमानाकडे जाण्यासाठी अप्पा झपाझपा पावले टाकू लागले.


सुधीर कुलकर्णी

लेथम - न्यूयॉर्क

**email -**

‘एकता’च्या सौजन्याने


************

# दानशूर साहित्यिक : डॉ. अनंत लाभसेटवार



१९६०-७० च्या काळात अमेरिकेत बरीच सुशिक्षित मराठी मंडळी उच्च शिक्षणासाठी आली, बहुतांशी मंडळी I.I.T., V.J.T.I., U.D.C.T. सारख्या नांवाजलेल्या शैक्षणिक संस्थेतून पदव्या घेऊन उज्वल भवितव्याच्या दृष्टीने, अमेरिकेत आपले कर्तृत्व सिद्ध करण्यासाठी आली, हातात होती शिष्यवृत्तीची ग्वाही आणि आई वडिलांकडून घेतलेले थोडे पैसे, काहींनी कर्ज काढून. काही तरी करून दाखवण्याच्या इर्षेने, प्रबळ इच्छेने ते झपाटलेले होते.

त्याच दरम्यान, विदर्भातील एका २२ वर्षाच्या, मध्यम वर्गीय, बुद्धिमान, तडफदार तरुणाने शिष्यवृत्ती मिळवून अमेरिकेची वाट धरली. साल होते १९५९ आणि तरुणाचे नांव होते, अनंत लाभसेटवार. सुवर्णपदक विजेत्या लाभसेटवारांचा कल, संशोधनाकडे असल्यामुळे जनन शास्त्रात (Genetics) पदव्युत्तर शिक्षणार्थ ते University of Wisconsin, Madison मध्ये दाखल झाले. त्यांनी आपल्या १२ वर्षाच्या स्वतःच्या संशोधन कारकिर्दीत १०० हून अधिक लेख, आंतरराष्ट्रीय स्तरावरील शास्त्रीय मासिकांतून प्रसिद्ध केले आहेत.

डॉ. लाभसेटवारांनी आपली नोकरी, व्यवसाय सांभाळून अमेरिकेत आल्यावरच आपल्या लेखनाचा श्री गणेशा केला. लहानपणापासून मराठी वाचनाची तीव्र ओढ असल्यामुळे त्यांना लिहायची स्फूर्ती झाली. त्यांचे बहुतेक लिखाण अमेरिकेतील त्यांच्या अनुभवांवर, येथील चांगल्या-वाईट जीवन पद्धतींच्या अवलोकनावर आधारित असून ते मराठी वाचकांच्या समोर आणणे या हेतूने लिहिले आहे. आपल्या लेखनाने, वाचकांना आनंद व्हावा असे प्रत्येक लेखकाला वाटते. त्या उद्देश्याने त्यांचे लेखन हे सत्यम् -शिवम् - सुंदरम् या तिन्हींचा योग्य रीतीने उपयोग करून वाचकांच्या मनोरंजनासाठी लिहिले गेले आहे.

जेव्हां डॉ. लाभसेटवार महाविद्यालयात शिकत होते, तेव्हां त्यांचे स्वप्न होते, एक उच्च पदावरील अधिकारी व्हायचे, परंतु अमेरिकेला येण्याचा योग आल्यावर, त्यांची स्वप्नपूर्ती उच्च पदावरील अधिकाऱ्यांपेक्षा किती तरी उच्च झाली. त्यांना

यश आणि यशच मिळत गेले. त्यांना आयुष्याबद्दलचा समज, जाण अमेरिकेत आल्यावरच झाली. खरं पाहायला गेलं तर पूर्वी शिक्षणाचे आणि आर्थिक लाभाचे प्रमाण व्यस्त होते.

अमेरिकेसारख्या भांडवलशाही देशात, प्रामाणिक कष्ट करून त्याला थोडी नशिबाची साथ मिळून अमाप पैसा मिळवलेली काही सुशिक्षित मराठी मंडळी आहेत, पण इतर भाषिकांच्या तुलनेत कमी प्रमाणांत. डॉ. लाभसेटवारांनी आपली संशोधकाची नोकरी सोडून उद्योगात गुंतवणूक केली व एका वेगळ्या जगात प्रवेश केला. अनुभव नव्हता, पण ध्येय होतं, चिकाटी होती व ते पूर्ण करण्याची जिद्द होती. गुंतवणूक करीत करीत त्यांनी एक हजार एकर शेत जमीन, अमेरिकेत वेगवेगळ्या ठिकाणी चार व्यापारसंकुलं (Shopping Centers), दोन आकाशवाणी केंद्र आणि बँक एव्हढे उद्योग जमवले.

१९८६ साली, अमेरिकेत बँक विकत घेणाऱ्या पहिल्या भारतीय व्यक्तीचा मान त्यांनी मिळवला. प्रत्येक कर्तबगार पुरुषामागे एक स्त्री उभी असते असे म्हणतात. डॉ. लाभसेटवारांना या सर्व उपक्रमात त्यांच्या सुविद्य, स्त्री रोग व प्रसुतीशास्त्रात प्रवीण अशा डॉक्टर पत्नीची, लताची अखंड साथ लाभली. तिच्याशिवाय एव्हढे शक्यच नव्हते.

काही व्यक्ती, पैसा मिळवूनही आयुष्यभर कंजूषच राहतात. लाभसेटवारांनी मात्र आपल्या संपत्तीचा वाटा "लाभसेटवार प्रतिष्ठान" स्थापन करून, त्याद्वारे महाराष्ट्रातील सेवाभावी संस्थांना, ग्रंथालयांना, नवोदित संशोधकांना वितरीत केला आहे. मराठी साहित्य, अंधश्रद्धा निर्मुलन, आणि संतती नियमन या त्यांच्या आवडीच्या तीन क्षेत्रात विशेष उल्लेखनीय कामगिरी केलेल्या व्यक्तीची काटेकोरपणे निवड करून ते दरवर्षी एक लाख रुपयाचे पारितोषिक व मानपत्र देतात. आतापर्यंत त्यांनी ४० लक्षाहून अधिक रुपयांचे अनुदान केले आहे.

बदलत्या जगाबद्दल बोलतांना डॉ. लाभसेटवार म्हणतात.........."जग द्रुत गतीने बदलत चालले आहे आणि सर्वच बदल, स्थित्यंतरे, विधायक नसतात. या बदलातून आयुष्याला चांगले वळण लावायचे की नाही, ते प्रत्येक पिढीने ठरवायचे असते. जग बदलले तरी 'माणूस' बदलला नाही. महर्षी व्यासांनी रेखाटलेला मनुष्य स्वभाव आणि आजच्या पिढीतील व्यक्तींचा स्वभाव यात काही फरक जाणवत नाही. जग जरी कितीही जवळ आलं असलं, तरी माणूस माणसापासून लांब गेला आहे. आधुनिक प्रगतीमुळे भावनिक पोकळी, दुरावा निर्माण झाल्यासारखे वाटते. त्यातील काही आधुनिक साधनांचा मुलांच्या जीवनावर अनिष्ट परिणाम होऊ शकतो.

ते टाळण्यास अल्पवयीन पिढीसाठी दूरदर्शनवर, संगणकावरील संकेतस्थळांवर काही निर्बंध घालण्यास हरकत नाही.

सध्याच्या पिढीतील संस्कृतीबाबतही डॉ. लाभसेटवार यांचे मत त्यांनी परखडपणे मांडले. त्यांच्या दृष्टीनेही जे त्यांच्या व त्यानंतर आलेल्या पिढीचेही मत असे आहे की नवीन पिढी वडिलधाऱ्या माणसांचा नेहमीच आदर राखीत नाही, त्यांना मान देत नाही. येथे जन्मलेल्या, वाढलेल्या पिढीवर अमेरिकन संस्कृतीचा प्रभाव जास्त दिसून येतो. हिंदू धर्माच्या चाली-रीति, रिवाज यांवर या पिढीचा विश्वास नाही. याला काही अपवाद असतीलच. यामुळे दोन पिढींत संघर्षाचा वणवा पेटतो. घरात वाद-विवाद होतात. आपली मते त्यांना पटत नाहीत आणि त्यांची आपल्याला. या अंतर्विरोधातून साहित्य निर्माण होऊ शकतं."

स्त्रीमुक्ती चळवळीबद्दल, भारतीय आणि अमेरिकेतील स्त्री यांच्या फरकाबद्दल प्रश्न विचारला असता, डॉ. लाभसेटवार म्हणाले की स्त्रीमुक्ती ही काळाची गरज आहे आणि भारतीय स्त्रीला वास्तवात, अमेरिकन स्त्री एव्हढे अधिकार नाहीत.

डॉ. लाभसेटवार यांचे आवडते लेखक म्हणजे वि. स. खांडेकर. त्यांच्यावर खांडेकरांच्या अलंकारित साहित्याचा संस्कार झाला. डॉ. लाभसेटवारांनी अमेरिकेत आल्यावर तीन वर्षे "आजची अमेरिका" ही लेखमाला 'अमृत' मासिकातून चालु करून आपल्या लेखनाची मुहूर्तमेढ बसवली. लिखाणाच्या शैलीपेक्षा ते आशयाला व वाचकांच्या मनोरंजनाला प्राधान्य देतात.

मराठी साहित्याचा त्यांचा अभ्यास सखोल आहे. आपल्या ललीत साहित्यकलाकृतीकडे ते कथाकार किंवा कादंबरीकार म्हणून न बघता, एक मिमांसकाराच्या दृष्टीकोनांतून पारखतात आणि स्पष्ट शब्दांत आपले विचार मांडतात. त्यांचा हा प्रामाणिक मोकळेपणा त्यांच्या 'घरट्या पलीकडे' या कथासंग्रहाच्या प्रस्तावनेत आढळून येतो. सध्याच्या मराठी लघुकथेबद्दल ते म्हणतात,

"आतापर्यंत मराठी लघुकथा कौटुंबिकपाशांत गुंतलेली असे. गाडगीळांनी ३००-५०० लघुकथा प्रकाशित केल्या. पण त्या सर्व मुंबईस्थित मध्यमवर्गकेंद्रित आहेत. मध्यमवर्गीय कवचातून ती निसटली तर फार फार तर ग्रामीण भागांत प्रवास करते, पण तिची कौटुंबिक पोत नष्ट होत नाही. इतर जग तिला पारखं होतं. यांत वावगं असं काही नाही. कारण प्रत्येक लेखक आपल्या अनुभवविश्वाद्वारे लिहीत असतो. परंतु आता जग बदललं आहे. ते विस्तारीत झालं आहे. त्यामुळे लेखकांची अनुभवसंपदा नुसती वाढली नाही तर तीत वैविध्य आलं आहे. म्हणून मराठी लघुकथा कौटुंबिक साच्यातून बाहेर पडणं साहजिक आहे."

लाभसेटवारांचे वरील विचार खरोखरीच परखड आहेत. त्यांतील सत्य कदाचित सध्याच्या काही मराठी साहित्यिकांना रुचणारे नाही. पण इंग्लंड, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, नॉर्वे या ठिकाणी स्थाईक झालेल्या काही साहित्यिकांचे अनुभवविश्व खरोखरीच मोठे आहे हे नाकबुल करता येणे शक्य नाही. आजच्या जागतीककरणाच्या युगांत जगांतील सर्व भाषांतील वाङ्मय, सनातनी कौटुंबिक वातावरणांतून बाहेर पडून जगांतील अनेकविध समस्यांकडे अगदी वेगळ्या दृष्टीकोनांतून बघत आहे आणि अशा बदलत्या विचारांचे पडसाद त्या त्या साहित्यातून उमटलेले दिसत आहेत. मराठी भाषेचे उपासक आणि चाहते याचसाठी आपल्या भाषिक संस्थांची अधिवेशने इंग्लंड, अमेरिका, नॉर्वे, स्वित्झरलंड अश्या अनेक देशांत भरवून, मराठी साहित्यिकांना घरट्याबाहेरील जगाची ओळख करुन देऊन ज्ञानाचे आणि अनुभवाचे भांडार उघडे करून देत आहेत.

'अमृत' व्यतिरिक्त, लाभसेटवारांचे लेख वेळोवेळी, 'किर्लोस्कर', 'स्त्री', 'मेनका', 'वसंत' अशा विविध मासिकांतून आणि 'लोकमत', 'सकाळ', 'तरुण भारत' इत्यादी दैनिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. 'वसंत' मासिकाच्या "अमेरिका" विशेषांकाचे अतिथी संपादकपदही त्यांनी भूषविले. फिलाडेल्फिया येथे २००९ मध्ये भरलेल्या बृहन् महाराष्ट्र मंडळाच्या अधिवेशनात कला, संस्कृती आणि साहित्य या क्षेत्रात पारितोषिक देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

सध्या त्यांच्या साहित्याचा अभ्यास, "आचार्य" पदवीसाठी शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, व डॉ. आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद या शैक्षणिक संस्थेंत होत आहे.

त्यांच्या साहित्यात, कथा, कादंबरी, स्फुट लेखन, चरित्र, प्रवास वर्णने यांचा समावेश करता येईल. या सर्व व्यापात त्यांना कौटुंबिक जबाबदाऱ्यांचा तसेच जीवनातील यश, अपयशाचा व्यत्यय आला नाही. एक गोष्ट मात्र त्यांनी स्वीकारली, ती म्हणजे मराठीचे नाते जपतांना त्यांना मायदेशाची ओढ नेहमीच लागली. परंतु मायदेशी, एव्हढी माया कदाचित जमवता आली नसती आणि एव्हढा दानधर्मही हातून झाला नसता आणि हे त्यांनाच का, कोणालाही वाटणे स्वाभाविक आहे.

डॉ. लाभसेटवारांच्या साहित्य संपदेत १७ पुस्तकांचा समावेश होतो. त्यांच्या कादंबऱ्यांतून अमेरिकन जीवनाचं वास्तववादी दर्शन घडतं. त्यांच्या साहित्य संपदेची यादी खाली नमूद केल्याप्रमाणे आहे.....

**कादंबऱ्या**

- मावळलेलं प्रेम
- कंप

- प्रतीक्षा
- न संपणारे क्षितीज
- अविवाहिता
- सत्यमेव जयते
- विवाहिता

**कथासंग्रह**

- तरंग
- घरट्या पलीकडे

**प्रवासानुभव**

- अमेरिकेतील पाप नगरी
- विश्व भटकंती
- चीनमधील चैन

**चरित्र**

- अमेरिकेतील धावपळ (तिसरी आवृत्ती)
- बिल गेटस् - संगणकाचा राजा
- अमेरिकन दौडधूप (हिंदी)

**लेखसंग्रह**

- अमेरिकेतील वाटचाल
- डॉलर्सच्या फुलवाती

मराठी भाषेशी, समाजाशी ऋणानुबंध जपणारा असा हा साहित्यिक.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

# प्रणयिनी

तिनं आपली भारी मर्सिडीज गाडी हॉटेलसमोर थांबवली. शिकागोतलं ते प्रख्यात मेरियाट हॉटेल. अल्पवस्त्रात गुंडाळलेल्या सौंदर्याचं कसंबसं लज्जारक्षण करीत ती बाहेर पडली आणि तिनं दुरूनच एका पट्टेवाल्या नोकराला खुणावलं. तो धावतच तिच्याजवळ आला. त्यानं तिला गाडी हॉटेलच्या वाहनास्थळावर उभी करण्याची पावती दिली आणि तो वाहनात बसून गाडी हॉटेलच्या तळमजल्यावर घेऊन गेला.

आपला बटवा व उंच टाचांच्या भारी जोड्यावर आपला तोल सावरत ती हॉटेलच्या प्रशस्त स्वागतदालनात शिरली. तिचं सौंदर्य बघून कितीतरी पुरुषांच्या माना तिच्याकडे वळल्या. असं नेहमीच होत असल्यामुळे तिला त्या दृष्टिक्षेपांची सवय झाली होती. देवानं दिलेलं सौंदर्य वरदान नसून शाप आहे असं तिला कधी कधी वाटे.

लगबगीनं ती एकदम तिथल्या प्रसाधनगृहात शिरली. तिथल्या भल्यामोठ्या आरशासमोर उभं राहून तिनं आपले केस नीट बसवले; वस्त्र सारखे केले. आपल्या अल्प स्कर्टमधून व घट्ट जर्सीतून शरीराच्या सर्व वक्ररेषा स्पष्ट दिसाव्यात याची काळजी घेतली. आपल्या स्वरूपावर एकदम खुश होऊन ती बाहेर पडली आणि झपाझप पावलं टाकीत ती स्वागतदालनाच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या उघड्या मद्यागारात गेली. तिथल्या वेटरला तिनं मद्याचे दोन पेले १५ मिनिटात एका खोलीत पाठवले जावेत म्हणून आज्ञा केली. हे सर्व काम आटोपल्यावर ती २३ व्या मजल्यावर जाण्यास लिफ्टसमोर उभी राहिली. लिफ्ट लवकरच आली.

तिनं दारावरच्या बेलवर बोट ठेवलं आणि प्रतिक्षा करीत उभी राहिली. तिच्या चेहऱ्यावर अभिसारिकेची अधिरता आणि समुद्रात विलीन होणाऱ्या सरितेची उत्कंठा पसरली होती.

लगेच दार उघडून प्रवीण तिच्या स्वागतार्ह दारात उभा असलेला दिसला. तिच्या सौंदर्याचा डोलारा बघून तो क्षणभर अवाक् झाला. आपल्यासमोर मूर्तिमंत एक अप्सरा उभी आहे असं त्याला वाटलं.

"अग फोन केला असतास तर मी खाली आलो असतो." स्वत:ला सावरत तो म्हणाला.

"मग त्यात तुला चकीत करण्याचा आनंद मला मिळाला नसता." शुभांगी म्हणाली व खोलीत शिरण्यासाठी त्याच्या परवानगीची वाट न बघता ती उघड्या खांद्यावर बटवा नाचवत आत गेली. तिनं केलेल्या या शिष्टाचारभंगाकडे त्याचं दुर्लक्ष झालं

कारण तो तिचं सौंदर्य आपल्या दृष्टीत सामावण्यात मग्न झाला होता. तिच्या वागणुकीचा त्याला अर्थच लागेना. पण त्याच्या पुरुषी मनाला तिच्या वाटचालीची चाहूल लागल्याशिवाय राहिली नाही. त्यामुळे तो काहीसा अस्वस्थ झाला.

त्यानं अंगुलीनिर्देश करून तिला खुर्चीत बसण्यास सुचवलं.

परंतु ती खुर्चीऐवजी तिथल्या भल्यामोठ्या अंथरुणाच्या काठावर बसली. ती देखील एका मांडीवर दुसरी मांडी ठेवून. त्यामुळे जे शरीरप्रदर्शन झालं ते बघून त्याच्या भावनांची चाळवाचाळव झाली.

"सौ. घाणेकर!" बंद झालेल्या दाराजवळ उभं राहून तिला न्याहाळत तो म्हणाला.

तिला तिच्या सौभाग्याची आठवण करून देण्यासाठी त्यानं ती उपाधी हेतुपूर्वक वापरली होती. त्याला वाटलं त्यामुळे तिच्या वागणुकीत बदल होईल. पण तसं काही झालं नाही.

"लग्न झाल्याची आठवण करून देण्याची ही वेळ नव्हे. मला शुभांगी म्हण." एक कटाक्ष त्याचेकडे फेकीत ती म्हणाली.

"बरं शुभांगी. दुपारी डॉ. घाणेकरांची भेट झाली. म्हणून मला खूप आनंद झाला. खरोखरीच शुभांगी तुझा नवरा म्हणजे एक देवमाणूस आहे. हृदयविकारावर शस्त्रक्रिया करून किती लोकांना ते जीवदान देतात."

त्यानं मुद्दामून तिच्या जीवनातील मुख्य माणसाचा विषय काढला. त्यामुळे तरी तिचं मन बदलेल असं त्याला वाटलं.

"तो स्वतःच्या धंद्यात मग्न. मी माझ्या." ती फुरंगटून म्हणाली.

"कुठल्या?"

"सोशल वर्क. इथल्या मराठी मंडळात मी बरंच काम करते. माझ्या मिस्टरांनी मोठे donation दिल्यामुळे माझं तिथे वजन पडतं."

"असामान्य धन्वंतरी. आणि त्याला दातृत्वाची सांगड! केवढी मोठी युती ही."

तिला त्याचं हे गौरवास्पद बोलणं वायफळ वाटलं.

"माझ्या मिस्टरांविषयी का बोलतोस? ते इथे नाहीत. मी आहे. माझ्याकडे बघून तुला काही वाटत नाही?"

"वाटतं की. पण मला त्या भावना शब्दबद्ध कशा कराव्यात हे कळत नाही. म्हणून बोलणं कठीण झालं."

"मग काही बोलू नकोस. इथे बेडवर माझ्याशेजारी बस. हे बेड खूप मऊ आहेत." त्याच्या पांढऱ्याशुभ्र चादरीवरून सूचकपणे बोटं फिरवित ती म्हणाली.

तिचं आव्हान ऐकून त्याचा गळा कोरडा पडला. संभाषणाला मिळालेलं वळण

त्याला मुळीच आवडलं नाही.

" आज भारत सोडून मला आठवडा झाला."

"मग ?"

" नाही म्हणजे मी एवढे दिवस बायको-मुलांना सोडून कधी राहिलो नाही." 'बायको' या शब्दावर भर देत तो म्हणाला. आपल्या विवाहित स्थितीची आठवण तिला तिच्या उद्दिष्टापासून परावृत्त करेल असं त्याला वाटलं.

"तुझी wife इंडियात आहे. मी आज तुझ्यासमोर उभी आहे. या संधीचा तू फायदा घे." मादक स्वरात ती म्हणाली.

"शुभांगी, तू अशा प्रकारची स्त्री असशील असं मला स्वप्नातही वाटलं नाही. तुझ्याविषयी माझ्या मनात अतिशय मांगल्याचं स्थान होतं. शिवाय तू माझी यजमान आहेस. तुझ्या शृंगारीक हालचाली बघून कुणाच्याही भावना प्रज्वलीत झाल्या नाहीत तर तो खरा मर्द नाही असंच म्हणावं लागेल."

"Good. मग वाट कशाची बघतोस ? इथे दुसरं कुणी नाही. मी तुला अर्पण करायला आली आहे. तू माझा स्वीकार कर."

तिच्या आव्हानाला प्रतिसाद देण्यापूर्वीच दारावरची घंटा वाजली. तो व्यत्त्यय त्याला स्वागतार्ह वाटला. त्याने पटकन दार उघडलं.

समोर हॉटेलचा नोकर मद्याचे चषक घेऊन उभा होता. त्यानं पेले एका बैठ्या टेबलावर काळजीपूर्वक ठेवले आणि एक पावती बाहेर काढली.

"मी त्याची काळजी घेते, प्रवीण." असं म्हणून तिनं बटव्यातली मोठी नोट काढली व त्या नोकराला देऊन त्याची बोळवण केली.

हा व्यवहार होत असतांनाच प्रवीणनं एक भलामोठा पडदा बाजुला सारला. त्यामागे काचेचं दार होतं. ते त्यानं उघडलं. बाहेर एक कठडा होता. मोकळ्या हवेचा स्पर्श होताच त्याला भावनिक कोंडीतून सुटका झाल्यासारखं वाटलं.

कठड्याच्या गजावर हात ठेवून तो एकाग्र चित्तानं अंतरिक्षात बघू लागला. शिकागोचा परिसर असंख्य दिव्यांनी उजळला होता. पण त्याच्या मनात मात्र वादळच सुरू होतं. जे घडत होतं ते त्याच्या मनावरील भारतीय संस्कारांना पटत नव्हतं.

लगेच शुभांगी मद्याचे दोन पेले घेऊन तिथे आली. तिनं एक पेला त्याला दिला आणि दुसरा आपल्या सावजाकडे कामुक दृष्टीनं बघत ओठांना लावला. ती मुद्दामून त्याच्या जवळ उभी राहिली. त्या सामिप्यानं त्याचं शरीर शहारलं. तिचा मादक अंगगंध त्याच्या भावनांना उत्तेजित करू लागला.

"ड्रींक कसं आहे ?" तिनं त्याच्या खांद्यावर हात ठेवून दूरवर बघत विचारलं.

"चांगलं आहे. भारतात ते प्राशन करण्याची संधीच मिळत नाही."

"Good. त्यामुळे तू मूडमध्ये येशील."

"म्हणजे यामागे देखील एक व्यूहरचना आहे का ?"

त्याच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजी तिनं त्याच्याकडे मिस्किलपणे बघितलं. त्या मद्यामुळे ती काहीशी सद्सद्विवेक बुद्धीला शरण गेल्यासारखी वाटली. त्याचा फायदा घेऊन त्यानं तिच्याशी बोलण्यास सुरुवात केली.

"शुभांगी, तू आणि मी एकाच कॉलेजमधून पास झालो. तू दोन वर्षे मागे होती एवढंच. पण तू आज केवढी प्रगती केली आणि मी ? साधा प्राध्यापक म्हणून खर्डेघाशी करतो. तुला देवतुल्य नवरा मिळाला. रहायला एवढा मोठा प्रासाद. जवळ महागड्या गाड्या. मनात येईल ते विकत घेण्याची ऐपत. आणि हो एक विसरलोच. मातृत्त्वामुळे तुझ्या स्त्रित्वाला आलेली परिपूर्णता. जीवनात मुलंबाळं महत्त्वाची असतात. तुझा तो नरेश किती गोड मुलगा आहे. दुपारी तू घरी नेलंस तेव्हां मला लगेच 'काका' म्हणून हाका मारू लागला.

"तुझी रहाण्याची व्यवस्था मी घरी न करता इथे हॉटेलमध्ये का केली याचा विचार केलास का ? नाहीतर पाहुण्यांसाठी माझ्या घरी चार बेडरूम्स् आहेत."

"म्हणजे त्यामागेदेखील काही कपट होतं का ?"

त्याच्या त्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजी तिनं त्याच्याकडे सूचक दृष्टीनं बघितलं.

"शुभांगी, तुझ्या प्रत्येक हालचालीमागे कुठला तरी कट दिसतो. म्हणजे मला एक साहित्यिक म्हणून बोलावण्यामागेही...."

एखादं रहस्य उलगडावं तसा चेहरा करीत त्यानं तिच्याकडे बघितलं आणि तो चाट पडला. तिच्या चेहऱ्यावर पसरलेले मिस्किल भाव बोलके ठरले.

"शुभांगी, तू असं करून माझ्या स्वाभिमानाला मोठा धक्का दिलास. आतापर्यंत मी असं समजत होतो की केवळ आपल्या साहित्याच्या गुणवत्तेमुळे आपल्याला परदेशी आमंत्रण मिळालं. पण असं का ? असं करून तुला काय मिळालं ?"

"तू म्हणतोस त्याप्रमाणे देवानं मला सगळ्या materialistic गोष्टी दिल्यात. पण त्यामुळे माणूस कधी happy होत नाही." आपल्या मद्याच्या पेल्यात दु:खी चेहऱ्यानं बघत ती म्हणाली.

आज प्रथमच तिच्या चेहऱ्यावरील कामभावांची जागा नैराश्यानं घेतली असं त्याला वाटलं.

"काय म्हणतेस शुभांगी ?" चकीत होऊन तो म्हणाला, "ऐहिक गोष्टींचं एवढं वैपुल्य असतांना कुणी दु:खी असणं कसं शक्य आहे ?"

"तीच तर नवलाची गोष्ट आहे, प्रवीण. जगाप्रमाणे तुलाही मी अतिसुखात लोळत आहे असं वाटतं. पण ते खरं नाही. हे सर्व एक सोंग आहे." खाली मान घालून ती पुटपुटली.

हा संवेदनाशील विषय आहे हे त्यानं तिच्या चेहऱ्यावरील उदासिनतेवरून ओळखलं. शिंपला उघडावा आणि आत सुंदर मोत्याऐवजी काचेचा तुकडा सापडावा अशी त्याची स्थिती झाली.

"म्हणजे ?"

"प्रवीण, मला देवानं शारीरिक सुख दिलं नाही. पुरुषाच्या स्पर्शापासून मी आजतागायत वंचित राहिले आहे. I am a virgin."

ते ऐकल्याबरोबर तो दचकून तिच्यापासून दूर झाला.

"ते कसं शक्य आहे ? तुला समाजात प्रतिष्ठा पावलेला नवरा लाभलेला आहे. तू एका गोड मुलाची आई आहेस. असा सुखी संसार जगात शोधूनही सापडणार नाही."

"सांगितलं ना, प्रवीण. हे सर्व नाटक आहे. त्या मागची reality तुला ठाऊक नाही. माझा नवरा माझ्याबरोबर कधी झोपला नाही."

"शुभांगी, तू एका मुलास जन्म दिलास की तो मुलगा दत्तक घेतलास ?"

"मुळीच नाही. मी labor pains अनुभवले आहेत."

आता तो पूर्णपणे बुचकळ्यात पडला.

"शुभांगी, शारीरिक संबंधाशिवाय गर्भधारणा संभवणं कसं शक्य आहे ? तू कुंतीचा अवतार असशील तर गोष्ट निराळी आहे. कलीयुगात अपत्त्यप्राप्तीसाठी दोन भिन्न लिंगांच्या व्यक्तींचा संयोग लागतो हे मला ठाऊक आहे."

"हे जगाला दाखविण्यासाठीच मी motherhood पत्करलं. इतरांप्रमाणे तुही फसलास. जगाला आमच्या संसारात काही कमी नाही, हे दाखविण्यासाठी मी आधुनिक medical science चा फायदा घेतला. In vitro fertilization करून आई झाले."

"म्हणजे नलिकेत गर्भ पैदा केला ?"

"हो." मद्याचे घोट घेऊन मन शांत करण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली. जीवनातलं रहस्य बाहेर ओकल्यामुळे तिला मन हलकं झाल्यासारखं वाटलं.

एकदम तिनं आपला हात त्याच्या गजावर विसावणाऱ्या हातावर ठेवला. तिचा तो पुढाकार बघून तो बिचकून गेला. त्या अप्रत्यक्षित क्षणानं तो गडबडून गेला.

"प्रवीण, असा दचकू नकोस. माझी difficulty लक्षात घे."

"शुभांगी, माझं मन भारतीय मूल्यांनी संस्कारीत झालं आहे. तू पाहिजे तर

त्याला जुनाट, कालबाह्य नीति समज. मी शादीशुदा माणूस आहे. तिची याप्रमाणे प्रतारणा करणं माझ्या मनाला पटत नाही."

"तू तुझी family सोडावी अशी माझी मुळीच अपेक्षा नाही."

"पण माझ्या नीतिमूल्यांशी ते सुसंगत नाही."

"पण ही नीतिमूल्यं comparative नसतात का ?"

"ती सापेक्ष असतात म्हणून मी त्यांचं उल्लंघन करावं असा त्याचा अर्थ होत नाही."

"प्रवीण, जरा विचार कर." याचनेच्या स्वरात ती म्हणाली, "Begger जेव्हां भीक मागतो तेव्हां मोटारीत बसलेल्यांना त्याचं वागणं त्यांच्या Value system ला consistent वाटत नाही. पण ज्याच्या पोटात food नसतं त्या भिकाऱ्याला तुमच्या बड्या लोकांच्या value शी संबंध वाटत नाही. मी पण त्यातलीच एक समज. मी भुकेलेली आहे. मला संतुष्ट करून माझ्या स्त्रित्वाला परिपूर्ण कर."

"तुझ्या नवऱ्याला लैंगिक जडत्व आहे हे तुला लग्नानंतर मधुचंद्राचे वेळी कळलं नाही का ? मग तू त्यावेळीच विवाहविच्छेदन करून मोकळी का झाली नाही ?"

"ते तेवढं सोपं नव्हतं आणि नाही. माझ्या नवऱ्याचं घराणं भारतात फार वजनदार आहे. त्याचं सामाजिक स्थान उच्च आहे. मी divorce घेणार होते पण माझ्यावर pressure आणण्यात आलं. या विकृतीसाठी अमेरिकेत modern treatment सुरू आहे असं मला सांगण्यात आलं. त्यामुळे मला आशा वाटली. "

"अमेरिकेत आल्यावर मी त्या आशेवर जगले. मग कळलं की तो रोग untreatable आहे."

"काही काही व्यक्ति असाध्य असतात."

"पण त्यात माझा काय दोष ? इतरांप्रमाणे मलाही needs आहेत. तुझ्या value ऐवजी तू माझ्या भुकेकडे का बघत नाहीस ?"

"मला तुझ्याविषयी कणव वाटते. पण तू माझ्याकडून जी अपेक्षा करते आहेस त्याविषयी मन संभ्रमित झालं आहे. मनात नीति आणि परमार्थ यात द्वंद्व सुरू आहे."

"हा विषय फार sensitive आहे. मी आजपर्यंत त्याविषयी कुणाला बोलले नाही. तुला प्रथमच सांगत आहे."

"काळजी करू नकोस. मी त्याविषयी कधीही वाच्यता करणार नाही."

"तो आता अनिलच्या social prestige चा प्रश्न आहे. म्हणून मला silently हे दुःख सहन करावं लागतं."

"तुझी कोंडी मला कळली."

"मग तू मला आज happy कर. हे कुणाला कळणार नाही. तुझ्या कुटुंबाला धोका पोचणार नाही याचं मी तुला आश्वासन देते."

"म्हणजे तुला प्रियकर नको. नर हवा."

"Exactly. अमेरिकेत याला one night stand म्हणतात. मिटींगसाठी बाहेरगावी गेलं की अनेक नवरे जीवनात एक प्रकारचा spark आणण्यासाठी असं करतात. अशा संबंधातून भावना निर्माण होत नाही. दोघंही आपआपल्या मार्गानं जायला free असतात."

"पण मला या क्षणिक मोहाला बळी पडायचं नाही." तिच्या उन्नत छातीकडे बघत तो म्हणाला.

"प्रवीण, अशी opportunity नेहमी चालून येत नाही. मी कुठल्याही पुरुषाला attractive वाटण्यासारखी आहे."

तिच्या डोळ्यात कामाग्नि धगधगत होता.

शृंगारासाठी सज्ज असलेल्या या कामिनीचं काय करावं हेच त्याला कळेना.

"तुझं सौंदर्य मला एकीकडे खेचतं तर नीतिमूल्यं दुसरीकडे. अशा रस्सीखेचीत मी यापूर्वी कधी सापडलो नाही."

"अशा romantic क्षणी अशा रूक्ष गोष्टी बोलू नकोस. पुढ्यात आलेला प्रत्येक क्षण enjoy करावा अशी अमेरिकन philosophy आहे. सध्या तू अमेरिकेत आहेस. म्हणून Rome मधे असतांना Romans करतात तसं कर आणि हे द्वंद्व वगैरे विसरून जा."

ती आता त्याचे अगदी जवळ आली. त्या सामिप्यात आव्हान होतं. स्पर्शात जादू होती आणि आवाजात आर्जव होतं.

तो अजूनच विचारात पडला. आतापर्यंत स्त्री म्हणजे मांगल्याचं प्रतिक असं त्याच्या मनावर बिंबवण्यात आलं होतं. आता तिचा याप्रमाणे उपभोग घेणं नितीबाह्य ठरणार नाही का? शरीरसुखाचा हा अनैतिक अविष्कार निंदनीय समजायला नको का? तो आत्मस्वराचा शोध करू लागला.

त्याचे दोन्ही हात आपल्या हातात पकडून तिनं डोळे मिटले व आपलं मुखकमल वर करून ती थरथरत्या पण तृषार्त ओठांनी त्याच्या प्रतिसादाची वाट बघू लागली. तो मात्र काष्टवत उभा होता.

- अनंत लाभसेटवार

**email - latalabh@aol.com.**

************

## रंग माझा वेगळा : श्रीनिवास माटे



**अ**मेरिका, कॅनडा मध्ये गेली ३० वर्षाहून अधिक काळ मराठी भाषा ज्यांनी जोपासली, त्या व्यक्ती कोणी व्यावसायिक साहित्यिक अथवा पत्रकार नव्हत्या आणि नाहीतही. त्यामध्ये कोणी डॉक्टर्स, कोणी इंजिनीअर्स तर कोणी स्थापत्य विशारद अशा मराठी भाषेचा अभिमान, आपुलकी असणाऱ्या हौशी व्यक्तींचा समावेश आहे. आपापल्या नोकऱ्या, व्यवसाय सांभाळून, या मंडळींनी मराठी साहित्य, लिखाणाचा सेतू सातासमुद्रा पलीकडे सांधला व गेली ३० वर्षाहून अधिक काळ दृढ केला.

अशाच व्यक्तींमध्ये एक नांव म्हणजे, कॅलिफोर्नियाचे श्री. श्रीनिवास माटे. व्यवसायाने स्थापत्य विशारद (आर्किटेक्ट) असूनही लहानपणापासून प्रामुख्याने कविता करायची हौस असल्यामुळे त्यांनी आपला छंद-व्यासंग येथे, अमेरिकेत आल्यावरही कायम ठेवला आहे. कॅनडाहून प्रसिद्ध होणाऱ्या "एकता" त्रैमासिकाच्या संपादन मंडळावर बरीच वर्षे ते कार्यरत आहेत. त्यांचे "एकता" मधील संपादकीय लेखही सडेतोड आणि वाचनीय असतात. त्याशिवाय, जवळ जवळ ३० वर्षापूर्वी लॉस एंजेलिस च्या मराठी मंडळाची स्थापना करण्यातही त्यांचा भरीव सहभाग होता. तर या आपल्या पुस्तकासाठी त्यांच्याशी थोडक्यांत साधलेला सुसंवाद :

प्र.: श्रीनिवास, तुम्ही व्यवसायाने स्थापत्य विशारद आहात आणि मग मराठी भाषेची आवड तुम्हाला कशी काय निर्माण झाली ? घरात आजोबा, वडील, आई किंवा आणखी कोणी मराठी लेखन-कविता केल्या आहेत का ?

उ.: माझे बालपण सदाशिव पेठेत आजोळी गेले. तेथेच माझा पुस्तके वाचण्याचा, थोडेफार लिहिण्याचा "श्री गणेशा" झाला. आई हुजुरपागेत शिक्षिका होती. तिने मला "सिंदबादच्या सात सफरी" हे मला पहिले पुस्तक बक्षीस दिले व वाचनाची गोडी लावली. पण त्याशिवाय घरामधील एका खोलीत आजोबांनी त्यांच्या हयातीत जमवलेली पुस्तके दोन कपाटे भरून ठेवली होती. तर हे बाळकडू आमच्या

आजोबांच्या genes मधून आले असावे असे वाटते. मी नववी - दहावीत असताना मावशीने फ्लॉरेन्स बार्कलेच्या पांच-सहा कादंबऱ्या आणून दिल्या त्या मात्र मला इंग्रजी डिक्शनरी बाजूला ठेवूनच वाचायला लागल्या. तसेच आमच्या भावे स्कूल मधील शुक्ल गुरुजींनीही बरेच प्रोत्साहन दिले. त्यात भर म्हणून लहानपणी जवळच्या देवळात आजी बरोबर कीर्तन ऐकायला जात असे, तर असा हा लिखाणाचा, वाचनाचा वारसा मला मिळाला.

प्र.: मग तुमच्या वडिलांकडून काही प्रोत्साहन मिळाले का ?

उ.: हो, जरूर मिळाले. ते व्यवसायाने जरी मुंबईच्या V.J.T.I. या इंजिनीअरिंग कॉलेज मध्ये फिजिक्सचे प्राध्यापक होते, तरी ते संस्कृत मध्ये उत्तम काव्य करीत असत. माझी आई कविता करीत असे. मला वाटते कि कविता करायचा माझा छंद तिच्याकडून लाभला.

प्र.: जर एवढी साहित्यप्रेमी मंडळी घरात असताना तुम्ही आर्किटेक्ट हा व्यवसाय कसा निवडलात ?

उ.: त्याचे कारण असे, कि माझे वडील प्राध्यापक असले तरी ते एक उत्कृष्ट चित्रकार व शिल्पकार होते. त्यांनी अनेक ऑइलपेन्ट, पोर्ट्रेट्स केली होती आणि शाडूच्या मातीचे ते अर्ध-पुतळेही बनवीत. मुंबईच्या जहांगीर आर्ट गॅलरी मध्ये जेव्हां प्रदर्शन भरत असत तेव्हां मला आवर्जून पाहायला घेऊन जात असत. तसेच माझ्या शाळेतील फडके आणि केळकर या दोन चित्रकलेच्या शिक्षकांनी मला चित्रकलेचे प्रोत्साहन दिले. माझा एक मावसभाऊ त्या वेळी मुंबईच्या जे.जे.स्कूल ऑफ आर्ट मध्ये आर्किटेक्चर मधील डिप्लोमा करीत होता. माझे ड्रॉइंग चांगले असल्यामुळे त्याने माझ्या वडिलांना मला आर्किटेक्चरला घालण्याचा सल्ला दिला.

प्र.: ४० वर्षापूर्वी अमेरिकेत फार थोडे लोक यायचे. जास्त करून इंग्लंडला जायचे. तुम्ही मग अमेरिकेत शिक्षणासाठी आलात कि थेट नोकरीसाठी आलात ?

उ.: आर्किटेक्ट झाल्यानंतर मुंबईला माझे जे.जे. स्कूल मधील पारशी प्राध्यापक आर्किटेक्ट, जाल गोभाई यांच्या कंपनीत नोकरी मिळाली. १९६३ च्या दरम्यान जाल गोभाई लायन्स क्लब तर्फे अमेरिकेत गेले असताना त्यांना तेथील कॅन्सास राज्यातील विचिटॉ या शहरी ग्लेन बेनेडिक या आर्किटेक्टशी ओळख झाली आणि मला त्यांच्याशी संपर्क साधायला सांगितले. १९६४ साली मी मॅनहॅटनला M. Arch

च्या पदवी अभ्यासक्रमाला दाखल झालो. पदवी घेतल्यानंतर १९६५ मध्ये सिॲटलला गेलो. १९६६ साली मी बॉस्टनला गेलो. तेथे शैला भाटे हिच्याशी माझा वाङनिश्चय झाल्यावर ती पुण्याला परत गेली. बॉस्टनमधील थंडीमध्ये माझा M I T मध्ये प्लॅनिंग शिकण्याचा बेत गारठला आणि १९६८ जानेवारीत मी थेट लॉस एंजलीसला आलो. त्याच वर्षी माझे शैलाशी लग्न झाले.

प्र.: ही झाली तुमची वैयक्तिक घोड दौड. तर आता तुम्ही मला तुमच्या साहित्यिक सेवेबद्दल थोडी माहिती देऊ शकाला का? कारण तुम्हाला माहीतच आहे, कि या पुस्तकाचा विषय अमेरिका आणि कॅनडा मधील मराठी लेखकांच्या साहित्य सेवेबद्दल माहिती व त्या अनुषंगाने त्यांची ओळख भारतातील व इतर देशातील मराठी बांधवांना व्हावी.

उ.: बॉस्टन येथील वास्तव्यात माझा अशोक अकलूजकर व त्यांची पत्नी विद्युल्लेखा हिचा परिचय झाला. त्यांच्या प्रोत्साहनामुळे मी लिहिलेल्या दोन कथा "सत्यकथा" साप्ताहिकाकडे पाठविल्या आणि त्या प्रसिद्धही झाल्या. त्याआधी मी शाळेत असताना कविता आणि लेख लिहिले होते परंतु ते कधी कोठल्या मासिकात छापायला पाठवले नव्हते. पुढे माझे वॉशिंग्टनचे मित्र दिलीप चित्रे आणि इंग्लंडमधील स्नेही मुकुंद सोनपाटकी यांच्या पुढाकाराने "कुंपणा पलीकडील शेत" हा मला वाटतं पहिला भारताबाहेरील लेखकांचा कथासंग्रह प्रसिद्ध केला. तोवर सत्यकथा बंद पडली होती,त्यामुळे कथा सत्यकथेला न पाठवता ती "मादाम पेलेच्या परिसरात" या शीर्षकाने या कथासंग्रहात प्रसिद्ध झाली.

त्यानंतर माझे कथा लेखन बरेच मंदावले व माझा कल जास्त करून कविता लिहिण्यात होत राहिला. कै. वसंत बापट यांना माझ्या कविता आवडल्या आणि त्यांच्या प्रयत्नामुळे माझा पहिला कविता संग्रह, "स्पंदन" साधना प्रकाशनने प्रसिद्ध केला. या पुस्तकाआधी माझ्या आणि श्री. शशिकांतर पानट यांच्या काही कवितांना डॉ. गोपाळ मराठे यांनी चाली दिल्या होत्या. या कविता मुंबईतील श्री. बाबूजी फडके (सुधीर फडके), श्रीधर फडके, रवींद्र साठे इ. प्रसिद्ध गायकांनी "स्वर जागले स्मृतींचे" या कॅसेटद्वारे स्वरबद्ध केल्या.

ही कॅसेट आम्ही लॉस एंजलीसच्या महाराष्ट्र मंडळाच्या कार्यक्रमात श्रीमती प्रभा अत्रे यांच्या हस्ते प्रकाशित केली. त्यातील माझी "हॉलीवूडची लावणी" सौ. उत्तरा केळकर यांनी गायली होती. ती डॉ. सौ. मीना नेरुरकर यांनी न्यूजर्सी मध्ये भरलेल्या बृहन महाराष्ट्र मंडळाच्या अधिवेशनात सादर केली. नंतर त्यांनीच दिग्दर्शित

केलेल्या कै. वसंत बापट लिखित "सुंदरा मनामध्ये भरली" या नृत्य-नाट्यासाठी ही लावणी सादर केली.

श्री. दिवाकर तथा दादा कारखानीस यांच्या विनंतीवरून गेली दोन वर्षे "सावली" वार्षिकाची कार्यकारी संपादकाची जबाबदारी स्वीकारली हे तुम्हाला माहित आहेच. सध्या लॉस एंजेलिसच्या मराठी मंडळातील काही सभासदांनी स्थापन केलेल्या लेखकमंडळा सोबत लिहिण्याचे, कविता करण्याचे काम करीत आहे. दर दोन महिन्यांनी प्रत्येकजण निवडून दिलेल्या विषयावर एक लेख व कविता करतो आणि ती वाचून दाखवतो. यात मी आणि माझी पत्नी शैला दोघांचा सहभाग आहे.

शब्दांकन : प्रमोद तेंडुलकर, रिव्हरसाईड, कॅलिफोर्निया
email :tendulkarp@hotmail.com

# क्विटो

ते तान्हं बाळ कोणा प्रवाशाला सिॲटलजवळच्या ऑलिंपिक नॅशनल पार्कमध्ये सापडले. ठिपक्याठिपक्यांचं टॅबी जातीचं ते मांजर असावं असे वाटून त्यांनी ते पार्कच्या मुख्य ऑफिसमध्ये मेजर टॉमलिन्सनला आणून दिले. ते होते कूगर अथवा माउंटन लायनचे पिल्लू. प्रवाशांना ते नक्की कोठे सांपडले ते सांगता येईना. त्यामुळे ते परत सोडता येणार नव्हते. मग त्याला आठवले की रेंजर ॲल रोझ आणि त्याची बायको मार्गारिट दोघांना प्राण्यांचं प्रेम आहे. ते पिल्लू टॉमलिनसनने ॲलच्या स्वाधीन केले.

ॲलने तिचे नांव ठेवले "क्विटो". तिला दूध पाजण्यासाठी मार्गारिट हातांत ग्लोव्हज् घाले. मांडीवर एक जाड टॉवेल घेऊन क्विटोला बाटलीने दूध पाजे. क्विटो ती बाटली चारी पायांत धरी. दूध जोरांत आले नाही की बुचाचा चावा घेऊन तुकडे करी आणि गुरगुरू लागे. अशी अनेक बुचे तिने फाडली. हळूहळू तिचे वजन वाढले. दूध सुटून आता ती रोज कुटुंब खाते ते खाऊ लागली. गंमत म्हणजे तिला उकडलेला पालक आवडे! सामन मासे म्हणजे तर तिला पक्वान्नच.

ॲल्युमिनियमच्या थाळींत ठेवलेले जेवण ती धसमुसळेपणाने उडवून लावी आणि थाळी तोंडात धरून गुरगुरत घरभर भटके. मग ॲलने ती थाळी एका खिळ्याने जाड फळीला ठोकून बसवली. ती आता पॉटीट्रेन्ड झाली होती. म्हणजे इतकी की ती बाहेर रानात खेळत असली तरी विधी करण्यासाठीं मात्र ती घरांत येऊन सँडबॉक्सवर बसे!

क्विटोला,रोज मुलांबरोबर लपंडाव खेळायला आवडे. लपलेली मुलं तिला सापडली की ती आनंदाने उड्या मारी आणि ती लपल्यावर मुलांनी तिला हुडकले की ती अंगणभर उड्या मारी. तिला स्त्रिया आवडत, पण ॲलशिवाय इतर पुरुषांवर ती गुरगुरत धावून जाई. सकाळी मेल टाकणारा जर्मन माणूस ओरडे, "कम, टेक दॅट डॅम लायन अवे."

क्विटोचा आणखी आवडता खेळ म्हणजे ॲलचा ग्लोव्ह किंवा हॅट हिसकावून खोलीच्या मध्यावर जायचे आणि गुरगुरत "परत घेऊन दाखव" असे आव्हान द्यायचे. अशावेळी ॲल एक छोटे ब्लँकेट तिच्यावर टाकी आणि ग्लोव्हचे सुटे टोक क्विटोसकट उचलून तिला गरगर फिरवे. ती ग्लोव्ह सोडून खाली उडी टाके अन् क्षणभर चक्रावून भेलंडे. मग हळूच ॲलजवळ जाऊन त्याच्याकडे अजिजीने बघे.

ॲल आणि मार्गारिटच्या बेडच्या पायथ्याशी क्विटोला झोपायला जागा दिली होती.

पण ती दोघे झोपली की क्विटो बेडवर दोघांच्यामध्ये पांघरुणात शिरे. ॲलच्या खांद्यावर डोके टेकून फर्र फर्र असा खुशीत येऊन आवाज करीत झोपी जाई.

शॉपिंगला जाताना ॲल, मार्गारिट क्विटोला मोटारीतून नेत. ती गाडीच्या मागच्या खिडकीशी अंग पसरून बसे. गाडी बंद करून दोघे शॉपिंग करून येईपर्यंत गाडीभोवती बघ्यांची गर्दी जमे. लोकांना वाटे, नजर चुकवून ते रानटी जनावर आंत जाऊन बसलंय. ते गाडीत पाहून ॲल मार्गारिट यांची तिरपीट उडायच्याऐवजी ॲलने दार उघडतांच क्विटो आनंदाने त्याच्या अंगावर उड्या मारी ते पाहून लोक चकीत होत.

क्विटोचें वजन आता वीस पौंड झाले होते. ॲलची बदली पार्कच्या सीमेवरच्या ऑफिसांत झाली. घराबाहेरचा सगळाच प्रदेश आपला आहे अशा थाटांत क्विटो बाहेर वावरत असे. नवीन जागी ती चुकून खासगी मालकीच्या जमिनीवर गेली तर कोणीतरी तिला गोळी घालील अशी काळजी ॲलला वाटू लागली. मार्गारिटशी बोलल्यावर दोघांनी असं ठरवलं की क्विटोला सिॲटल झूमध्ये नेऊन सोडायचं. त्याप्रमाणे एके दिवशी जड अंतःकरणाने ते क्विटोला झूमध्ये घेऊन गेले. तिला सोडण्याची वेळ लांबवण्यासाठी झूभोवती फेऱ्या घालीत राहिले. शेवटी झूमध्ये जाताच क्विटोच्या वासाने तेथील वन्य श्वापदांनी एकच गलका सुरू केला. तो ऐकतांच क्विटो उडी मारून ॲलच्या खांद्यावर चढून बसली. ती थरथर कांपत होती. तरीही मन घट्ट करून ॲल आणि मार्गारिट क्विटोला सोडून परत निघाले. परतीच्या वाटेवर दोघेही एकमेकांशी बोलले नाहीत.

एका आठवड्यात दोघेही सिॲटल झूला गेले. मार्गारिटने क्विटोला लांबूनच हाक मारली. तेथील गर्दीच्या गलबल्यातून ती हाक क्विटोला ऐकू गेली. पिंजऱ्यात पुढे येऊन ती गजांना धरून उभी राहिली. ॲल पिंजऱ्यांत शिरताच ती त्याला बिलगली. त्याने प्रेमाने दिलेला मांसाचा तुकडा तिने खाल्ला. ते सगळं पाहून तिथला नोकर म्हणाला, "कमाल आहे, आम्हांला तर ती जवळही येऊ देत नाही. मी गजांतूनच तिचं अन्न आंत ढकलतो."

त्यानंतर दोनएक महिन्यांतच त्यांना बातमी मिळाली की क्विटो वारली. त्याआधी तिने खाणे सोडले होते, पण झूने त्यांना कांहीच कळवले नव्हते. ॲल आणि मार्गारिटच्या घरांत त्यांच्या मुलीसारखी वाढलेली क्विटो. दोघांना वाटले की तिची जगण्याची इच्छाच संपली असावी.

मूळ लेखक : फ्रीमन टिल्डन,
भाषांतर : श्रीनिवास नी. माटे
**email - smate@sbcglobal.net.**

************

# भावनाशील आणि विचारवंत : सौ. मोनाली फाटक



दीर्घ कालाच्या अवकाशांत आपल्या आयुष्यांत अनेक व्यक्ती येऊन जातात आणि आपल्या पाऊलखुणा ठेऊन अदृष्य होतात. स्मृतीपटलावर पुसट होत जाणाऱ्या प्रतीमा कधी कधी दिसतात अनाहूतपणे. काही पाऊलखुणामात्र पुसल्या जात नाहीत आणि ती चित्रे कोरली जातात मन:पटलावर कायमची.

मैत्रीची ही नाती कशी जुळतात ? अनेक कारणे असावीत. पण प्रमुख कारण असावे ते म्हणजे एकामेकांचे जुळणारे स्वभाव आणि एकमेकांना समजून घेण्याची तयारी आणि एकमेकांवरील विश्वास. माणसामाणसाचे छंद वेगळे असतील. अपेक्षा वेगळ्या असतील, भोवतालचे वातावरण वेगळे असेल. पण मनाच्या तारा जुळायला सर्व गुण-दोषांसह त्या व्यक्तीला जवळ घेण्याची तीव्र इच्छा असायला लागते. मोनालीचा आणि माझा स्नेह याच भूमीकेवर स्थापित झालेला आहे.

फार नाही. आठ दहा वर्ष झाली असतील. स्नेह मासिकाच्या निमित्ताने लंडनचा मित्र मुकुंद भावे याच्याशी बोलताना त्यानं मोनाली फाटकांचे नांव सांगितले. 'चांगल्या कथा आणि इतर ललित लेखनपण करतात' असं तो म्हणाला. मी त्यांना स्नेह मासिकासाठी कथा पाठविण्यास सांगितले. इथून परिचयाला सुरुवात झाली. हळुहळू मैत्री पक्की होत गेली. संवाद साधता येऊ लागला. अडचणीत येणाऱ्या प्रश्नांवर मोनालीबरोबर चर्चा होऊ लागली.

स्वभाव जुळत होते. समान जीवनमूल्ये आणि मराठी साहित्याची आवड, माणसं समजावून घेण्यास मदत होऊ लागली. माझ्या पहिल्या कथा संग्रहावर- 'परतीच्या वाटेवर'- मोकळी चर्चा झाली.

मोनालीचे विचार आणि प्रत्ययकारी अनुभव तिच्या लिखाणांतून दिसत होते. कोणत्याही साहित्यिकाकडे पहाताना त्याचे विचार, मते, जाणीवा, शैली, त्याच्या लिखाणांतून कशा शोधाव्यात याचा सल्ला मोनालीकडून मिळायचा. कितीतरी लेखक, रूपाने बेंगरूळ, वागण्यांत बेशिस्त किंवा काहीतरी व्यसने असणारे असतात. हे त्यांचे बाह्यरूप झाले. तिकडे लक्ष न देणे हे महत्त्वाचे. त्यांची जीवनमूल्ये काय

आहेत, त्यासाठी तो कितपत निश्चल राहायला तयार आहे आणि वेळ प्रसंगी त्या मूल्यांसाठी तो किती आणि कोणता स्वार्थत्याग करायला तयार आहे या वरून त्या साहित्यिकाचा कस लागत असतो असं तिचं म्हणणं असायचं.

मोनालीची लेखनशैली सहजसुंदर आहे आणि लालित्यपूर्ण आहे. एखाद्या कुशल चित्रकारासारखा तिचा कुंचला व्यक्तीचित्रे रंगवितात. तसंच साहित्यिकांच्या मुलाखती घेताना ती पूर्ण तयारी करून ठेवते. मिळेल तेवढी माहिती जमवते. त्याचा अभ्यास करते आणि मुलाखत घेताना अत्यंत आपुलकीने प्रश्न विचारते. ज्याची मुलाखत घेतली जात असते त्या व्यक्तीला 'at ease' झाल्यासारखे वाटते आणि मग मुलाखत रंगते.

मोनाली म्हणते की ती दिसायला सुंदर नाही. पण जसजसा तिचा परिचय वाढत जातो तसतसं तिचं चिंतनशील व्यक्तिमत्त्व आपल्या मनांत भरतं. आमचे वादविवाद कधी झाले नाहीत. पण तिच्यातला स्पष्टवक्तेपणा आणि खंबीरपणा लक्षांत आल्यावाचून राहात नाही. तिच्या अंगी साहित्यिकाची सर्जनशीलता तर आहेच पण त्याचबरोबर समीक्षकाची मीमांसक दृष्टीपण आहे आणि ही 'मीमांसक दृष्टी' उपहासाची किंवा स्वतःचा मोठेपणा मिरवण्यासाठी नसून ती creative criticism म्हणूनच असते याचा मला चांगला अनुभव आलेला आहे.

'मोनाली फाटक' कोण आहेत व कशा घडत गेल्या आहेत – एक 'साहित्यिक' म्हणून नव्हे तर एक 'माणूस' म्हणून हे आता त्यांच्या शब्दांतच वाचा.

शब्दांकन :दिवाकर कारखानीस, संपादक

माझा जन्म आणि लहानपण पुण्यात, एका मध्यमवर्गीय कुटुंबात गेलं. आजी आजोबा, एक भाऊ, एक बहीण, दोन आत्येभाऊ अधूनमधून आणि माझे आई वडील असा आमचा एकत्र कुटुंबाचा पसारा होता. माझे वडील लष्करमध्ये (army) होते. आणि त्यांची शिस्तही अतिशय कडक होती. 'Change of work is relaxation' हे त्यांचे ब्रीदवाक्य! त्यामुळे आम्ही सतत काहीतरी करीत असू. अभ्यास आणि खेळ हे दोन्हीही. केवळ अभ्यासात पहिला नंबर येऊन चालत नसे तर पोहोण्यात आणि बुद्धिबळात ही. १३ व्या वर्षी मला पोहोण्याच्या आंतरशालेय स्पर्धेत चार सुवर्ण पदके आणि Individual Championship चा कप मिळाला. नंतर कॉलेजमध्ये देखील आंतरमहाविद्यालयीन पोहोणे आणि बुद्धीबळ स्पर्धांमध्ये ६ वर्षे सतत सुवर्ण पदके, रौप्य पदके आणि वैयक्तिक कप मिळाले. तसेच राष्ट्रीय पातळीवर देखील. १९६८ साली मला शिक्षण आणि खेळ यात विशेष गुणवत्ता मिळवल्याबद्दल "sports Girl of the Year" हा बहुमान देऊन पुणे महानगरपालिकेने सत्कार केला.

वाचनाच्या छंदा मागे देखील माझे वडीलच होते. त्यांचे आवडते वचन म्हणजे "Talk when you must!" त्यामुळे आमच्या घरात गप्पाटप्पा अंमळ होतच नसत. रोज सकाळी एका मुलाने भगवद्‌गीतेचा एक अध्याय वाचायचा, दुसऱ्याने Times of India चा अग्रलेख, मग आपापला अभ्यास आणि शाळा / कॉलेज. संध्याकाळी पोहोण्याच्या तलावावर प्रॅक्टीस चालायची. घरी आल्यावर बुद्धीबळ, जेवण आणि अभ्यास! तोवर झोपायची वेळ! त्यामुळे मित्रमंडळी वगैरे फारशी नाहीतच.

कॉलेजात देखील मी बराच वेळ लायब्ररीत असायची. हातात आलेले कुठलेही पुस्तक झपाटल्यासारखे वाचून काढायची. संतवाङ्मय ही खूप वाचले. शेवटी लायब्ररीचे पटवर्धन सर म्हणायचे, "आता परीक्षा जवळ आलीय्. आता फक्त अभ्यासाची पुस्तके वाचा. प्रथम वर्ग काही चुकवायचा नाही बरं! मला परत पेढे खायचे आहेत." मीही हसायची. माझे वडील निकाल लागल्यावर पेढे आणायचे. वडिलांची शाबासकी मिळाली की खूप आनंद व्हायचा आणि हुरूप यायचा. खेळातला विजय / पदक मिळाले की वडील आईस्क्रीम खायला घेऊन जायचे. खूप मजा यायची. वडिलांनी आम्हां मुलींना देखील मुलांसारखेच वाढवले. ते नेहमी म्हणायचे, "मुलींनी देखील आर्थिक, मानसिक आणि वैचारिक स्वातंत्र्य 'कमावले' पाहिजे." हे मी मनापासून स्वीकारले. एम्.ए. झाल्यावर मी 'प्राध्यापक' म्हणून बिर्ला कॉलेज मध्ये 'मराठी' विषय शिकवला. त्याचबरोबर पुणे विद्यापीठांत विद्यार्थ्यांची Sports adviser आणि पोहोण्याची 'कोच' म्हणून काम केले. सावरकरांच्या भक्तीने, गदिमांच्या / व्यंकटेशांच्या लेखणीने भारलेले मन घेऊनच मी मराठीचा अभ्यास केला. पाडगांवकर, शेळक्यांनी भावनेचे आगळे जग समोर उलगडले होते. परदेशांत जायचा विचारही मनाला शिवला नव्हता.

कॉलेजातच मला माझा जीवनसाथी भेटला होता. "Opposites Attract" हे आमच्या बाबतीत इतकं खरं की काय सांगू? तो इतका देखणा तर अगदी आपलेपणातही मला कुणी सुंदर म्हणणार नाही. मी so called Scholar पुस्तकांत रमणार तर तो पशुपक्ष्यांच्या सहवासात निसर्गात रमणार! मी हिमालयाचे वर्णन वाचून भारावून जाणार तर तो हिमालय स्वतःच चढणार! मला रोजच्या जीवनाची शिस्त - routin प्रिय तर तो अगदी बिनधास्त अन् बेछूट! मग काय? अगदी आनंदात चाललेले भारतातले जीवन सोडून 'नवे जग पहायला', नवे अनुभव घ्यायला आम्ही अमेरिकेत आलो आणि सगळे जगच उलटे पालटे झाले. संथ वाहणाऱ्या आयुष्याची नदी नायगारा धबधब्यासारखी कोसळायला लागली. त्यात गुदमरून न जाता श्वास घेण्याचा प्रयत्न सुरू झाला.

चारचौघांसारखं उच्च शिक्षण घ्यावे, चांगलीशी नोकरी करावी असला विचारही माझ्या नवऱ्याच्या मनात आला नव्हता. त्याला मासे वाढवायचे होते. (Breeding)

पक्ष्यांची निगराणी करायची होती. काहीतरी वेगळे-आगळे करायचे होते. तसा प्रयत्न ही करून पाहिला वर्षभर! पण त्याने अमेरिकेत पोट भरत नाही, आपल्या इच्छेप्रमाणे जगता येत नाही हे लक्षात आले. तेव्हा असलेल्या डिग्रीचा उपयोग करून नोकरी सुरू केली. पण मन रमायचे ते पशुपक्ष्यांत, माशांत आणि फुलापानांतच! मग घरभर माशांचे टँक आले. कुत्री आली, घरात आणि दारातही बगीचा फुलायला लागला. काम हे केवळ उदरभरणासाठी राहिले.

हळूहळू हे ही जीवन अंगवळणी पडायला लागलं. आई-बाबांचे Mom & dad चक्क बरं वाटायला लागलं. 'मराठी' तला 'म' ही न जाणणाऱ्या या देशात हळूहळू आमचीही मुळे - rooots रुजायला लागली.

मी आणि माझं स्वप्न संपलं आणि 'आमचे' स्वप्न साकारायला लागले. ध्येय एकच होते- आपल्या मुलांना येथे आपल्यापेक्षा जास्त चांगले आयुष्य देण्याचा प्रयत्न करणे. त्यासाठी कष्ट खूप करावे लागले- एकाची दिवसपाळी, दुसऱ्याची रात्रपाळी—कारण एकतरी पालक मुलांबरोबर हवा-, मग मुलांची शिक्षणे... आज आनंदाने सांगावेसे वाटते की आमची दोन्ही मुले- मुलगा व मुलगी उत्तम शिकली- एक झाला सर्जन आणि दुसरी डॉक्टर ऑफ फार्मसी. आपल्या पायांवर उभे राहिले आहेत.

हे करताना अनेक भलेबुरे अनुभव आले. त्यातले काही लेखणीतून कागदावर उतरले. संतवाङमयाची माझी आवड आणि अभ्यास अनेक वर्षांचा आहे. त्यातून निर्माण झालेले नाटक म्हणजे मी लिहिलेले १९८९ मधले "माझे माहेर पंढरा" हे नाटक डॉ. मीना नेरुरकर यांनी दिग्दर्शन केले. "मराठी विश्व" या संस्थेने निधि गोळा करण्यासाठी त्याचे अनेक प्रयोग केले. 'एकता' मासिकासाठी लेखन केले.

त्यानंतर 'रंगदीप' मासिकासाठी अनेक वर्षे लेखन केले. त्यातील काव्य स्पर्धेसाठी 'परीक्षक' म्हणून काम केले, अनेक लेखकांच्या पुस्तकांचे परिक्षण केले. १९६६ साली सौ. सविता गोखले यांचे बरोबर 'Tossed Salad' नावाची एकांकिका न्यूयॉर्क मराठी मंडळासाठी केली. त्याचा विषय होता - या समाजातले आपल्यासारखे परदेशी आणि त्यांचे विचार.

त्यानंतर बृहन् महाराष्ट्र वृत्तामध्ये मी "कौतुक" नावाचे सदर अनेक वर्षे लिहिले. त्यात आपल्या दुसऱ्या पिढीतल्या नाविन्यपूर्ण कार्य-व्यवसाय करणाऱ्या शिक्षित मुलामुलींची मुलाखत होती. त्यात डॉक्टर झालेला नट होता, अमेरिकेच्या 'वेस्ट पॉईंट अकॅडेमी' मध्ये शिक्षण घेतलेली मुलगी होती, अमेरिकन टी.व्ही वर बातम्या देणारा तरुण होता तर पाच मिनिटांचे विशेष वृत्त-केवळ स्त्रियांच्या वैद्यकीय शिक्षणासाठी - टी.व्ही. वर देणारी मराठी डॉक्टरीण ही होती.

त्याच सुमारास मी 'सावली' मासिकासाठी लिहायला सुरवात केली. आधी

फक्त कथा किंवा कविता लिहित होते. नंतर दादांना थोडीफार मदत ही करू लागले. त्यांच्या दोन्ही पुस्तकांचे परीक्षण ही केले. आणि आता हे संकलनाचे काम त्यांच्याबरोबर करण्याचे भाग्यही मला लाभले आहे.

हे सर्व लेखन करताना आजूबाजूच्या जीवनाचा परिणाम माझ्या लेखनावर होत आला आहे. १९६४ साली 'पंडित नेहरूं'वरचा माझा लेख 'सकाळ' या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाला. त्यानंतर शाळा, कॉलेजच्या नियतकालिकात, पुण्यातील मासिकात माझ्या कविता, कथा आणि लेख प्रसिद्ध झाले.

मी अमेरिकेत कामाचे क्षेत्र निवडले ते देखील Social Work चे मतिमंद मुलांबरोबर मी १० वर्षे काम केले. नंतर तरुण मुले आणि कुटुंबे. त्यात अमेरिकन समाजाच्या अनेक भल्या - बुऱ्या बाजू पाहायला मिळाल्या. त्यातले मनाला भिडलेले अनुभव माझ्या लेखनीतून उतरले आहेत. भारतातून अमेरिकेत आल्यावर जे वेगळेपण जाणवले, ज्या ठेचा लागल्या, नव्या जाणिवा आल्या, त्याही लेखनात आल्या आहेत. पूर्वेच्या निष्ठा आणि संस्कार जेव्हां पश्चिमेवर येऊन आदळल्या तो झंझावात देखील त्यात दिसतो.

या सगळ्यात मला जाणवले ते जग हे सतत बदलतेच आहे. दोन पिढ्यांमध्ये अंतर पडणारच आहे. बदल हा चांगला ही नसतो की वाईट ही नसतो. तो 'अपरिहार्य' असतो. आणि माझ्या मते आपण जे बदलू शकत नाही त्याला आनंदाने सामोरे जावे. निदान प्रयत्न तरी करावा.

माझे आजोबा माझ्या लहानपणी म्हणायचे, "आजकालच्या मुलांना शिस्त नाही. मोठ्यांचा आदर कसा करायचा ते कळत नाही." साठाव्या वर्षी आज माझ्या ही मनात तोच विचार येतो. मग काय बदललं हो इतक्या वर्षात ? तुम्हीच सांगा मला.

आताची खेळणी बदलली आहेत. कंप्युटरमुळे जग जवळ आले आहे. पण Facebook वर १०० लोकांशी एकाच वेळी गप्पा मारणारी मी खूपच एकाकी झालेय्. कारण प्रत्येक जण आपल्या आयुष्यातच गुंतलाय्. 'चहा प्यायला' यायला आणि शिळोप्याच्या गप्पा करायला कोणालाच वेळ नाही. We have become very lonely in a very crowded society. जग बदलतय्, पण माणूस कसा बदलणार ? तो मुळातच 'Social animal' आहे ना!

हे झपाट्याने बदलणारे जग ज्या वेगाने पळतेय् त्या वेगाने मला पळता येत नाहीय्. त्यामुळे होणारी फरफट जाणवते आहे. मानसिक आणि शारीरीक दोन्हीही. वडील माणसे, आजोबा आणि समवयस्क सर्वांनाच 'अरे-तुरे'ची भाषा वापरली जाते. 'अहो' म्हणून आदर वाढतोच असं नाही पण अरे-तुरे ने तो वाढत नक्कीच नाही.

'मॉडर्न' म्हणवून घेण्याच्या नादात आई वडील देखील आपण मुलांचे मार्गदर्शक

आहोत - मित्र नाही - हे विसरतात असं मला वाटतं. मानापमानाच्या कल्पना कधी बदललेल्या दिसतात तर बहुधा नष्टही झालेल्या दिसतात. आपल्या मुलांना खूपच सुविधा उपलब्ध आहेत. कधी कधी 'अति तेथे माती' होते देखील, कष्ट न करताना मिळाले त्या गोष्टींची किंमत जाणवत नाही हे मात्र खरे.

लग्ना आधी मुलामुलींनी एकत्र राहणे, मला तरी योग्य वाटत नाही. लग्नाविना देखील नाही. तसेच लग्नानंतर लगेचच घेतलेली फारकत ही मला समजत नाही. समलिंगी स्त्री-पुरुष पुरातन कालापासून एकत्र राहात आले आहेत. पण त्यांना आपल्या समाजाने जाहीर मान्यता दिली नाही. तो 'विवाह' म्हणणे मला योग्य वाटत नाही. कारण विवाह हा एक स्त्री आणि एक पुरुष यांचा असून त्याचे प्रमुख कारण प्रजोत्पत्ती आहे असे समाजशास्त्र म्हणते. या माझ्या मतांमुळे माझ्या मुलांच्या उदारमतवादी समाजात मी सामावून जात नाही. पण तरीही मी आपल्या मतांशी प्रामाणिक राहते.

सर्वांना वाटते की "स्त्री" खूप स्वतंत्र झाली आहे. हे खरं आहे की ती सुशिक्षित आहे. कमावती आहे, capable आहे, पुरूषाच्या खांद्याला खांदा देऊन उभी राहिली आहे. स्वतःचा व्यवसाय आणि कुटुंब सांभाळते आहे, पण संसाराचा गाडा एका चाकावर भक्कम उभा राहू शकत नाही. त्याला दोन्ही चाकांची तेवढीच गरज आहे. त्यामुळे मला वाटतं की Your freedom ends where somebody's nose begins! वैयक्तिक स्वातंत्र्यापेक्षा कुटुंबाचे Wellbeing जास्त महत्त्वाचे असावे.

थोडक्यात एवढेच सांगावेसे वाटते की जे मनाला भावते ते आयुष्यात सामावून घ्यावे. मग ते नवे असो वा जुने. आपण आपला देश सोडून या नव्या जगात स्वेच्छेने आलो आहोत. मग घाबरायचे कशाला? आपली पिढी आहे Tossed Salad सारखी. आपली भाजी कच्ची आहे - raw - तिचा रंग, गंध, स्वाद तसाच राहिला आहे. वेगळे आहे ते विचारांचे Salad dressing. पुढची पिढी आहे American Stew सारखी. भाज्या शिजल्या आहेत, त्या एकरुप झाल्या आहेत. American melting pot मधल्या ह्या स्ट्यूचं कौतुक वाटतं. Who knows - कुणास ठाऊक? तो पचायला सोपाही असेल. निदान तशी आशा तरी करु देत! ह्या मिश्र समाजातील आपली नातवंडे जास्त समंजस असतील, जास्त सहनशील असतील. आमच्या पेक्षा अधिक सहिष्णू ही! Let us hope so!

सौ. मोनाली मोहन फाटक

************

# अनामिका परदेशी

**स**मोर दिसणारी कोर्टाची इमारत लक्ष वेधून घेणारी होती. चकचकीत दगडांनी मढवलेली मोठी इमारत! समोर दिसणारे मोठे खांब कोर्टाच्या भव्यतेत भर घालीत होते. सगळचं कसं स्वच्छ, सुबक आणि टापटीप. कोर्टाला लागूनच एक छोटीशी बाग होती. हिरवेगार लॉन-हिरवळ- आणि त्यात लाल-पिवळी फुले! कुठे दिसणारे निळे जांभळे हायासिंथचे तुरे! स्प्रिंगची - वसंताची नुकतीच सुरवात होती. त्यामुळे सदा हिरवे असणाऱ्या पाईन वृक्षांना देखील तकाकी आली होती. बागेत लोकांना बसायला सिमेंटचे बाक ठेवले होते. त्यावर काही निरुद्योगी माणसे बसली होती! - पेपर वाचत, ऊन खात! कुणी कोर्टात येणाऱ्या जाणाऱ्यांची "ये जा" पाहात होते, तर कुणी आपली 'केस' न्यायाधिशासमोर जायला वेळ होता म्हणून अस्वस्थपणे येरझारा घालीत होते. कोपऱ्यातल्या एका बाकावर दोघी तिघी बायका "Thank god it's lunch time! It's been a crazy morning" असे म्हणत घरून आणलेले brown paper bag मधले सँडविच खात होत्या. सुटाबुटातले वकील आपापल्या अशीलांबरोबर विचार विनिमय करीत होत; तर काही आपल्या सहकाऱ्यांबरोबर खटल्यांबद्दल, न्यायाधिशांच्या पक्षपाती वृत्तीबद्दल नाराजी व्यक्त करीत होते. कोर्टाच्या डाव्या बाजूला एक कोपऱ्यात चार पाच बायका आणि तीन-चार पुरूष 'सिगरेट' ओढत उभे होते. कोर्टात सिगरेट ओढायला परवानगी नव्हती म्हणून!

ह्या कोर्टाच्या प्रशस्त पायऱ्या उतरताना "तिला" आपल्या मनावरचे एक मोठे दडपण उतरते आहे याची जाणीव झाली, चेहऱ्यावरच्या आठ्या मावळल्या होत्या. तिच्या प्रफुल्ल हसऱ्या चेहऱ्यावर नुकत्याच कापलेल्या आणि रंगवलेल्या केसांच्या बटा स्वैरपणे विखुरल्या होत्या. मनात वाढत जाणाऱ्या विचारांचा वेग तिच्या पावलांना आला होता, विलक्षण उत्साहात ही पन्नाशी ओलोडून गेलेली बाई टणाटणा उड्या मारीत कोर्टाच्या पायऱ्या का उतरते आहे, हा प्रश्न चेहऱ्यावर उमटलेले काही त्रयस्थ चेहरे तिच्याकडे कुतूहलाने पाहात होते. त्यातल्याच एक मिश्किल सद्गृहस्थाने तिला ओरडून विचारले, "अरे वा! तू आज खूपच खुशीत दिसते आहेस, तुला तुझे भाग्य सापडले वाटतं? अभिनंदन !" असे म्हणत त्याने एक

उडत चुंबन तिच्याकडे फेकले. "ती" ही प्रसन्नपणे हसली, चार पायऱ्या परत चढली आणि त्या अनोळखी माणसाजवळ जाऊन म्हणाली, "तुझ्या शुभेच्छांबद्दल मी मनापासून तुझे आभार मानते. खरोखर मी आज खूप आनंदात आहे. कारण सांगू का? कारण मी आज 'मुक्त झाले आहे. मुक्त !' असे म्हणून तिने त्याच्या हाताचे हलकेच चुंबन घेतले आणि ती पायऱ्या उतरली.

कोर्टासमोरच्या 'मीटर' वर तिने गाडी लावली होती. गाडीत बसल्यावर मात्र न राहवून तिने आपल्या पर्समधून एक कागद बाहेर काढला! त्या कागदावरचे नाव ती परत परत वाचू लागली - "अनामिका परदेशी!" स्वतःच्या आयुष्याचा सारा चित्रपटच तिच्या डोळ्यांसमोर उलगडू लागला. पुन्हा एकदा नव्याने !

......तीस वर्षांपूर्वी माहेरचा उंबरठा ओलांडून माणिक सासरी आली होती. त्या नव्या घराला 'आपलं म्हणायसाठी. 'माणिक' ची 'मंगला' झाली, 'जोशी'चे 'काणे' झाले आणि सौ. मंगला काणे नावाची एक नवीनच व्यक्ती जन्माला आली. पहिल्या वर्षीचे नव्या नवरीचे उलटे घातलेले मंगळसूत्र सुलटे व्हायच्या आतच तिचा भारताचा किनारा सुटला आणि तिने आपल्या नवऱ्याबरोबर अमेरिकेत पाऊल टाकले. तेव्हां देखील तिला उंबरठाच आठवला. माहेर सोडताना आईने सांगितलं होतं की सासरी अगदी एकरुप होऊन जा. आता तेच तुझे 'घर' आहे बरं! 'माझी आई असं करत नाही' ने सुरू होणारी वाक्ये बोलून दाखवू नकोस, सासरच्या लोकांच्या, नवऱ्याच्या कलानेच घे ! "पत्नी म्हणून, सून म्हणून आणि मुलांची आई म्हणून यशस्वी हो!" असे सांगताना वडिलांचा गळा दाटून आला होता. त्याच्या उलट भारताचा उंबरठा ओलांडताना सासरच्यांनी परत परत बजावलं होतं, "आपलं काहीही सोडू नकोस. अमेरिकेत मोह खूप असतील, पण आपली संस्कृती, आपले विचार, आपल्या चालीरीती सोडू नकोस. मुख्य म्हणजे आमचा मुलगा सांगेल तसंच जुळवून घे!" खरं तर किती दोन टोकांचे हे संदेश होते ! पण माणिकने त्या प्रमाणेच आपलं आयुष्य जगायचं ठरवलं. अर्थातच नवरा तर फारच खुश झाला. कारण त्याला अमेरिकेत देखील सर्व करुन जेवू घालणारी पत्नी मिळाली होती. आणि इतरांच्या रंगवलेले लांडे केस आणि मेकपच्या थरांत रंगलेल्या चेहऱ्यांच्या, शर्ट-पँटीतल्या बायकांमध्ये, साडी आणि लांब वेणी घातलेली 'आपली बायको' सात्विकतेचा पुतळा आहे. हा अभिमान - ego - होताच. मंगलही ते पाहून खुश व्हायची. त्याचे खुश राहणे हेच स्वतःचे कर्मकांड मानायची. घरी जेवायला आलेले पाहुणे, "वा! वहिनी, हल्ली पुण्या-मुंबईत देखील असा चार ठाव स्वयंपाक जेवायला मिळत नाही" असं म्हणायचे ना तेव्हां तर मंगल आनंदाने फुलून जायची. माधव आणि रवी हे नवऱ्याचे

खास दोस्त. दोघांची लग्ने झाली. चार महिन्यांनी नव्या नवऱ्याही आल्या. "वहिनी ! ही माझी पत्नी सरला ! सरल, ह्या माझ्या प्रिय मित्राची पत्नी तर आहेतच पण माझ्या खऱ्या वहिनीच आहेत हं !" असा भाव माधवने दिला तर रवी, "माझ्या खऱ्या वहिनीपेक्षा जास्त प्रेम करणारी ही मंगल वहिनी" अशी ओळख आपल्या पत्नीला - जयाला - करून देत होता. मंगल ही हा नवा 'वहिनी' चा रोल मनापासून करू लागली.

पण हळूहळू सगळे चित्रच बदलायला लागले. चार मित्रांना बोलावून त्यांना जेवायला घालायला आणि गप्पा मारायला नवऱ्याला खूपच आवडे. त्यात गाण्याबजावण्यात ही स्वारीला खूपच रस ! आपल्याला 'गाणे' खूप समजते, आपण उत्तम गातो ही पूर्ण समजूत होतीच. त्यामुळे रात्रीची जागरणे साहजिकच व्हायची. मंगलला ही गाण्याची आवड होती. पण दोन छोटी छोटी मुलं आणि घरकामात इतर काहीच व्हायचं नाही. परत, "मंगल, सूर नीट लागत नाहीय्. देखे देखे लिया जोग ! घरे काया बढे रोग ! आनंदा रडतोय्. त्याला गप्प कर." अशी नवऱ्याची दाद ! त्याने मंगलने गाण्याचे नावच टाकले.

प्रत्येक शनिवार-रविवारी 'मैफली' जमायच्या, नवऱ्याचे मित्र जमायचे. त्यांच्या बायका बरोबर असायच्याच. मित्र म्हणायचे, "हनी, तू काही स्वयंपाकात लुडबूड करू नकोस. वहिनी इतक्या सुगरण आहेत की तुझी मदत त्यांचा स्वयंपाक बिघडवायची बघ ! तू आपली इथेच बस, त्यांच्याच हातचे जेवायचे आहे आम्हाला ! आणि स्वतःच्या बायकोला स्वतःपाशी बसवून ठेवायचे. मंगल मात्र एकीकडे रडणाऱ्या मुलीची समजूत काढून, पदर बांधून कामाला लागायची. नवऱ्याच्या ते कानीही नसायचे. तो आपला तंबाखूचा बार लावून टी.व्ही. वर चाललेल्या फूटबॉल वर स्वतःचीच commentary करत असायचा आणि भज्यांची प्लेट रिकामी आहे म्हणून त्रागा करायचा. "इतका वेळ कशाला ग् लागतोय, लवकर आण भजी" असा त्याचा पट्टीत लागलेला सूर ऐकून मंगल मनातल्या मनात आकडे मोजायला सुरवात करायची. हात मोजायचे ..... एक भजं, दोन भजी, तीन भजी ! चेहऱ्यावरचे उसने स्मित खरं तर मनातले भाव लपवण्यासाठी असायचे पण डोळ्यातले भाव त्याला टाचणी लावत. पण दुर्दैवाने (सुदैवाने ?) कुणाचंही तिच्याकडे लक्षही नसायचं.

मंगल मुलं लहान होती म्हणून नोकरी वगैरे काही करत नव्हती. नाही म्हणायला महिन्यातून एकदा ती शेजारच्या हॉस्पिटलमध्ये आजारी मुलांबरोबर voluntary काम करायला जायची. ती घरीच असते हे पाहून मैत्रिणीचे फोन येत, "मंगल, जरा काम होतं ग ! मला कामावर जायलाच हवं आहे ग ! आज माझी babysitter

नाही आली ग ! दीपूला तुझ्याकडेच सोडते आज हं !" तर कधी "अग, या शुक्रवारी रात्री potluck dinner साठी आमच्या कडे जमायचं आहे ना! तुझी मदत मी गृहीत धरली आहे. तू तुझ्या पुऱ्या करशील ना तेव्हांच माझ्या वाटणीची भाजी पण फोडणीला टाकशील ना? Thank you हं!" असं म्हणतच फोन बंद होई. अगं पण? देखील अर्धवटच सोडावं लागलं मंगलला! हो-नाही चा प्रश्नच आला नाही.

हळूहळू मुलं मोठी व्हायला लागली. थोरली कॉलेजला गेली. धाकटा हायस्कूलच्या शेवटच्या वर्षाला ! आणि हॉस्पिटलमध्ये चांगली संधी आली म्हणून इतक्या वर्षांचे सामाजिक कार्य 'नोकरी'त बदलले. Night school मध्ये जाऊन M.A. केलं आणि नव्या दमानं, नव्या जोमानं मंगलने नोकरी - career - म्हणायला हरकत नाही सुरू केली. नवऱ्याचं व्यवस्थित चालू होतं. तशातच मंगलचा पगार वाढतच होता. नवरा खुश होता. मंगल ही! त्यामुळे भारतातून येणारी खवचट पत्रे ती वाचून न वाचल्यासारखी करी, नवऱ्याने गेले वीस वर्षे स्वतःच्या आईचा संसार चालवला होता. भावांना मदत केली होती. त्यावर मोठ्या भावाचे पत्र आले होते, "तुम्हाला काय कमी आहे? एवढाले पैसे (अर्थातच डॉलर रुपयांत मोडलेला असायचाच) मिळवता. आम्हाला जी "चिल्लर पाठवता ती तर तुमच्या खिशात धोबिणीला सापडेल." नवऱ्याला हसू आले होते, तो मंगलला म्हणाला, "बघ, त्यांना माहिती आहे आपण खूप श्रीमंत आहोत म्हणून, हे तसंच ठेवायचं बरं !" मंगल विषण्णपणे हसायला लागली. साधं घराचे mortgage बिल देखील चाळीस हजार रुपये असं सांगावसे वाटायला लागायचं, बाकी इतर खर्च देखील तसेच. हे त्यांना कसं सांगणार? म्हणजे मंगलच गाढव ठरणार ना!

दोन्ही मुलं घराबाहेर पडली! होस्टेलवर राहायला गेली. अभ्यासात उत्तम प्रगती करीत होती. मुलगी वकीलीचा अभ्यास करत होती. मुलगा डॉक्टर होत होता. "आता तुम्हाला काय कमी? घर सुनं झालं असणार ! अरविंदाला उच्च शिक्षणासाठी पाठवतो." दादाचा फोन आला आणि नवरा आनंदला. मंगलला ही घरात 'जाग' आलीय् असं वाटायचं.

आणि एक दिवस सगळंच बदललं, नवऱ्याला कामावर काहीतरी चूक झाल्याने नोकरीवरून काढून टाकले. पन्नाशीच्या पुढच्या या परदेशी माणसाला नवी नोकरी मिळेना. मंगलने त्याची समजूत घातली, "अहो, काही काळजी करु नका. घर दोन-तीन वर्षांत pay off करु आपण. मुलं ही शिक्षण संपवतील. माझी नोकरी चालूच आहे. जेवायची चिंता नाही अगदी सगळं व्यवस्थित होईल बघा!" नवऱ्याला

ते भावलं नाही त्यातच त्याला stroke आला. त्यातून उठला ते wheelchair मध्येच ! मंगलचे धाबे दणाणले होते. त्यात भर पडली होती सासरच्या नकाराच्या पत्रांची. मदत राहिली बाजूला पण 'आता आमच्या भावाचं कसं होणार ?' ची काळजी रडतच केलेली असायची. मंगलला 'तुला काय मदत हवी ?' असं विचारणं तर राहिलं दूरच, पण साधी प्रेमाची दोन वाक्य ही लिहिली नव्हती कधी. मंगल इतकी वर्षे झाली तरी सासरच्या मंडळींची ही वृत्ती समजू शकली नाही, ना तिची प्रिय मैत्रिण सांगे तशी ignore ही करु शकत नव्हती. प्रत्येक वेळी मंगल तितकीच कष्टी होई. वारंवार त्यांची होणारी पैशांची मागणी ती पुरी करू शकत नव्हती. कारण नवऱ्याची तब्येत ढासळतच चालली होती. त्याचं सर्वच मंगलला करावं लागे. हॉस्पिटल मधली नोकरी देखील सोडून द्यावी लागली होती. काय करणार ? घरात दुसरं कुणीच नव्हतं, त्याची काळजी घ्यायला. घरावरच मोठे कर्ज काढावे लागले होते घर चालवायला. पोटात खड्डा पडला होता पण तिने ते मुलांनाही सांगितले नव्हते. जमेल तसं ती निभवीत होती.

अचानक ध्यानी मनी नसताना नवऱ्याला Heart Attack आला आणि तासाभरात सगळा खेळ खतम झाला. मुलगा मदतीला आला तो देखील जेनीला बरोबर घेऊनच, मित्रमंडळ भेटायला आलं खरं पण भट म्हणतात तसेच, "काढत्या पायासवे"..... ! सगळे विधी झाले आणि मुलाने बॉंबगोळा टाकला, "मॉम, आम्ही लग्न केले आहे." मंगलला काय म्हणायचे तेच समजले नाही. मुलं आली तशी निघून गेली. सासरचं कुणी आलंही नव्हतं ना त्यांचा निरोप आला होता.

नंतरचे सारे सोपस्कार मंगलने एकटीनेच केले. कर्ज फेडले खरे पण त्यात घरच गेले. सगळी बांधाबांध, विक्री करण्यात महिना कसा गेला ते कळले ही नाही मंगलला ! शेवटी एक दिवस अशीच बसली होती ती 'पुढे काय' चा यक्षप्रश्न घेऊन ! पोस्टमनने हॉर्न वाजवला आणि उतरुन येऊन तिच्या हातात एक पत्र आणून दिले. मायदेशाहून आलेले म्हणून ! मंगल नुसतंच त्या पत्राकडे पाहात होती. उघडायचं तरी कशाला ? - पण उघडलंच तिने ! पत्रावर "श्री" नव्हताच, पण मायनाही नव्हता, तिच्या नवऱ्याच्या मृत्यूला तीच कारणीभूत होती असे सासरच्यांनी निदान केले होते. मुलांना नीट वळण लावलं नाही म्हणून परधर्मी सून घरात आली. त्याने घराण्याला कलंक लागला आहे असे मत कळवले होते आणि "या पुढे आमच्याशी कुठलाही संबंध ठेऊ नये - तुम्ही आम्हाला मेलात" असा निरोप दिला होता.

मंगलने ते पत्र परत एकदा वाचले. वाचताना तिला एकेक आठवू लागलं.. .. .. ..नवऱ्यासाठी खाल्लेल्या खस्ता, त्याच्यासाठी रात्ररात्र केलेली जागरणं, त्या

अंथरूणातून उठवण्यात आणि परत झोपवण्यात दुखवून घेतलेली स्वत:ची कंबर, पैशांचा उरवठा-पुरवठा करण्यात राहतं घरच गमावल्याचं दु:ख, आणखी खूप काही! जन्मभर ज्याच्यासाठी हे केलं तोच आता गेला होता. त्यानं आलं होतं विलक्षण एकटेपण ! मंगलला वाटलं की हे आता कशासाठी सहन करायचं? इतक्या वर्षांत एक दिवस देखील तिला स्वत:साठी जगता आलं नव्हतं! आधी मुलगी म्हणून, नंतर बायको म्हणून ! मुलांची आई म्हणून, सून म्हणून, तर कधी कुणाची वहिनी होऊन, "कोणाची कुणीतरी!"

सगळ्याचा मंगलला अगदी वीट आला होता. "आता यापुढे मी स्वत:साठीच जगणार !"- मंगल स्वत:शीच पुटपुटली. तिने खोलीत जाऊन एक कागद पुढे ओढला आणि पत्र लिहिण्यास सुरवात केली. "आपले पत्र मिळाले. माझा नि आपला जो दुवा होता तोच आज या जगात नाही. त्यामुळे तुमचे-माझे संबंध संपलेलेच आहेत. त्यामुळे तुमच्याशी संबंध ठेवण्याची यापुढे वेळच येणार नाही. तरी देखील मी तुमच्या या इच्छेला मी मान देईन!" - पत्राची घडी घालून, पाकीटावर पत्ता लिहून तिने ते पत्र पोस्टात टाकले.

दुसऱ्याच दिवशी तिने स्वत:चे नाव बदलण्याकरिता कोर्टात अर्ज केला. मंगल स्वत:लाच सांगत होती, "आजपासून मी स्वत:साठी जगणार आहे. "मी" म्हणून. मी माणिक नाही आणि मंगलही नाही, जोशी नाही की काणे नाही. आज मी भारतीय ही नाही की अमेरिकन ही नाही. मी आज या सगळ्यातून मुक्त झाले. मी आहे अनामिका परदेशी!

हातातला कागद परत वाचून ती मोकळपणाने हसली आणि स्वत:लाच म्हणाली, "अनामिका परदेशी ! अभिनंदन !


सौ. मोनाली फाटक.

3399 Roxbury RoadS Hat field,

Pa. 19440.U.S.A.

**email - mmphatak@hotmail.com.**

************

# तत्वनिष्ठ लेखक : अशोक सबनीस



**ते** साल मला वाटतं १९७० असावं. आमचे साडू जयंत ताम्हणे यांचा फोन मला आला मुंबईहून. त्यांनी सांगितलं की त्यांचा भाचा अशोक न्युयॉर्कला नोकरीसाठी येत आहे आणि त्याची जरा कुठे सोय करा.

त्या कालांत आता सारखे ढीगभर काका मामा विखुरलेले नव्हते. नेमकीच मराठी कुटुंबे होती आणि जवळच्या नात्याचं तर कुणीच नव्हतं. ओळखीपाळखीनं मुलं यायची. आठ डॉलरचा "भत्ता" घेऊन! इथं आल्यानंतर नोकरी शोधायची आणि एक बेडरूमची जागा घेऊन चार पांच दोस्त मंडळी एकत्र राहायची.

अशोकला मी बऱ्याच वर्षात पाहिलेला नव्हता. दरवाजा उघडला तर समोर भलामोठा उंचापूरा लोखंडाच्या पट्टीसारखा , गोराभरभरीत सहा फूटाचा जवान पाहिल्यावर मी च्याटच झालो.

"मी अशोक सबनीस. जयंताचा भाचा. भाई तुम्ही मला ओळखलेलं दिसत नाही. बऱ्याच वर्षांनी आपली भेट होतेय."

"हो हो..बऱ्याच वर्षानंतर .."

अशोक आणि त्याचा भाऊ विकास यांना मी सहा सात वर्षाचे असताना अर्ध्या चड्डीत पाहिलेले दादरच्या मिरांडा चाळीत. दोन्ही भाऊ टंगाळे आणि खोडकर. त्यांत अशोक जास्त खट्याळ! चाळीच्या जीन्यावरून सारखा धिंगाणा चालू असायचा. त्यांचे वडील- लक्ष्मणराव गच्चीत खुर्चीतबसून वाचनांत मग्न असायचे आणि आई घरांत कामांत गुंतलेली असायची. या पोरांच्या दंग्याला त्रासून ती माऊली त्यांना चाळीतील टोकाच्या कर्णिकांच्या घरी पिटाळायची. त्यावेळी या दोघांचा काढलेला एक जुना फोटो अद्याप माझ्या संग्रहात आहे.

'तोच तो मी अशोक सबनीस' सांगणारा अशोक, आज ब्रुकलीनला माझ्या घरी, समोर उभा ठाकला होता. डोक्यावर मस्त बंडखोर भरपूर केस आणि पोषाख म्हणजे निळी फ्लॅनलची पँट आणि ब्राऊन कलरचा शर्ट !

बराच वेळ गप्पा झाल्या. मुंबईची वास्तपुस्त झाली. अंतर कमी झालं. जुन्या

आठवणींची उजळणी खडीसाखरेसारखी असते. जितकी चघळावी तितकी जास्त जास्त गोड लागते नाही कां ?

आमच्या जवळच रॉजर्स अव्हेन्यूला अशोकनं अपार्टमेन्ट घेतलं. पडवळ, खानोलकर, सावंत आणि भाल गुजर असे चार आर्किटेक्ट मित्र त्याच्याच बरोबर मुंबई म्युनिसिपालिटीत बरोबर कामाला होते. ते पण अमेरिकेला ग्रीनकार्ड घेऊन आलेले होते. हे सर्व एकत्र राहू लागले.

मला एकदा त्यांनी त्यांची जागा बघायला बोलावले.

मी खोलीत शिरलो. बैठकीच्या खोलीत पुस्तकं आणि वर्तमानपत्र पडलेली अस्ताव्यस्त. एक सेंटर टेबल आणि बाजूला रायटिंग टेबल. त्यावर टेलिफोन आणि पत्यांचे नोटबुक. दोन बाजुच्या खुर्च्या आणि एक जुना सोफा.

मी सोपऱ्यावर टेकलो नाही तोच अरविंद पडवळ कमरेला टॉवेल, खांद्यावर छोटा नॅपकिन आणि हातांत चहाचे दोन कप घेऊन प्रवेश करता झाला. त्याची एन्ट्री म्हणजे दादरच्या मामा काणेंच्या हॉटेलातल्या पोऱ्यासारखी मला वाटली.

"घ्या, भाई चहा घ्या. तुम्ही अरविंदला ओळखतांच! मागच्या रविवारी आमच्याबरोबर जेवायला आला होता तुमच्या घरी. तो आमचा बबर्जी आहे इथला. झकास जेवण बनवतो."

"अरे वा..आलं पाहिजे एकदा अरविंदच्या हातचं खायला."

भांडी घासण्यापासून ते स्वैपाक करण्यापर्यंत सगळं शिकावं लागलं या मुलांना. तिकडून येणाऱ्या आपल्या मुलांना याचा सराव नसतो. कारण ही कामं करायला मोलकरीण असते आणि जेवण करून घालायला आई असते. पुढं ही मुलं नोकरी धंद्यात स्थिरावली. त्यांची लग्न झाली आणि संसारी बनली.

असा हा आमचा खट्याळ अशोक न्युयॉर्क नगराच्या म्युनिसिपल कार्पोरेशन मधून प्रमुख आर्किटेक्ट म्हणून २००४ साली निवृत्त झाला. त्याची पत्नी 'रत्ना' स्त्रीरोग चिकित्सक डॉक्टर म्हणून अद्याप प्रॅक्टीस करत असते.

मुलगा डॉक्टर आहे आणि मुलगी लग्न करून संसारात गुंतली आहे.

निवृत्तीनंतर अशोक स्थानिक राजकारणांत भाग घ्यायला लागला आणि २००९ सालांत डेमाक्रेटीक पक्षाच्या तिकीटावर न्युयॉर्क मधील मिडलटाऊन या गावांतून Alderman (याने आपला नगरसेवक) म्हणून निवडून आला. त्याचे धाकटे बंधुराज 'विकास सबनीस' प्रसिध्द राजकीय व्यंगचित्रकार म्हणून भारतांत नावारूपास आले.

अशोकशी बोलताना अनेक विषय चर्चीले जायचे. अर्थात त्याच्या लिखाणाच्या सुरवातीपासून आतापर्यंत, त्याची एक चांगला लेखक म्हणून जी प्रसिध्दी झाली त्याची वाटचाल अशोकच्या शब्दांतच ऐका.

**लिखाणाची पार्श्वभूमी :**

लहानपणापासून वाङमयाचे संस्कार घडले. वडील लेखक व कवी असल्यामुळे घरात वाङमयावर चर्चा चालायची.आजी शिकलेली नसली तरी ती शीघ्र कवी होती. घरचं काम करत असताना, ओव्यातून बोलायची, अगदी बहिणाबाई चौधरींसारखी. आम्हीच कमनशीबी की आमच्या कडे कोणी सोपानदेव चौधरी झाले नाहीत. आई गाढ वाचक होती. तीनेच वाचनाची आवड लावली. हाती आलेलं पुस्तक झटक्यात संपवायचं, हा छंद लागला. पुस्तकाला विषयाच बंधन नसायचं, रामायण, महाभारत, कथा कल्पतरूंपासून, कथा, कादंबऱ्या, निबंध, नाटकं, कविता, चरीत्र, टीका, कुठलाही प्रकार सुटला नाही. दादर मध्ये रहात असल्यामुळे आणि शिवाजी पार्क, अमर हिंद मंडळ, स्मशानभूमी ही क्षेत्र जवळ असल्यामुळे, निरनिराळ्या वक्त्यांची, निरनिराळ्या विषयावरची भाषणं ऐकायची आवड निर्माण झाली. भाषण हा एक जीवंत साहित्यप्रकार आहे ह्यात काय शंका ? ह्या सर्व गोष्टींमुळे माझ्या मनावर चांगलं साहित्य काय असतं ह्याची खात्री झाली. पण हातातून काही लिहीलं गेलं नाही.

हातातून लिहीण्याची सुरवात पण गमतीनं सुरू झाली. त्याला १९७० साल उजाडायला लागलं. त्या साली मी अमेरिकेत आलो आणि घरी पत्र लिहायला लागलो. ती एक गरज होती. तोच माझ्या लिखाणाचा श्रीगणेशा! ती पत्रं घरच्या लोकांना खूप आवडायची व त्या पत्रांचे आमच्या नातेवाईक, मित्रमंडळी, शेजारीपाजारी ह्यांच्यामध्ये सर्क्यूलेशन सुरू झालं. ह्याची मला कल्पना नव्हती, पण मग ही बाहेरची माणसं जेव्हा मला पत्र लिहायची, तेव्हा ती त्या पत्रांचा उल्लेख करायची. तेव्हा मला कळलं की माझी पत्र खाजगी राहिलीच नाही. इतरेजणं वाचतात म्हणून मी ती जास्त काळजी पूर्वक लिहीत गेलो. ती वाचनीय व्हावीत, सगळ्या कुटुंबीयांना वाचण्याजोगी व्हावीत म्हणून मग मी ती जास्त जाणीव पूर्वक लिहीत गेलो.

त्याच काळांत, न्यूयॉर्क च्या महाराष्ट्र मंडळात, सेक्रेटरीचं पद सांभाळता, सांभाळता, पत्रक लिहायचं काम आलं. ती पण एक गरज होती. त्या वेळेस मला बऱ्याच लोकांनी माझी पत्रकं आवडल्याचे सांगितलं.

१९८१ साली महाराष्ट्र मंडळ, न्यूयॉर्कने एकता त्रैमासिकाचा न्यूयॉर्क विशेषांक काढायची जबाबदारी घेतली. मी काहीतरी लिहावं म्हणून त्यांनी माझा पाठपुरावा केला. कदाचित, त्यावेळेस मी प्रथम अधिकृत लिहीलं असेल. 'संयुक्त संस्थानातलं पहिलं मराठी नाटक' हा लेख आणि एकाच लेखकाचं एकाच अंकात दोन लेख नसावेत हे स्वतःच घातलेलं बंधन पाळण्यासाठी 'मैफील' ही कथा बायकोच्या नांवावर लिहीली. अश्यारितीनं गरजेपोटी मी लिहू लागलो. 'गरज ही शोधाची जननी असते!' असं म्हणतात. माझ्यांतला लेखक शोधण्याचं काम ह्या गरजेनी केलं आहे. न्यूयॉर्कला मागे

एकदा, सौ. रेणू दांडेकर म्हणून एक महिला भारतातून आल्या होत्या. त्या व त्यांचे पती श्री. राजा दांडेकर ह्यांनी अत्यंत अडचणीतून जाऊन, लोकमान्य टिळकांच्या जन्मगांवी, चिखलगांवी एक शाळा काढली. त्याच्यावरच्या अनुभवावर त्यांनी लिहीलेल्या पुस्तकाला – 'रुजवाला' – प्रसिद्धी मिळावी ह्या गरजे मुळे, त्यांच्या पुस्तकावर मी एक परिक्षण लिहीलं. ते बृहन् महाराष्ट्र वृत्तात छापून आलं होतं.

माझ्या सुदैवाने माझ्या आयुष्यांत मला खूप चांगली माणसं भेटली. आयुष्याच्या निरनिराळ्या टप्प्यावर, एखाद्या दिपस्तंभासारखा त्यांचा मला सहारा मिळाला. त्यांच्या आठवणी ह्या मी व्यक्तिचित्राच्या किंवा कथेच्या रूपाने चित्रित केल्या. 'मास्तर', 'बाळासाहेब', 'दोन अनामिक', ही व्यक्तिचित्रे आणि 'अभोगी' ही कथा ह्याची ती प्रतीक आहेत. गो.नी. दांडेकर आणि कॉ. डांगे ह्यांच्या भाषणांनी व लिखाणांनी माझ्या व्यक्तिमत्वावर खूप प्रभाव पाडला. त्यांच्यावर लिहीलं नसतं तरच नवल. 'मला दिसलेले गोनीदा' आणि 'लाल भारताचा हिरवा दिवा' हे दोन लेख हा केवळ औपचारीकपणा नव्हता.

लघुनिबंध ही फडक्यांनी मराठी भाषेला दिलेली अमोल देणगी आहे. तरीही प्रा. अनंत काणेकरांचे लघुनिबंध हा माझा आवडीचा विषय होता. माझ्या लिखाणावर त्यांचा परिणाम न होणं कसं शक्य होतं? 'दाढी कातरलेला शिख' आणि 'व्हिडीयो, एक फितवणूक (फसवणूक)!' मधला बन्याबापू खर्डिकर हा 'कॉमन मॅन' मला त्यांच्या लघुनिबंधांत गवसला.

खोडकरपणा हा तर माझ्या जन्मापासून चिकटलेला (अव)गुण. समाजांत दिसलेल्या व्यंगावर न लिहीन तरच नवल. घर बांधल्यावर पैशात बचत करण्यासाठी, घराचं तापमान कमी ठेवण्याची शर्यत बऱ्याच लोकांत असते, त्याच्यावर लिहीलेला एक लेख, 'घर पहावं उबवून' आणि स्वत:चे पैसे खर्च करून पुस्तकं छापायची आणि मग ती विकण्याचा केविलवाणा प्रकार करणारी मंडळी बघून त्यांच्यावर लिहीलेला, 'मी पुस्तक छापतो' हा लेख, किंवा नाटकं बसविता, बसविता, खेळलं जाणारं राजकारण उघडकीला आणणारा, '..आणि नाटक बसतं' हा लेख, कोणाला नांवं ठेवू नयेत असं म्हणतात, पण काही नांव अशी असतात की ती घेतल्यावर हसुं आल्याशिवाय रहात नाही, त्याच्यावर लिहीलेला लेख – 'नांवांत काय आहे?', कुत्रा पाळणारी माणसं, त्यांच्या कुत्र्यांवर एवढं प्रेम करतात, की दुसऱ्या माणसांच्या चष्म्यातून ती विनोदी वाटतात, त्यांच्यावर लिहीलेला, 'कुत्रा पहावा पाळून!' ही त्याची उदाहरणं आहेत.

काही गोष्टी ह्या मला सत्य स्वरूपात भेटल्या. त्याच्यातलं कारूण्य हे मला सतत भेडसावीत होतं. सत्य हे कधी कधी कल्पनेपेक्षाही अद्भूत असतं आणि ते लिहील्याशिवाय चैन पडत नसतं. लिहीणं हे तसच आहे. एखादी गोष्ट आपल्याला

भावली आणि ती आपल्यात रुजली की ती लिहील्याशिवाय चैन पडत नाही. 'जगन्नाथाचा रथ' आणि 'मादी' ह्या कथा त्यांत मोडण्यासारख्या आहेत.

मराठी गद्य वाङ्मयाबरोबर मला कवितांची सुद्धा गोडी होती. मराठी भाषेतले पहिले नवकवी म्हणून ज्यांचा गौरव आजही करता येईल व ज्यांच्या कविता आजच्या काळालाही लागू होतील, विशेषत: 'नवा शिपाई.' त्या केशवसुतांच्या कवितांनी माझ्या व्यक्तिमत्वावर निश्चित परिणाम घडवला. पुढे माझ्यावर साम्यवादाचा जो प्रभाव पडला त्याची बिजे केशवसुतांच्या कवितांमुळे पेरली गेली, असं म्हटलं तर ते वावगं होऊ नये. 'नव्या मनुची..' ह्या माझ्या कवितेवर केशवसुतांचा प्रभाव पडला आहे असं मला वाटतं. आधुनिक कवींमध्ये विंदा करंदिकर आणि मंगेश पाडगांवकर हे माझे दोन आवडते कवी. 'एक दिवस असा येतो..' ह्या कवितेवर विंदांची छाप पडली आहे. मराठी कवितेला वात्रटिकांची झालर, मंगेश पाडगांवकरांनी लावली. विशेषता 'एक होता..' च्या त्यांच्या वात्रटिका खूपच गाजल्या. त्यांचा माझ्या सारख्या वात्रट माणसावर परिणाम न होईल तरच नवल! माझ्या हातून ज्या वात्रटिका लिहील्या गेल्या त्याचा तो परिणाम आहे. बा.भ. बोरकर ह्यांच्या कविता अजूनही मी पुन्हा, पुन्हा वाचतो. तो माझा एक विरंगुळा आहे.

वर निर्देशीत केलेल्या साहित्यिकांचा माझ्या लिखाणावर खूप परिणाम झाला असला, तरीही मी स्वत:ला साहित्यिक समजत नाही.

गरजेमुळे मी लिहायला लागलो. घरच्या संस्कारांनी, वाचनाच्या आवडीने, सूक्ष्म निरीक्षणशक्तीनी आणि लोकांच्या आग्रहानी मी मधून, मधून पांढऱ्यावर काळं करतो."

असा हा आमचा मित्र अशोक सबनीस. स्वत:ला जरी 'वात्रट' म्हणून उपाधी लावून घेत असला तरी तो निर्णायक तत्वनिष्ठ आहे. त्याचे विचार जरी पक्के बुध्दिवादी असले तरी ते तर्कट नाहीत. त्याच्या लिखाणांत आणि बोलण्यांत संयम आहे. लिखाणा बरोबरच अशोकला वक्तृत्वाची देणगी आहे. संभाषण चातुर्य आणि अमर्याद स्मृतींचा ठेवा याचा पडताळा त्याच्या निकटवर्तीयांना नेहमी आला आहे. न्युयॉर्क मराठी मंडळ असो किंवा महाराष्ट्र फाउंडेशन असो अथवा बृहन् महाराष्ट्र अधिवेशन असो, अशोक सबनीसांचा ज्या ज्या संस्थांशी संबंध आला त्या त्या संस्थांना त्यांनी प्रामाणिकपणे केलेले सहाय्य निर्भेळ आणि नि:स्वार्थीपणाचे होते.

मन जागं ठेवणाऱ्या जीवंत माणसांतील एक..अशोक सबनीस !

शब्दांकन : दिवाकर कारखानीस ह्युस्टन
email : dkarkhan80@gmail.com

# बाळासाहेब

मुंबईला आम्ही जेथे रहात होतो, त्या आमच्या चाळीच्या सार्वजनीक खिडकीचे एक प्रकारे वाटपच झाले होते. दुपारी बारा वाजल्या नंतर चाळीतल्या बायका घरातली कामं संपल्यावर जमायच्या त्या दुपारी तीन-चार वाजेपर्यंत तेथे असायच्या. मग शाळेतल्या मुलांचा गोतावळा तेथे जमायचा तो जवळ जवळ सहा वाजेपर्यंत. सहा वाजल्यानंतर पुरुष मंडळी कामावरून परत आल्यावर खिडकीचा ताबा घ्यायची. तो त्यांचा मुक्काम नऊ, साडेनऊ वाजेपर्यंत असायचा. नाही म्हणायला, सकाळी बारा वाजेपर्यंत ती खिडकी थोडी फार काय ती रिकामी असायची तेवढीच. पण हल्ली हल्ली सकाळच्या सुमारास बाळासाहेब खिडकी जवळ उभे असायचे.

बाळासाहेब म्हणजे गुप्तेकाकींच्या मोठ्या नणंदेचा मुलगा. म्हणून त्या त्यांना अशी साहेबी उपाधी लावून हाक मारायच्या. तेच नाव चाळीने त्यांच्यासाठी मुक्रर केले आणि बाळासाहेब, चाळीचेच बाळासाहेब झाले.

तसं बघितलं तर बाळासाहेबांकडे साहेबी बाणा मुळीच नव्हता. भुलेश्वरच्या कोठल्यातरी मारवाड्याकडे बाळासाहेब मुनिमाचं काम करीत व त्या व्यवसायाला शोभेल असाच त्यांचा पेहेराव असायचा. खाली पांढरा स्वच्छ इस्त्रिबंद लेंगा, अंगात रेशमी झब्बा व त्यावर करड्या रंगाचे खादीचे जाकीट, डोक्यावर मागे वळवलेले कुरळे केस, पायांत चकचकीत बूट, अन् तोंडात पानाचा तोबरा.

बाळासाहेब नोकरी निमित्त मुंबईला आपल्या मामांकडे म्हणजे गुप्तेकाकांकडे रहायला आले होते. ते ज्या मारवाड्याकडे काम करायचे त्याचे दुकान सकाळी अकरा वाजल्याशिवाय काही उघडायचे नाही आणि ते रात्री नऊ वाजेपर्यंत चालायचे. बाळासाहेब सकाळी दहा वाजता बाहेर कामावर जात असत, ते रात्री दहा साडेदहा नंतर कधी तरी घरी येत. मग जेवून, बाहेरच्या व्हरांड्यांत झोपत असत.

सकाळच्या वेळी, त्या एकखणी खोलीत, मामींच्या कामांत उगाच व्यत्यय येऊ नये म्हणून पानाचा तोबरा तोंडात ठेवून, त्या खिडकीतून बाहेर, रस्त्याकडे बघत बसण्यात बाळासाहेब वेळ काढीत असत. तसे बाळासाहेब कोणांत मिळून मिसळून वागत नसत. खिडकी जवळ जरी उभे असले आणि कोणी येणाऱ्या जाणाऱ्या माणसांनी विचारलं, “काय बाळासाहेब, कसं काय आहे?” तरी सुद्धा पानाचा

तोबरा भरलेल्या तोंडाचा चंबू करून, डाव्या डोळ्याची भुवयी वरती चढवून, मानेनेच ठीक आहे असं दाखविण्या पलीकडे ते काही बोलत नसत.

दरवर्षी आमच्या चाळीत सार्वजनिक सत्यनारायणाची पूजा होत असे. त्यात सगळी चाळ उत्साहाने भाग घेत असे. एका वर्षी तर, जेव्हां रमण्णाचं लग्न झालं त्या वर्षी, रमण्णा आणि त्याची नवविवाहीत बायको शुभालक्ष्मी ह्यांनी जोडीने पूजा केली. जोश्यांचे अण्णा-एवढा खडूस म्हातारा, तोंडावर कधी हसू नाही, पण आवर्जून पखवाज वाजवायचे. पाठाऱ्यांचे बापू पेटी वाजवायचे. नाडकर्ण्यांची आजी मोट्ठ पातेलं भरून प्रसाद करायची. रात्रीच्या कार्यक्रमांत, कोणी काही ना काही कार्यक्रम करायचे. रायकरांची लता गायची. वागळ्यांच्या कुंदाचा नाच व्हायचा. अप्पा कदम नकला करायचा. जे कार्यक्रमांत भाग घेत नसत ते निदान प्रेक्षक म्हणून तरी हजर असायचे. पण बाळासाहेब कधीच कार्यक्रमाला आले नाही. जेव्हां खाली चौकात कार्यक्रम चालायचा तेव्हां बाळासाहेब, व्हरांड्यात डोक्यासकट अंगावर पांघरूण घालून घोरत पडलेले असायचे. चाळीच्या लोकांपासून अलिप्त रहायचा जणू त्यांनी विडाच उचलला होता.

आमच्या चाळीत नाना जातीची बिऱ्हाड असली तरी त्यांत एकोपा होता. शुभालक्ष्मीचे रस्सम प्रथम शेजारच्या पाठऱ्यांच्या घरांत जाईल तेव्हाच कोठे रमण्णाच्या पानांत पडेल. जोश्यांचे पापड चाळभर वाटले जातील. नाडकर्ण्यांच्या आजीच्या कोकमाच्या साराचा भुरका प्रथम आमच्या घरी ऐकायला यायचा आणि मग नाडकर्ण्यांचा मंगेश म्हणायचा, "आजचं सार काय झकास झालं आहे." वागळ्यांच्या कुंदाचं लग्न झालं तेव्हा वागळ्यांचे आणि रायकरांचे काही तरी बिनसले होते. पण कुंदा सासरी जाण्यापूर्वी रायकरांच्या आई-बाबांना, नवऱ्यासह नमस्कार करायला आली, तेव्हां रायकर बाबांच्या डोळ्यांत पाणी आलं अन् म्हणाले, "अगं, एवढीशी होतीस तेव्हांपासून पहात आहे. आता सासरी जायला निघाली आहेस एखाद्या राजकन्येसारखा नखरा करून. पण कितीही मोठी झालीस तरी तू आम्हाला आमची बाबीच हं." कुंदा लाजून अगदी चूर झाली.

कोणाचं बारसं असो नाही तर बारावं, हे सगळं घरचंच कार्य म्हणून सगळे एकमेकाला मदत करायचे. हिन्दू-मुसलमानांच्या दंग्यात आमच्या चाळीतल्या एकुलत्या एक मुसलमान-महंमद आझमच्या घराचे रक्षण साऱ्या चाळीने केले होते. पहिल्या दिवशी अम्माजानला एकटीलाच टाकून कामावर जायला महंमद कां-कू करीत होता, तेव्हां कामतांच्या आजीने सांगितलं, "अम्माजानच्या अंगाला हात लागण्यापूर्वी त्यांना माझ्या प्रेतावरून जावं लागेल." तेव्हां महंमद गहिवरला होता.

कामतांच्या घरांत खूप दिवसांनी जेव्हां प्रथमच पाळणा हलला, तेव्हां अम्माजानने सगळ्या चाळीला बिरयाणी खिलवली होती.

एवढा सगळा एकोपा असताना सुद्धा, अप्पा कदमची आई वारली, तेव्हां एक मोठ्ठा प्रश्नच उभा राहिला. त्याचं असं झालं. अप्पा कदमची आई बरेच दिवस आजारी होती. म्हणून अप्पा मधून मधून रजा घ्यायचा. त्या दिवशी असंच झालं. त्याच्या आईची तब्येत अचानक फारच खालावली. रात्रभर श्वास लागला होता. शेवटी सकाळी दहाच्या सुमारास तिचा प्राण गेला.

सहा महिन्यापूर्वी रमण्णाची अम्मा वारली, तेव्हा सकाळी सहा वाजताच, रमण्णांनी असा काही हंबरडा फोडला आणि तो आवाज कमी पडावा की काय म्हणून त्याच्या जोडीला त्याची बायको शुभालक्ष्मीने त्याला अशी काही साद दिली, की सारी चाळ खाडकन् जागी होऊन रमण्णाच्या दारात उभी राहिली आणि रमण्णाला इकडचं तिकडे काही करावं लागलं नाही.

पण आज चाळीतील सर्व पुरुष मंडळी कामावर निघून गेली होती. खूप धांवपळ करायची होती. नातेवाईक मंडळींना निरोप धाडायचा होता. म्युन्सिपालटीच्या ऑफिसातून मृत्यूचा दाखला आणायचा होता. प्रेतयात्रेची सगळी तयारी करायची होती. अप्पा आणि त्याचा मोठा मुलगा बाळू ह्यांच्याच्यांनी काही हे सगळं जमणारं नव्हतं. नाही म्हणायला शेजारचा संभा चव्हाण रात्रपाळीवरून घरी आला होता. त्याची काही थोडी बहुत मदत मिळणार होती ती तेव्हढीच. इतक्यात कोणी तरी सांगितलं, “अरे, वरती बाळासाहेब खिडकीजवळ उभे आहेत.”

संभा चव्हाण तसाच वर गेला. बाळासाहेब पानाचा तोबरा तोंडात भरून खिडकी जवळ, बाहेर बघत उभे होते. “बाळासाहेब,” संभा म्हणाला. बाळासाहेबांनी आपली नजर त्याच्याकडे केली. पानाचा तोबरा भरलेल्या तोंडाचा चंबू केला आणि आपल्या नेहमीच्या संवयीप्रमाणे डाव्या डोळ्याची भुवई वरती करणार इतक्यात संभा म्हणाला, “ बाळासाहेब, खालच्या मजल्यावरच्या अप्पा कदमची आई दगावली आहे. सगळी पुरूष मंडळी कामावर गेली आहेत. मदत पाहिजे आहे.”

‘दगावली’ हा शब्द ऐकता सरशीच बाळासाहेबांनी पानाची थुंक कोपऱ्यांत पचकन थुंकली आणि ‘चल मग’ म्हणून संभा चव्हाणबरोबर खालच्या मजल्यावर आले.

अप्पाच्या आईचा निष्प्राण देह जमिनीवर ठेवला होता. बाजूला अप्पाची बायको डोळ्यांत अश्रू आणून बसली होती. अप्पा निस्तेज होऊन आता कसं काय करायचं अशा चिंतेत चूर झाला होता. बाजूला त्याचा मुलगा बाळू आता आपल्याला कोणतं काम पडतं ह्याची वाट पहात होता.

"अप्पा, असं स्वस्थ बसून आता जमायचं नाही. जाणारं माणूस गेलं म्हणून व्यवहार थांबत नाही.ङ्क बाळासाहेबांनी सुरवात केली. " नातेवाईक मंडळींना कळवलं ? -- म्युन्सिपालटीतून पास आणला ? -- मयताची सगळी तयारी केली ? बाळासाहेब एकामागून एक असे प्रश्न विचारीत होते. अर्थात उत्तरे मानेनेच नाही मिळत होती व प्रत्येक प्रश्नासरशी अप्पा खचत चालला होता. " हे पहा बाळासाहेब, हे पांचशे रुपये ह्या खर्चासाठी बाजूला काढून ठेवले आहेत. हे ठेवा आणि आता सर्व काही तुम्हीच बघा." अप्पा म्हणाला. बाळासाहेबांनी ते पैसे खिश्यात टाकले आणि अप्पाला म्हणाले, "काही काळजी करु नका. मी सगळं काय ते बघतो."

आता बाळासाहेबांनी एखाद्या सराईत सेनापती सारखा पुढाकार घेतला आणि कामाचे वाटप सुरू केले. "हे पहा बाळू, तू आताच्या आत्ता निघ आणि तुमच्या नातेवाईकांना कळव. आणि हे बघ सगळीकडे काही तू जाऊ नकोस. जवळच्या दोन तीन घरी जा. मग त्या नातेवाईकांना दुसऱ्या नातेवाईकांकडे जाण्यास सांग. म्हणावं लगेच या. कामं खूप खोळंबुन राहिली आहेत. पळ नीघ. अप्पा, तुमचे भटजी कोण ?" अप्पा म्हणाला, "ते गोल देवळाजवळचे केळकर." " ते नाही चालणार, ते शुभ कार्य करणारे भटजी. ह्या कार्याला निराळे भटजी असतात. भटजींचं पण मीच बघतो. संभा, अजून चाळींत कोण आहेत ?" "रामण्णा नायक, नुकतीच तिसरी पाळी करून आला आहे." संभा म्हणाला. " मग त्याला बोलाव आणि तयार रहा. आपल्याला लगेच निघायचं आहे. आत्ताच मी माझ्या शेठजींना फोन करून आलो." बाळासाहेबांनी साऱ्यांना हुकुम दिले.

बाळासाहेब शेठजींना फोन करून येईपर्यंत संभा आणि रामण्णा टापसी बांधून बसले होते. "चला, आपल्याला निघालंच पाहिजे. अप्पा, आम्ही सगळी तयारी घेऊन येतो. तोपर्यंत तुमची नातेवाईक मंडळी आली तर मयताला आंघोळ घालून, कपडे घालून तयार ठेवा. आम्ही आलोच दोन-अडिच तासात." बाळासाहेबांनी फर्मान सोडलं.

आम्ही जेथे रहात होतो, त्या माहिमला काही हिंदू स्मशानभूमी नव्हती. साहजिकच तिरडीच्या सामानाचे दुकान सुद्धा त्या भागात नव्हते. शिवाय म्युन्सिपालटीचं ऑफिस म्हणजे, दादरलाच जायला पाहिजे होते. माहिम आणि दादर मध्ये फक्त आणखीन एकच स्टेशन. घर सोडल्यापासून दादरला पोहोचायला विस-पंचविस मिनिटांपेक्षा जास्त वेळ लागू नये.

बाळासाहेबांनी संभा आणि रामण्णाला, दोन बाजूंना घेऊन सरळ वाट धरली ती माहिम स्टेशनची. गाडी घेऊन दादरला आले तेव्हा स्टेशनाच्या घड्याळात सव्वा

अकरा वाजले होते. स्टेशनाच्या बाहेर मुळ्यांचं हॉटेल होतं. तिकडे बाळासाहेब आले. तेव्हां संभा म्हणाला, "हे काय बाळासाहेब, मयताचं सामान आणायला इकडे कुणी कडे ?" "गप्प बैस. हे बघ. सगळी खरेदी करून माहिमला चालत जावं लागेल. गाडीनी जाता येणार नाही. मग तिथून दादरच्या स्मशानांत परत चालत यावं लागेल. एवढं होईपर्यंत तुमची कामावर जायची वेळ होईल. हे सगळं करायला जोर नाही का लागणार ? नाहीतर तुलाच पोहोचवायची वेळ येईल! आता थोडं खाऊन घेतलं पाहीजे." लगेच रामण्णांनी त्यांची री ओढली. "ते पण बरोबर आहे." ते तिघेही हॉटेलांत शिरले.

हॉटेल मध्ये गेल्यावर बाळासाहेबांनी तीन मिसळ, तीन बटाटा भजी आणि तीन स्पेशल चहाची ऑर्डर दिली. ऑर्डर येईपर्यंत बाळासाहेबांनी संभाला आणि रामण्णाला सगळा प्लॅन समजावून सांगितला. "इथे टिळक पुलाखाली तिरडीचे सामान विकत मिळते. ते आपण घेऊ आणि तुम्ही दोघे ते सामान घेऊन सरळ तुळशी पाईप रोडनी चालत जा. मी म्युन्सिपालटीच्या ऑफिसमधून पास आणतो. तसाच पुढे जाऊन भटजींना निरोप ठेवतो. दुपारी साडे-तीन वाजेपर्यंत स्मशानांत यायला सांगतो. वाटेत येताना हार, फुले, अबीर, गुलाल ह्यांची खरेदी करून गाडीने माहिमला येतो. तो पर्यंत तुम्ही तेथे आला असालंच." दोघांनीही माना डोलावल्या.

खाऊन तिरडीच्या दुकानापर्यंत येईपर्यंत बारा वाजून गेले होते. संभानी समोरच असलेले दोन बांबू घेतले, "संभा, तसे बांबू घ्यायचे नसतात. ते वाजवून बघायचे असतात. नाहीतर, ते वाळवी लागलेले असायचे. त्या देशपांड्यांच्या वडिलांच्या प्रेतयात्रेची गोष्ट माहित आहे की नाही ?" "नायबा." संभा म्हणाला. "देशपांड्यांचे अण्णा म्हणजे हा भला माणूस. तिनशे पौंडा पेक्षा काही वजन कमी नसेल." "हो, हो." रामण्णा म्हणाला. "जेव्हां त्यांची तिरडी बांधत होते, तेव्हां त्याचा सगळा पुढाकार जोश्यांनी घेतला होता. मी आपला बघत होतो. मला काय तो माल बरा वाटला नाही. असा डोळ्याला दिसतो ना माल कसा आहे तो. जेव्हां प्रेतयात्रा निघाली, तेव्हां उजव्या बांबूतून एक सारखा चिर्-चिर् आवाज येत होता. मी त्याच बाजुनी चालतो होतो. प्रेतयात्रा गेली असेल जेमतेम शंभर यार्ड अन् उजवा बांबू मोडला की हो मध्येच." "अन् मग. कसं काय हो झालं बाळासाहेब ?" संभा म्हणाला. "मग काय. मी त्या बाजूला होतोच. बाजूला चालणाऱ्या एका माणसाची बखोट पकडली अन् त्याच्या खांद्यावर एक भाग ठेवला अन् दुसरा भाग माझ्या खांद्यावर. त्या दिवशी प्रथमच प्रेताला चार खांदे लागायच्या ऐवजी सहा खांदे लागले."

बाळासाहेबांनी बांबू नीट बघून घेतले. बाजूलाच मडकी ठेवली होती. त्यातली दोन तीन वाजवून त्यातलं खणखणीत वाजणारं एक घेतलं. "मडकं सुद्धा नीट चांगलं भाजलेलं पाहिजे. नाहीतर, कच्चं मडकं घेतलं आणि त्यात विस्तव ठेवला तर तडकण्याची भीती असते. मग स्मशानापर्यंत अग्नी जाणार कसा?" मध्ये मध्ये त्यांची मल्लीनाथी चालली होती. मध्ये ठेवायला लागणाऱ्या बांबूच्या कामट्यांची मोळ, काथ्याचा दोर, पांढरं कापड ह्यांची सगळी खरेदी करून संभाला आणि रामण्णाला पुढे पाठवून बाळासाहेब म्युन्सिपालटीच्या ऑफिस मध्ये जेव्हां आले तेव्हां सारी कारकून मंडळी लंच आटोपून नुकतीच कामावर रुजू झाली होती. तेथून पास घेऊन पालनजी सोजपाळाच्या चाळींत भटजींना निरोप ठेवला. आणि दादरच्या मार्केट मधून हार, फुले, अबीर, गुलाल ह्यांची खरेदी करून बाळासाहेब जेव्हां माहिमला परत आले, तेव्हां दोन वाजून गेले होते. संभा आणि रामण्णा नुकतेच आले होते. शिवाय अप्पाची काही नातेवाईक मंडळी मिळून दहा बारा माणसं जमली होती.

बाळासाहेबांच्या मार्गदर्शनाखाली तिरडी बांधण्याचे काम सुरू झाले. एखाद्या इंजिनियरने इमारतीच्या कामावर देखरेख करावी तशाच थाटात बाळासाहेब सूचना देत होते. बांबू खाली ठेवायचे, त्याच्यावर आडव्या कामट्या ठेवून मग एकसंधी दोराने कसे बांधायचे, मडक्यासाठी त्रिकोणी फ्रेम करून दोऱ्याची झोळी कशी बांधायची, ह्याची शास्त्रोक्त माहिती बाळासाहेब पुरवित होते.

तिरडी तयार झाल्यावर, अप्पा कदमला प्रेत बाहेर आणून ठेवायला सांगितलं, तेव्हां अप्पा म्हणाले, "पण अजून काही नातेवाईक मंडळी यायची राहिली आहेत." तेव्हां त्यालाही तडकावयाला बाळासाहेबांनी कमी केलं नाही. "आता प्राण तर निघून गेला आहे. भटजी तिकडे स्मशानांत खोळंबून राहिले असतील! संभाला आणि रामण्णाला रात्रपाळीला परत जायचे आहे. एकदा संध्याकाळ झाली की रस्त्यांतसुद्धा गर्दी होईल. मग प्रेतयात्रा न्यायला सोयीस्कर होणार नाही. ह्याच्यानंतर जर नातेवाईक मंडळी आली तर त्यांना परस्पर स्मशानांत यायला सांगा." अप्पा कदम चे बाळासाहेबांपुढे काहीच चालले नाही आणि प्रेतयात्रा साडेतीनच्या सुमारास निघाली.

दादरच्या स्मशानांत यायला साडेचार वाजले. तिथे सुध्दा बाळासाहेबांनीच सगळा पुढाकार घेतला होता. ऑफिस मध्ये पास देऊन प्रेत रजिस्टर्ड केलं. लाकडं घेताना सुद्धा ती ओली नाहीत ह्याची खातरजमा करून घेतली. लाकडाचा आकार व प्रकार ह्याची बाळासाहेबांना बऱ्यापैकी माहिती होती. छोटी पुस्तकी लाकडं

लवकर पेट घेतात, पण विझतातही तेव्हढ्याच लवकर. त्यापेक्षा रुंद, टणक लाकडं पेट घ्यायला उशीर लावतात पण दिर्घकाळ जळत रहातात आणि लाकडं पेटवायला थोड्याशा घासलेटचा उपयोग केला की पेटवायलाही त्रास पडत नाही, ह्याची चांगली माहिती बाळासाहेबांना होती. चितेची रचना स्मशानांतली लोक करीत होती. तरी त्याची खातरजमा बाळासाहेब स्वत: करीत होते. प्रेताची पूजा बाळासाहेबांनीच आणलेल्या भटजींमार्फत झाल्यावर, अप्पांनी मंत्राग्नी दिला. कवटी फुटेपर्यंत मंडळी थांबली. मग बाळासाहेबांनी सगळ्यांना आता परत जायला हरकत नाही असा आदेश दिला. हा सगळा विधी होईपर्यंत सहा वाजून गेले होते. संभा चव्हाण आणि रामण्णा नायक सकाळ पासून चालत होते. त्यांना बाजूला घेऊन बाहेरच्या टॅक्सीमध्ये बसवून व टॅक्सीवाल्याला आगावू पैसे देऊन त्यांच्या जाण्याची व्यवस्था बाळासाहेबांनी केली.

अप्पा कदम आणि त्यांची नातेवाईक मंडळी ह्यांना बरोबर घेऊन बाळासाहेब जेव्हां चाळीत परत आले तेव्हां सात वाजून गेले होते. सार्वजनीक नळाला नुकतेच कोठे पाणी यायला लागले होते. ऑफिसला गेलेली मंडळी परत आली होती. घरांतील बायका माणसं दिवसभर झालेला प्रकार आपल्या पुरुष मंडळींना सांगत होती. पुरुष मंडळी अप्पा कदमच्या घरी जाऊन भेटून आली तेव्हां साऱ्यांना समजलं की, बाळासाहेबांनी दिवसभरांत सर्व काम बिनबोभाट पार पाडली होती. “आम्ही यायच्या आधी एवढी घाई का केली ?” असं सर्वजण जरी वरवर सांगत होती, तरी सुध्दा मनांतून त्यांना ते सगळं पार पाडल्याबद्दल समाधान वाटत होतं. अर्थात ह्याचं सारं श्रेय बाळासाहेबांनाच द्यायला पाहिजे म्हणून नाडकर्णी वरच्या मजल्यावर आला.

एव्हापर्यंत बाळासाहेबांची आंघोळ झाली होती. पुन्हा स्वच्छ लेंगा, झब्बा, त्यावर जाकीट घालून, पायात चकचकीत बूट चढवून व तोंडात पानाचा तोबरा भरून बाळासाहेब, आज ह्या वेळी रिकाम्या असणाऱ्या खिडकीतून बाहेर रस्त्याकडे बघत बसले होते. जणू दिवसभरात काहीच झालं नव्हतं. “काय बाळासाहेब, सगळं कसं काय झालं ?” नाडकर्णींनी प्रश्न केला. पानाचा तोबरा भरलेल्या तोंडाचा चंबू करून, डावी भुवई वर करून बाळासाहेबांनी मानेनेच खुणावलं ‘ठिक झालं.’

- अशोक सबनिस, न्यूयॉर्क
e-mail : ashoksabnis@gmail.com
(पूर्व प्रसिद्धि : सेतू - जुलै १९९१)

# सोज्वळ आणि भावनाशील : सौ. शालिनीताई सराफ



१९९७ साल. ऑक्टोबर महिना. सकाळची वेळ. दहा साडेदहा वाजले असतील. मी आणि माझे मेव्हणे कुमार चित्रे शालिनीताईंच्या घरी गेलो होतो भेटायला. त्यावेळी शालिनीताई कॅलिफोर्नियांत फौन्टाना या गावी रहात होत्या. चित्र्यांच्या अपलॅंडच्या घरापासून आठदहा मैलावर.

दारावरची बेल वाजल्यावर स्वत: शालिनीताईंनी दार उघडले. माझी बहीण पुष्पा आणि माझी पत्नी शमा प्रथम आंत शिरल्या. पाठोपाठ आम्ही दोघे. ओळखी झाल्या. शालीनीताई मध्यम उंचींच्या, गोऱ्यापान-केतकी वर्णाच्या. बोलणं अत्यंत आर्जवी आणि मृदु. घाई नाही. वागणं कसं संथ! मोठ्या राजस दिसल्या शालिनीताई!

लहानसं दुमजली घर. शिरल्याबरोबर उजव्या हाताला बैठकीची खोली. समोर तिरकस स्वैंपाकघर आणि जेवणाची जागा. शुभ्र जाळीदार टेबलक्लॉथने झाकलेले लांबट टेबल. भोवती सहा खुर्च्या. टेबलावर लहानशी निशिगंधाच्या फुलांनी भरगच्च भरलेली फुलदाणी. कोपऱ्यांत लहान टेबल व त्यावर टेलिफोन. बाजूला पुस्तकांचे कपाट. सगळं कसं जिथल्या तिथं. नीट नेटकं. भपका नाही की डामडौल!

शालिनीताई मराठीमधून लिखाण करतात असं मला चित्रे म्हणाले होते. आमच्या स्नेह मासिकासाठी मी मराठी लेखक लेखिकांच्या शोधांत होतोच. ही चालून आलेली संधी मला पर्वणीच वाटली.

अशी आमची प्रथम ओळख झाली. माझ्या पत्नीला त्या फार भावल्या. कारण दोघीही भाविक आणि ईश्वरावर नितांत श्रद्धा ठेऊन असणाऱ्या. पुढे लेखनाच्या निमित्ताने संबंध दृढ होत गेले.

'आज माहेराला जानं' मधे बहिणाबाई म्हणते :

"माझ्या माहेराच्या वाटे..
जरी आले पायी फोड
पाय चालले चालले
अशी माहेरची ओढ..."

चाळीस पन्नास वर्षांपूर्वी आलेल्या आम्हां सर्व भारतीय अनिवासियांना, सुरवातीला तरी, अशी "माहेरची" ओढ लागलेली असायची. शालिनीताई याला अपवाद नव्हत्या. त्यांची कथा 'होमसिकनेस' या ओढीतूनच जन्मली. "मायदेश, कुटुंब, संसार, घरदार - सारं सोडून मी माझ्या मनाचं रोपटं (या) कर्मभूमीत रूजवूया पाहात होते. परंतु ते मुळी रूजता रूजेना.." असं त्यांच मनोगत बोलतं.

कालांतराने ही स्थिती बदलली. पक्षी जसा मोडलेल्या फांदीवर घरटे दुसऱ्या झाडाच्या फांदीवर बांधतो तसं होऊन जातं बहुतेक सर्वांच्या बाबतीत!

शालिनीताईंनी कथा लेखनाला सुरूवात अमेरिकेत आल्यानंतर केली. त्यांचा पहिला कथा संग्रह "स्वप्नदेशीच्या गुजगोष्टी" १९९६ साली प्रकाशीत झाला. याच्या प्रस्तावनेत डॉ. हे.वि.इनामदार संजविनी मराठ्यांची कविता उधृत करताना म्हणतात,

"नव्या जुन्या सीमेवर माझे मज गांव दिसे,
संस्कृति मी जणु समूर्त 'स्त्री' माझे नांव असे!"

शालिनीताईंच्या कथांचा गाभा हा असा आहे. त्यांच्या कथापण कौटुंबिक आहेत आणि इथल्या अमेरिकेत राहाणाऱ्या बहुतेक मराठी कुटुंबाच्या सूक्ष्म निरिक्षणावर आहेत. त्यांतील बऱ्याच कथा स्त्री जीवनावर आहेत आणि त्यांत 'स्त्री'ला मध्यबिंदू ठेऊन लिहीलेल्या. उदा. सोनेरी जाळं, ओढ, मी जिंकले मी हरले. पण त्या एका साच्याच्या नाहीत. या कथा वाचताना वसुंधराबाई पटवर्धनांच्या "वेचक वसुंधरा पटवर्धन" या कथासंग्रहाची आठवण येते. वसुंधराबाईसारखीच निवेदन शैली, शालिनीताईंच्या कथांत दिसते. अमेरिकेत घेतलेल्या अनुभवांचे वैचारिक शब्दांकन प्रत्ययाला येते. नर्म विनोद, भावपूर्ण प्रासादिक भाषा आणि वेचक संवाद ही त्यांच्या कथांची वैशिष्ट्ये सांगता येतील. या कथा वाचताना निर्भेळ आनंद वाटतो. मुलतः त्यांच्या लिखाणाचा हेतू मनोरंजन आणि बोध देण्याचा दिसतो. अर्थात हा 'बोध' लेक्चरवजा नसून प्रसंगोत्पन्न आहे. त्यांच्या लेखनाची तृप्ती "स्वांन्त सूखाय" या शब्दांत करता येईल.

काही कथांचे विषय जरा प्रक्षोभक (Melodramatic) वाटतात. त्यांत 'भाऊबीज', 'धुंदी' या कथा मोडण्यासारख्या आहेत. तसेच काही कथा "पाकशास्त्र कौशल्यावर" आधारीत आहेत. कारण शालिनीताई स्वतः कुशल पाकशास्त्र निपुण आहेत. पाकशास्त्र ही त्यांची स्वतःची खासीयत आहे.

या कथा संग्रहानंतर त्यांनी श्रीकृष्ण चरित्रावर "मनमोहन" ही कादंबरी प्रसिद्ध केली. आपले कथालेखन आणि कादंबरी लेखनावर त्यांनीच लिहीलेले परिचयात्मक निवेदन आपण वाचू या.

## परिचयात्मक निवेदन

माझं लहानपण अत्यंत सुखाचं होतं. पूर्व पुण्याईमुळे मला आयुष्यात खूपच गोष्टी लाभल्या. आयुष्याची पहिली चाळीस वर्षे पुण्याला - पुण्यनगरीत - राहिले आणि आता नंतरची तेवढीच वर्षे अमेरिकेत.

आई अत्यंत प्रेमळ, शांत. तिच्या हाताला फार चव. वडीलही अतिशय शांत. 'साधी रहाणी आणि उच्चविचारसरणी'चे मूर्तिमंत प्रतिक! सच्चे देशभक्त, पोषाख पांढरा शुभ्र. खादीचा. वकील असूनही 'इंग्रजांची चाकरी करायची नाही', म्हणून वकीली न करणारे. राष्ट्रीय शिक्षणाला वाहून घेतलेल. निर्व्यसनी. शिस्तीचा बडगा नव्हता. फक्त अभ्यास चांगला हवा, एवढी एकच अट, शाळा बुडवायची नाही. आम्ही पुण्याला डेक्कन जिमखान्यावर रहात होतो. शाळा भावे स्कूल. अशा असंख्य गोष्टी पूर्वपुण्याईने लाभल्या होत्या हे भाग्य!

लहानपणची एक आठवण. ते दिवस स्वातंत्र्यापूर्वीचे. भारलेले. बेचाळीसची चळवळ जोरात होती. वडील देशभक्त म्हणून आमच्या घरातही देशभक्तीचं वातावरण, सर्वांचे कपडे जाडेभरडे, खादीचे. सूतकताईही असे. वडील भूमिगत कार्यकर्त्यांना गूपचूप मदत करत. त्यावेळी भाई एस्.एम्. जोशी वेषांतर करून आमच्या घरी राहिले होते. लहान मूर्ति. गोरापान वर्ण. पांढरे शुभ्र कपडे. दाढी वाढवलेली. आता त्या गोष्टीला सत्तर वर्षे झाली तरी ती मूर्ति अजूनी स्वच्छपणे डोळ्यासमोर उभी रहाते. आनंद आणि अभिमानही वाटतो.

मी अस्सल पुणेकर. शिक्षण तिथेच विद्येच्या माहेरघरी. कॉलेजच्या दोन पदव्या मराठी विषय घेऊन मिळवल्या. पुढे अध्यापनही मराठीतूनच. मराठी, इंग्रजी, हिंदी, संस्कृत, गुजराथी सर्व भाषांवर अतिशय प्रेम. समृद्ध मराठी तर हाडामासात मुरलेली. इथे अमेरिकेला आल्यावर अनेक मराठी कुटुंबे भेटली. 'एकता' त्रैमासिक भेटले आणि एक अतिशय सुंदर असे पर्वच सुरु झाले. सुरुवातीला भितभितच एक कथा लिहून 'एकता'कडे धाडली. पुढच्याच अंकात ती छापून आली तेव्हा काय हर्ष झाला! पुढे अनेक कथा 'एकता' ने छापल्या. काहींना बक्षिसेही मिळाली. संपादक विनायक गोखले यांच्या अमोल सहकार्यामुळे हे सर्व घडले. हे ऋण फिटण्यासारखे नाही, तर आनंदाने मिरवण्यासारखेच आहे! पुढे यातील निवडक कथांचा संग्रह 'स्वप्नदेशीच्या गुजगोष्टी' पुण्याला प्रसिद्ध होणं म्हणजे मला तर पर्वणीच वाटली! 'स्वप्नाच्या पलिकडचे' वाटले!! पुण्याचे सुप्रसिद्ध व्यासंगी लेखक डॉ. हेमंत इनामदार यांनी या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहिले आहे की, "शालिनीताईंच्या

कथा नीटस आणि रेखीव आहेत. सहजसुंदर संवाद, हलकाफुलका विनोद आणि काव्यात्म व संयत शैली ही या कथानिवेदनाची वैशिष्ट्ये आहेत..... स्वच्छ सारवलेल्या अंगणात सुंदर रांगोळ्या काढलेल्या असाव्यात तशा.....'गद्यातील भावगीत' वाटावे अशा पातळीवरच्या......" "हे पुस्तक हातात घेतलं की खाली ठेववत नाही." असं अनेकांनी सांगितलं तेव्हा धन्य झाले!

या सुंदर लेखन पर्वात आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीची भर पडली. 'भगवान श्रीकृष्ण' यांच्या अवतारातील 'लौकीकाला अलौकिकाने मिठी मारलेल्या' बहारदार वर्णनाची 'मनमोहन' कादंबरी औरंगाबादला प्रकाशित झाली. हे ही केवळ पूर्वपुण्याईमुळेच झाले असे माझे ठाम मत आहे. औरंगाबादचे महामहोपाध्याय विद्याभूषण डॉ. ब्रम्हानंद देशपांडे D.Litt. यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे की,

"आधीच श्रीकृष्णचरित्र नितांत रमणीय व विश्वमोहन. ते सांगताना सौ. शालिनीताईंची लेखणी प्रसन्नतेनं फुलून आलीय. मराठीतील साध्या, सोज्वळ, सुबोध आणि सहजसुंदर अशा श्रीकृष्णचरित्राची उणीव 'मनमोहन' ने भरून काढली आहे." हे सर्व वाचून मी तर भरुन पावले. ही सर्व त्या भगवंताची कृपा! प्रेरणा देणारा, माझ्या हातून लिहून घेणारा कर्ताकरविता तोच पण निमित्त्य मला केले हा आनंद म्हणजे मला तर ब्रह्मानंदच वाटतो. असे माझे मला माझ्यापुरते तरी विलक्षण आनंदपर्व वाटते. मराठी शारदेची थोडी तरी सेवा घडली हे ही फार मोठे समाधान! असो.

माझ्यासारखे अनेक मराठी लेखक जगभर पसरले आहेत. मातृभाषेतून ते मराठी शारदेची उपासना करून तिची जोपासना ते जिव्हाळ्याने करणारच. भारतातही जसजसा शिक्षण प्रसार वाढतोय तसतसा लेखक व वाचक वर्ग वाढणारच आहे. तेव्हां मराठीची भरभराटच होणार यात मला शंका वाटत नाही.

माणसाला सुखी होण्यासाठी ज्या गोष्टींची जरुर आहे त्यात 'छंद' असणे हे फार महत्त्वाचे. वाचनाचा छंद असेल तर मनाची प्रगल्भता वाढते. कलेचा छंद तर अपरंपार आनंदाचा असतो. रोजच्या जीवनातील धावपळ, ताणतणाव यातून बाहेर पडायला छंद खूप मदत करतात. संगीतकला, चित्रकला यांच्यासारखेही छंद यासाठी फार मोलाचे आहेत.

मी तत्त्वज्ञान, धार्मिक, सामाजिक, विनोदी वगैरे अनेक प्रकारचे शक्य तितके चौफेर वाचन करते. या सर्वातून मला हेच जाणवत रहाते की, "मनुष्यजन्म मिळणे ही फार भाग्याची गोष्ट आहे. ईश्वरकृपेने आणि पूर्वपुण्याईने तो लाभतो. सत्, चित् व आनंद हे त्या ईश्वराचे स्वरुप. प्रत्येक मनुष्य, जीव, प्राणिमात्र हे त्याचेच अंश

म्हणून समान. सर्व काही ईश्वराच्या इच्छेने घडत असते. तो ठेविल तसे, त्याची इच्छा प्रमाण मानून समाधानात रहावे. आमचे धर्मग्रंथ सांगतात त्याप्रमाणे, "कानांनी मंगल ऐकावे, डोळ्यांनी उत्तम शुभ पहावे आणि बलवान् अवयवांनी देवाची स्तुती व सेवा करीत, त्याने दिलेले आयुष्य व्यतीत करावे. मग सुख व शांती यांना तोटा नाही." माणसाला तरी दुसरे काय हवे असते ?"

शालिनी सराफ
e-mail: shalini@gmail.com

# भाऊबीज

**न**लिनी सुहासची वाट पहात होती. गराज डोअर उघडून त्याची गाडी - गराजमध्ये शिरल्याचं जाणवताच ती झटकन् तिथे येऊन म्हणाली, "सुहास, तू शूज वगैरे न काढता प्लीज शेजारी ज्युलीकडे जा. मुलं तिथं खेळताहेत, त्यांना घेऊन ये पटकन्."

"का गं ? काही विशेष ?"

"म्हणजे काय, आजपासून दिवाळी नाही का सुरू झाली ? विसरलास वाटतं ? म्हणून करंज्या केल्या आहेत मी. पण दिपूला तर मुळी कसा तो धीरच नाही. त्याचं आपलं सारखं टुमणं सुरू झालं. मला 'टर्न ओव्हर' हवा, 'टर्न ओव्हर' हवा. आता करंज्यांचं काम किती चिकट असतं! त्या काय होतात का अशा झटपट ? मग सरळ मुलांना पिटाळलं शेजारी ज्युलीकडे. आता तयार आहेत तर म्हटलं...."

"आज्ञा राणीसरकार! बोलावून आणतो मुलांना 'टर्न ओव्हर' खायला!" असं म्हणून तो मोठ्यांदा हसला. इंग्रजीची शिंगं फुटायला लागलेल्या आपल्या लाडक्या चिरंजीवानं करंजीचं केलेले बारसं त्याला मोठं मजेचं वाटलं. सुहास हसला तशी नलिनीही हसली. त्यांच्या शेंडेफळाबद्दल त्या दोघांनाही खूपच कौतुक होतं.

आता मुलांनाही 'दिवाळी' आवडायला लागलीय. आपल्या मित्रांना-मैत्रिणींना सांगतात, "आमच्याकडे 'फेस्टिव्हल ऑफ लाईट्स' आहे." त्यांच्या अमेरिकन मित्रमैत्रिणींना नीट समजलं नाही तर म्हणतात की, "इंडियन ख्रिसमस असतो तो." देतात ठोकून! असतात मात्र अगदी खुषीत. खाण्यापिण्याची, कपड्यालत्त्याची चंगळ असते ना!

जयदीपचा जन्म झाल्यापासून तर या कुटुंबात दिवाळी फारच हौशीनं आणि आनंदानं साजरी होते. अमेरिकेत राहिलं तरी अशा वेळी मायभूमीतले सण, संस्कार यांची तीव्रतेने आठवण होते. मग इथल्या दिनचर्येत बसेल तसे सण साजरे करावेसे वाटतात. दिवाळीला नलिनी रोज एक फराळाचा ताजा पदार्थ करते. अगदी निगुतीनं! अन् सारं कुटुंब संध्याकाळी, सुहास कामावरून आल्यावर एकत्र बसून त्याचा आस्वाद घेत. मजेत, हसतखिदळत. आज तिनं खूप खपून सर्वांना आवडणाऱ्या ओल्या नारळाच्या करंज्या केल्या. आता उद्या चकल्या होतील, मग परवा लाडू.

असं छान चालतं. दिवाळीचा उत्साह अशा वेळी फसफसून वाहू लागतो. भाऊबीजेला तर मंजूअंजूच्या उत्साहाला उधाणच येतं.

आत्ताच मंजू, अंजू आणि त्यांचं पाहून ज्युली आनंदानं उड्या मारत, पळतच घरात शिरल्या. त्यांच्याबरोबर दिपू दिसला नाही म्हणून नलिनीने विचारले, "मंजूताई, अग दीपू कुठाय ?"

तिनं सांगितलं की, "त्याला स्विंग खेळायचा होता. तो आमच्याबरोबर ज्युलीकडे आलाच नाही. मी त्याला बजावून सांगितलं होतं की, स्विंग खेळून झाल्यावर घरात जा मम्मीकडे." दीपूच्या छोट्या ताईने, तिच्या मानाने तिचं, त्याच्या बाबतीतलं कर्तव्य पार पाडलं होतं. तशी ती आहेच समजूतदार. अगदी बापाच्या वळणावर गेलीय.

"नाही गं मंजा, घरात नाही आला तो. बरं, समोर नीलकडे आहे का पाहून ये. सांग की 'टर्न ओव्हर' खायला बोलावलंय. तरच येईल. नाही तर खेळ सोडून कुठला येतो ग ?"

तिघीजणीं लगालगा समोर जाऊन पाहून आल्या. पण दिपू त्यांच्याबरोबर नव्हता. तशी ती जरा काळजीतच पडली. "म्हणजे काय ? गेला तरी कुठे हा ?" ती स्वत:शीच पुटपुटली.

अर्ध्या तासापूर्वी स्नो पडायला लागल्याचं तिला स्वयंपाकघरातल्या खिडकीतून दिसलं होतं. स्नो खूपच जोरात पडत होता. पण तिला मुलांची बिलकूल काळजी वाटली नाही. ज्युलीच्या उबदार घरी मुलं मजेत खेळत होती. तेव्हां काळजीचं कारणच नव्हतं. पण आता दिपू सापडला नाही म्हणून ती जरा दचकलीच.

सहजच तिनं स्वयंपाकघरातून बटन दाबून बॅकयार्डचा दिवा लावला. त्या प्रखर उजेडात मागचं आवार चांगलंच उजळलं. जागजागी नुकत्याच पडलेल्या स्नोचे ढिगारे साचले होते. तिचं झोपाळ्यांकडे लक्ष गेलं, तर एक झोपाळा तुटून लोंबत होता कसातरीच... निराधार असल्यासारखा... केविलवाणा...

आणि अचानक ..... हो अगदी अचानकच....

बर्फाच्या ढिगाऱ्यात तिला दीपूच्या जॅकेटचा भाग चमकत असल्यासारखं वाटलं. तिच्या हृदयाचा ठोका चुकला.

धाडकन् तिनं काचेचं अन् त्यामागचं जाळीचं दार ढकललं आणि विजेसारखी ती तिकडे धावू लागली. बर्फ तुडवत.... अनवाणी.... जयदीप बेशुद्ध होऊन बर्फात पडला होता. तिने कर्णकर्कश हृदयभेदक किंकाळी फोडली. " Suhas, he is here. Help! Help!"

कपडे बदलून सुहास किचनमध्ये शिरतच होता. गार वाऱ्याचा झोत त्याच्या अंगावर आला अन् पाठोपाठ नलिनीची किंचाळी.

"Oh, my God! Oh my God!" असं ओरडत तो वाऱ्यासारखा धावत सुटला, अन् लांब लांब टांगा टाकत क्षणार्धात तिथे पोचला. मुली घाबरून हे सर्व पाहात होत्या. जयदीपला बर्फातून उचलून घरात आणताना सुहास ओरडला,

"मंजा, नलू, इमर्जन्सीला फोन करा."

मंजिरी फोनवर धावून गेली. तिने नाईन्-वन्-वन् नंबर फिरवला, तोच नलिनी तिथे येऊन पोचली. सुहासने जयदीपला फॅमिलीरूममध्ये कारपेटवर ठेवून लगेचच 'CPR' सुरू केला. मुलींनी भराभर ब्लँकेट्स आणली. नलिनीनं घराचं तापमान खूप वर नेलं. जे सुचेल ते करत होते सगळेजणं.

नलिनी आणि सुहास दोघंही मनातून फारच हादरले होते. तरीपण धीर सोडून चालणार नव्हतं. झटपट हालचाली व्हायला हव्या होत्या, आणि तशा झाल्याही. फार मोठ्या संकटात सापडल्यावर कुठली तरी अदृश्य शक्ती माणसाला मदत करत असते.

इमर्जन्सीची टीम ताबडतोब आली आणि उपचार सुरू झाले. आता मात्र नलिनी वादळातल्या वेलीसारखी थरथर कापू लागली. डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहू लागला. मनात ती रामरक्षा म्हणू लागली, पण हृदयात कालवाकालव चालली होती.

ॲम्ब्युलन्सचा आवाज ऐकून शेजारी धावले. काळजीयुक्त उत्कंठेनं. हे काय? ॲम्ब्युलन्स आली? कुठे थांबली? कुणाला काय झालं? आणि मेणाच्या पुतळ्यासारखा दिसणारा जयदीप पाहून त्यांचीही हृदयं गोठून गेली.

जयदीपच्या शरीराचं तपमान नॉर्मलपेक्षा फारच खाली गेलं होतं. केवळ सत्तरच्या आसपास. वैद्यकीय शास्त्राच्या दृष्टीने निदान – 'हायपोथर्मिया'. गोठून लाकडाच्या ओंडक्यासारखं ताठ झालं होतं त्याचं शरीर.

आकाशातले सुंदर सुंदर रंग जाऊन सारं आकाश राखाडी रंगानं माखलं गेलं होतं!

हॉस्पिटलच्या वेटिंग रूममध्ये नलिनी आणि सुहास चिंताक्रांत होऊन बसले होते. मन जयदीपसाठी मूकपणे आक्रोश करत होतं. तरीही उन्मळून पडलेल्या नलिनीला सुहास सारखं समजावत होता. स्वतःचं दुःख उघड न दाखवता.

"नको गं, एकसारखी स्वतःला किंवा मुलींना दोष देऊ. हा अपघात आहे. आणि अपघात कधी सांगून होतात का? अशा संकटाच्या वेळी शक्य तितकं मन आवरून देवावर भार टाकायचा. त्याची प्रार्थना करायची, त्याला शरण जायचं."

नलिनीला वाटलं, "मला का हे समजत नाही? समजतं रे राजा. पण काय करू? माझा ऊर कसा फुटूनच जातोय. क्षणाक्षणाला काळजी हृदय कुरतडून टाकतेय. काय करू?" सुहास मायेनं तिच्या केसांवरून हळुवारपणानं हात फिरवत राहिला.

इमर्जन्सीच्या नर्सेस धावपळ करत होत्या. आतबाहेर करताना जयदीपवर होणाऱ्या उपचारांबद्दल काहीतरी जातायेता सांगून धीर देत. माणुसकीला जागून....

"त्याच्या पोटावर गरम पाण्याचा फवारा सोडलाय. आय्.व्ही. आणि ऑक्सिजन चालू आह" असं काही सांगून सटदिशी नर्स आत जायची.

दुसरी एखादी म्हणे, "त्याचं शरीर थॉ झाल्याशिवाय रक्ताभिसरण सुरू होणार नाही अन् त्याशिवाय औषधांचा उपयोग होणार नाही."

स्वयंपाक करताना चिकन, बीफ इत्यादी पदार्थांच्या बाबतीत फ्रोजन, थॉ वगैरे शब्द ती वापरत असे. पण तेच शब्द जयदीपबद्दल? तिच्या काळजाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या.

पुन्हा कधीतरी नर्स येऊन सांगे, "सभोवती दिवे लावले आहेत. अन् अंगावर 'हायपोथर्मिया' ची ब्लँकेट्स घातली आहेत. हळूहळू त्याचं तपमान वर जात आहे. पहिलं सत्तर म्हणजे काळजी करण्याजोगचं होतं...."

नलिनीला वाटलं, "एखादी लहान मुलगी, एखादी बाहुली उचलते. तिला आंजारते, गोंजारते. मग कधीतरी तिच्यावर रुसून फुगून, देते तिला फेकून. नियती माझ्या बाळाशी हाच खेळ तर खेळत नाही ना? आणि केवळ आपलाच जयदीपच नव्हे, तर आपण सगळेच नियतीच्या हातातलं बाहुलंच नाही का एकपरी? ती नाचवेल तसे नाचतोय.... नको गं, माझ्या लाडक्याच्या जीवाशी असा खेळ खेळू. माझं लेकरू करंजी मागत होतं ग सारखं.... एक घासही त्याच्या पोटात गेला नाही."

"परमेश्वरा, तू करुणासागर आहेस. आमचा जयदीप म्हणजे तुझंही लेकरूच ना.... तुलाच त्याची काळजी .... तो धडधाकट घरी येईल, पूर्वीसारखा दंगा करेल, घरभर पळेल.... असं कर."

"पण हे असं घडेल कशावरून? उलटं झालं तर? उरलेलं आयुष्य त्या दु:खाचा धगधगता निखारा हृदयात ठेवून जगावं लागेल."

आशानिराशेचा लंबक जीवघेण्या गतीनं हालत होता. जयदीपच्या प्रकृतीत अजूनही म्हणण्यासारखी सुधारणा दिसत नव्हती. दोन-तीन तास झाले.

समोरून मुख्य डॉक्टर त्यांच्याकडे येताना दिसले. गुडघ्यात मान घालून

हताशपणे बसलेल्या सुहासला नलिनी म्हणाली, "सुहास, ते बघ डॉक्टर येताहेत आपल्याकडे."

ते किंचीत सैलावलेले वाटले. "आनंदाची बातमी म्हणजे त्याचं हृदय चालू झालं आहे, म्हणजे अर्धी लढाई जिंकली. तरीपण अजून अर्धी बाकी आहे. त्याच्या मेंदूला काही वेळ ऑक्सिजन न मिळाल्याने कदाचित् त्याच्या मेंदूवर परिणाम होईल. कदाचित् लवकरच त्याला न्यूमोनियाही होण्याची शक्यता नाकारता येत नाही." सुहास आणि नलिनी डॉक्टरांकडे पाहून केविलवाणे हसले. आम्ही सर्व प्रयत्न करून करू, पण मला वाटतं, तुम्ही फार थकलेले आहात. त्याला पाहून घ्या. अन् तुम्ही घरी जाऊन पोटभर खाऊन आराम करा. तुम्हांला त्याची फार गरज आहे. "You need a lot of strength to face this mishap. Now you leave everything to HIM." आकाशाकडे पाहून हात वर करून ते म्हणाले.

दोघंही डॉक्टरांबरोबर इमर्जन्सीत, जयदीपला ठेवला होता तिथे गेले. नाकातोंडात नळ्या घालून ठेवल्या होत्या. डोळे पट्टी लावून बंद केलेले. सर्व अंग फॉईलमध्ये गुंडाळलेलं, शरीरातली उष्णता शरीरात राहावी म्हणून.

दोघांचे डोळे भरून आले. दोघांनी मायेनं त्याच्या शरीरावरून हात फिरवला. नलिनी म्हणाली, "दिपूराजा, लवकर लवकर छान बरं होऊन घरी यायचं हं सोन्या. मंजूताई, अंजूताई वाट पाहाताहेत बाळाची!"

पुढचे काही दिवस फार अवघड गेले. नलिनी तर भ्रमिष्टच झाली होती. धनत्रयोदशी आली तशी म्हणाली, "देवा, माझं धन लुटू नको. माझ्या बाळाला बरा कर."

नरकचतुर्दशीला म्हणाली, "परमेश्वरा, तू सर्वशक्तिमान, माझ्या घरात शिरलेल्या त्या यमरूमी नरकासुराला तू मारून टाक, परतवून टाक."

पाडव्याला म्हणाली, "तू करूणासागर म्हणवून घेतोस, ते खरं करुन दाखव. जयदीपला सुखरूप घरी पाठव."

सारी दिवाळी अशीच चालली होती. अंधारात....दुःखात.

भाऊबीजेचा दिवस उजाडला. सकाळीच हॉस्पिटलमधून डॉक्टरांचा फोन आला. ते जरा उत्साही अन् आशावादी वाटले.

"आज दुपारी चार वाजता तुम्ही सर्वजणं हॉस्पिटलमध्ये या. त्याचा रेस्पिरेटर काढून टाकायचा आहे. त्याचा श्वास आता खूपच सुधारला आहे. चार वाजता तुम्ही हजर असावं. आणि हो, न्यूमोनियाचा धोका टळला आहे."

कधी साडेतीन वाजताहेत अन् कधी आपण हॉस्पिटलमध्ये जातोय, असं सर्वांना झालं होतं.

जयदीपच्या बेडभोवती दोन डॉक्टर्स आणि दोन नर्सेस होत्या. सभोवार सुहास, नलिनी, अंजू आणि मंजू उभे होते. रेस्पिरेटर काढला गेला. हलकेच. अंजूमंजू तर सारख्या भावाकडे डोळे लावून पहात होत्या.

एक नर्स सदैव जयदीपच्या तैनातीला हजर होती. मनानं तीही त्याच्या केसमध्ये गुंतली होती. त्याची सेवा ती खूपच मायेनं करायची.

अचानक ती मोठ्यांदा म्हणाली, " तो डोळे उघडायचा प्रयत्न करतोय." आनंदानं पळतच ती डॉक्टरांना बोलवायला धावली.

काही क्षणातच मुख्य डॉक्टर, त्यांचा मदतनीस व दोन नर्सेस घाईनं आत शिरल्या. सर्वांच्या चेहऱ्यावर कमालीची उत्कंठा दिसत होती.

ते पाहून सुहास व नलिनी आशेनं व डोळ्यांत प्राण आणून जयदीपकडे पाहू लागले. जरा वेळ डोळ्यांची उघडझाप झाली आणि त्यानं चक्क सताड डोळे उघडले.

दृष्टीसमोरच उभ्या असलेल्या अंजूमंजूकडे तो रोखून पाहू लागला. एकटक. डॉक्टर्स, नर्सेस, सुहास, नलिनी, अंजूमंजू सारेजणं जणू श्वास रोखून त्याच्याकडे पहात होते की, आता पुढे काय घडतंय ?

आणि तो एकदम म्हणाला, "ताई....ताई....." पुनर्जन्मामुळे पुन्हा एकदा दोघींना भाऊ मिळाला होता. मंजूताई आणि अंजूताईच्या डोळ्यांमध्ये लक्ष निरांजनं उजळली.

ज्या अर्थी त्यानं 'ताई' म्हणून हाक मारली, त्या अर्थी तो माणसं ओळखू शकतोय व मेंदूवर काही परिणाम झालेला नाही. म्हणजे धोका पूर्ण टळला होता. डॉक्टरांनी हे सांगताच सुहासनं डॉक्टरांना अत्यानंदाने मिठी मारली.

" I don't have enough words to thank you Doc!" असं तो म्हणाला. तेव्हां डॉक्टर म्हणाले होते की, त्यांनी स्वतःचं केवळ कर्तव्य केलं होतं, पण चमत्कार करण्याची शक्ती फक्त परमेश्वराकडेच आहे. त्यांच्या मते खरोखर चमत्कार घडला होता. नेहमीप्रमाणे आकाशाकडे पाहात वर हात करून ते बोलले. नलिनीनं दीपूच्या तैनातीला असलेल्या नर्सला मिठी मारली. दोघी भारावून गेल्या होत्या. लढाई त्यांच्या लाडक्या जयदीपनं पूर्ण जिंकली होती.

मंजूताईनं हलकेच लाडक्या दिपूच्या छातीवर हात ठेवून अलगद गळामिठी घालून

त्याच्या गालाची पापी घेतली.  लगेच पलीकडच्या बाजूला जाऊन अंजूताईनेही तशीच पापी घेतली.  हे दृश्य सर्वजण आनंदानं पाहात होते.  सर्वांनी आनंदानं टाळ्या वाजवल्या.  नलिनीला वाटलं, इतकी सुंदर भाऊबीज आजवर कुठे झाली असेल का?  लक्ष निरांजनं तेवत असलेल्या नेत्रांनी बहिणींनी भावाला ओवाळलं. त्यांच्या भावभावनांच्या तबकात भावानं आपल्या पंचप्राणांची ओवाळणी घातली होती!!

लेखिका - शालिनी सराफ, न्युजर्सी.
e-mail: shalini@gmail.com

# एका संवेदनशील कलावंताची व्यथा आणि प्रगती : पं.सुजन राणे



**श्री.**सुजन राणे शास्त्रीय संगीतातील दर्दी जाणकार आहेत आणि स्वत: उत्तम गातात अशी त्यांची ख्याती ऐकून केव्हां त्यांना भेटता येईल याची मी वाट पाहून राहिलो होतो. आणि अचानक एक दिवशी मेल मधून श्री.सुजन राणे यांच्या कार्यक्रमाची काही कात्रणे आली. मी त्यावेळी "सावली" मासिकाचा संपादक म्हणून काम पहात होतो आणि सावली वेब साईटचे संपादनाचे काम माझ्याकडेच होते. या वेबसाईटवर अमेरिकेतील गुणी कलाकारांचा परिचय आम्ही प्रसिध्द करीत असू. नवशक्ती, तरूण भारत आणि नवहिंद टाईम्स मधील श्री.राणे यांची माहिती संकलीत करून आम्ही त्यांचा परिचय सावली वेबसाईटवर प्रसिध्द केला.

त्यानंतर श्री. राणे यांच्या भेटीचा योग २००८च्या डिसेंबर महिन्यांत आला.

दादा प्रधान, पं. सुजन राणे आणि डॉ. ताम्हणे यांना हडपसर येथील अथश्रीमधील माझ्या निवासस्थानी घेऊन आले.

मला दादा प्रधानांकडून एवढं कळलं होतं की सुजन राणे मुळचे मुंबईचे रहाणारे. त्यांचा जन्म मुंबईच्या सुशिक्षित आणि सधन पाठारे प्रभु ज्ञातीत झाला. त्यांचे वडील स्व. केशवराव हे जे.जे. स्कुल ऑफ आर्टसचे पदवीधर होते आणि त्या काळांत नावाजलेले चित्रकार होते. त्यांचे काका सुंदरराव, हिन्दी चित्रपटसृष्टीतील पहिले मराठी संगीत दिग्दर्शक होते. त्यांनी प्रथम वीर अभिमन्यू या चित्रपटाला संगीत दिलं आणि त्यानंतर १५ बोलपटांना चाली दिल्या. अशा या कलावंत घराण्याचा, सुजन राणे यांना संगीत आणि चित्रकलेचा वारसा मिळाला होता.

मी राण्यांना विचारलं,

"राणेसाहेब, तुमचे वडील चित्रकार आणि काका संगीत दिग्दर्शक. त्यांच्यामुळेच तुम्हाला गाण्याची आवड निर्माण झाली कां ?"

"भाई, मला तुम्ही 'साहेब' वगैरे काही म्हणू नका. मी तुमच्यापेक्षा वयाने बराच लहान आहे. तुम्ही मला 'सुजन' म्हटलंत तरी चालेल."

"बराय्. मग सांगा सुजन, तुम्हाला गाण्याचा नाद केव्हा पासून लागला ? जरा

कथातर ऐकू या.''

"आमच्या घरी संगीताचं आणि चित्रकलेचं वातावरण होतं. घरांत खांसाहेब अब्दुल करीम खान यांच्या रेकॉर्डस् लहानपणापासून कानावर पडायच्या व त्यामुळे संगीताकडे कल व्हायला लागला. वाटायचं आपल्याला कधी असं गायला येईल कां ? अर्थात ही मोठी झेप होती. परंतु खांसाहेबांचा आवाज आणि गाणं कुणालाही मंत्रमुग्ध करण्यासारखं होतं. पंधरा सोळा वर्षांचा असतांना, मी एकदा काकांच्याबरोबर शिर्डीला गेलो असताना, रात्री रेडियोवर किराणा घराण्याचा आवडता राग अभोगी कानडा कोणीतरी इतक्या आर्ततेनं आळवीत होता की माझं मन बेचैन झालं. गाणं संपल्यानंतर सांगण्यांत आलं की गायक कलाकार पं.फिरोज दस्तूर होते. मनांत आलं की एक पारशी गवई खांसाहेबांची गायकी किती हुबेहूब गात होते. मी आश्चर्यस्तंभीत झालो आणि मग मला प्रत्यक्ष त्यांची मैफिल ऐकण्याची अनावर इच्छा झाली.''

"मग पुढं काय झालं ? भेटले कां पं.दस्तूर ?'' दादा उत्सुकतेने बोलले.

"मुंबईला परतल्यावर मी त्यांच्या शोधांत होतो. अचानक गिरगांवमधील लक्ष्मीबाग हॉलमध्ये एक गाण्याचा कार्यक्रम होता. त्याला मी गेलो. अनेक नामवंत गवई गाऊन गेले. पहाटे चार वाजता पं. दस्तूर गायला बसले. त्यांनी राग कोमल ऋषभ आसावरी असा काही मांडला की ऐकणारे बेहद्द खूष होऊन गेले. त्या रागाचा मुखडा माझ्या मनावर कायमचा कोरला गेला. मी ठरविलं की गाणं शिकायचं ते फिरोज दस्तूरांकडेच. १९६८ सालात मी त्यांच्याकडे तालीम सुरू केली ती २००८ सालापर्यंत चालू राहिली.''

"म्हणजे गाण्याची सुरवात तुम्ही दस्तूरांकडेच केली नां ?'' मी विचारले.

क्षणभर राणे थांबले हे पाहून दादा प्रधान म्हणाले,

"सुजन, तुम्ही मुंबईत राहिलात. तुमचं शिक्षणपण मुंबईत झालं असलं पाहिजे !''

"हो ना. माझं सर्व शिक्षण मुंबईलाच झालं. माझं शालेय शिक्षण डॉन बॉस्को मधून तर कॉलेजचं सिध्दार्थ मधून !''

"अरे वा ..काय योगायोग बघा. मी सुध्दा सिध्दार्थचा विद्यार्थी. अनंत काणेकारांचा आणि डॉ.कर्णिकांचा शिष्य !'' मी म्हटलं.

"खरं की काय ? त्यावेळी कर्णिक प्रिन्सीपॉल होते आणि काणेकर - मालशे मराठी शिकवायचे. बी.ए. झाल्यानंतर मात्र मी युनिव्हर्सिटीमध्ये इंग्रजीसाठी ॲडमिशन घेतली आणि माझी एम.ए. ची पदवी मुंबई विद्यापिठातून घेतली.''

"तुम्ही एम.ए. ला इंग्रजी विषय घेतलात याला काही निराळं कारण होतं कां ?'' डॉ. ताम्हणे.

"हो. माझं शालेय शिक्षण इंग्रजी माध्यमांतून झालं. संगीताप्रमाणेच मला इंग्रजीची फार फार आवड होती. इंग्रजी वाङमय खूप वाचायचो. बीएला असतानाच मी ठरविलं की आपण इंग्रजी घेऊनच एम.ए करायचं. अद्यापही माझे आवडते लेखक म्हणजे शेक्सपियर, बर्नाड शॉ, बर्ट्रांड रसेल, पर्ल बक, सॉमरसेट मॉम आणि कॉनन डायल आहेत."

"मराठी साहित्य काही वाचलंय कां तुम्ही सुजन ?" मी विचारलं.

"मराठी ललीत साहित्य मी विशेष वाचलं नाही. परंतू संगीतशास्त्रावर मी बरंच वाचन केलं आहे. गोविंदराव टेंबे यांची पेटीवादनावरील पुस्तके, वामनराव देशपांडे यांची संगीतावरील समीक्षणे आणि भातखंड्यांचे संगीतावरील ग्रंथ मी आवडीने अद्यापही वाचतो."

"सुजन, तुम्ही पं.दस्तूरांकडे तालीम घेतलीत. तुम्ही पुण्याच्या सवाई गंधर्व महोत्सवांत त्यांना साथपण केलीत. खरं नां ?" डॉ. ताम्हणे.

"हो. मी पंडीतजींना अनेक मैफलीमध्ये साथ केली आहे. ते मी माझे भाग्य समजतो. जवळ जवळ चाळीस वर्षे मी त्यांची तालीम घेत होतो. संगीत ही अशी एक कला आहे की तिची आयुष्यभर साधना करावी लागते."

"सुजन, घरांतल्या वातावरणाचा कलावंतावर काही परिणाम होतो कां ?" मी विचारलं.

"हो जरूर होतो. घरांत देवधर्म मानणारी, सदाचारावर विश्वास ठेवणारी, चारित्र्यसंपन्न माणसं असली की संगीत फुलते, विकसते अशी माझी श्रध्दा आहे."

"सुजन, तुमची गायकी किराणा घराण्याची गायकी म्हणून समजली जाते. यांतले काही उमजत नाही बुवा आपल्याला. आम्हाला फक्त माहीत आहे "किराणा मालाचा वाणी." तुमची ही "घराणा" गायकी काय भानगड असते ते जरा समजावून सांगाल कां ?"

"भाई, ज्या ज्या ठिकाणी हे सुरवातीचे गायक राहिले, त्या त्या ठिकाणाची - गावाची नावे त्यांच्या शिष्यपरंपरेला लागली. मुलतः भारतीय शास्त्रीय संगीताची सुरवात चार ठिकाणी झाली. ग्वाल्हेर, जयपूर, आग्रा आणि किराणा. म्हणून त्यांची नांवे ग्वाल्हेर घराणं, जयपूर घराणं, आग्रा घराणं आणि किराणा घराणं अशी प्रचलीत झाली. किराणा हे कुरूक्षेत्राजवळचे गांव. कुरूक्षेत्र म्हणजे आताचं आपलं दिल्ली. अब्दुल करीम खान हे किराणा गांवचे आणि त्यांची परंपरा "किराणा" घराणं म्हणून झाली. पुढे अब्दुल करीम, गायकवाडांच्या पदरी "राज गायक" म्हणून राहिले. त्यांच एका हिंदू मुलीशी लग्न झालं."

"आपल्याकडे शास्त्रीय संगीतांत जे राग आहेत, त्यांत किराणा घराण्याचे गवई

कोणते राग प्रामुख्याने गातात ?"

"किराणा घराण्यांतील प्रमुख राग तीन. ललत, जीवनपूरी आणि गुजरी तोडी, हे राग सकाळी गातात तर मालकंस आणि दरबारी कानडा हे राग रात्री गातात. मालकंस, तोडी आणि भीमपलास हे स्वयंसिध्द राग समजतात आणि या रागांच्या पोटांतून निघालेल्या रागांस संकीर्ण राग म्हणतात. चंदकंस हा राग मालकंसाच्या पोटांतून निघालेला संकीर्ण राग आहे."

"सुजन, तुम्ही ज्या प्रमाणे पं.दस्तूरांना अनेकवेळा साथ केलीत, तसंच स्वतंत्रपणे मैफलीचे कार्यक्रम केले आहेत कां ? बँकेच्या नोकरी निमित्ताने तुम्ही बऱ्याच ठिकाणी फिरलात. अशा काही ठिकाणी आपले कार्यक्रम झालेत कां ?" मी विचारले.

"१९७८ ते १९८३ पर्यंत ओमानमध्ये असताना "भारतीय सांस्कृतिक मंडळा" मध्ये माझा कार्यक्रम झाला . त्या नंतरच्या कालांत १९८४ मध्ये लंडनला मराठी सांस्कृतिक मंडळात, १९९२ ते १९९६ सौदी अरेबियांत असताना तेथील भारतीय सांस्कृतिक मंडळात मी कार्यक्रम दिला. १९९२ ते २००२ पर्यंत अब्दुल करीम खान यांच्या मिरजेच्या वार्षिक पुण्यतिथीला मी कार्यक्रम दिला आहे. २००४ साली न्यूजर्सीच्या स्वामी तादात्मनांनंदजीच्या आश्रमांत, २००८ साली केंडलपार्क न्यूजर्सी येथे श्री. पुरंदरे यांच्या निवासस्थानी, २००९ साली डॉ. विजया मूर्ती, मुंबई यांच्या घरी, २०१० साली राजहंस प्रतिष्ठान, गोरेगांव आणि 'कला अकाडमी- पंजीम-गोवा', अशा अनेक ठिकाणी माझे मैफलीचे कार्यक्रम झाले आहेत."

"शास्त्रीय संगीता बरोबर तुम्ही नाटकांतपण काम केलीत असं मी ऐकलंय !" मी.

"हो, मी भारतांत असताना १९८२ ते १९८७ पर्यंत संशय कल्लोळ आणि मानापमान या दोन नाटकांत नायकाच्या भूमिका केल्या होत्या."

"शास्त्रीय संगीत, नाट्यकला या शिवाय चित्रकलेतसुध्दां तुम्हाला रस होता असं म्हणतात ?" दादांनी प्रश्न विचारला.

"हो. मागे सांगितल्याप्रमाणे माझे वडील ब्रिटिशांच्या कालांत प्रसिध्द चित्रकार होते. मला वाटतं बहुधा कलेचा DNA वंशपरंपरागत असावा. चित्रकलेचे अंग मला वडिलांकडूनच आलं. लहानपणी फावल्या वेळांत कागदावर रेघोट्या काढण्याचा नाद होता. मग पक्षी, गाई, घोडा, गाढव अशी चित्रे रेघाटली. पुढे पुढे शाळेत गेल्यावर, शिवाजी, तानाजी, अफजुलखान वगैरे चित्रे इतिहासाच्या तासाला काढायचो. राणी अहिल्याबाई होळकरांच्या चित्राला मी एकदा मिशापण रंगवल्या होत्या. हा एक छंदच लागला होता. मोठा झाल्यानंतर मी कुंचल्याने, पोट्रेट काढायला लागलो. कॅलगरीमध्ये झालेल्या BMM अधिवेशनांत माझ्या पोट्रेटचे प्रदर्शन

भरविले होते. या पोट्रेटस् मध्ये अनेक नामवंत गायकांचे पोट्रेटस् आहेत. हे पोट्रेटस् माझ्या www.tinyurl.com/sujanrane या वेबसाईटवर पहायला मिळतील."

"सुजन, तुम्ही इंग्रजीचे एम.ए. असून कॉलेजमध्ये प्राध्यापक होण्या ऐवजी बँकिंगच क्षेत्रांत कसे गेलात ?" डॉ. ताम्हणे.

"मी १९५५ साली प्रथम नोकरीला लागलो हाँगकाँग बँकेत मुंबईला. तिथं लागल्यानंतर मला बँकिंगमध्ये खूप रस वाटायला लागला. मुख्यत: त्याकालांत शिक्षणक्षेत्रापेक्षा बँकिंग क्षेत्रात जास्त पैसे मिळत होते. साधा व्यवहार ! पुढे पुढे वरच्या जागा मिळत गेल्या. १९७८ साली मी ओमानला बँक ऑफ मस्कट येथे वरच्या हुद्याची नोकरी घेतली. तिथंसुध्दां चांगला पैसा मिळत होता. पुढे मी सौदीला गेलो. तिथं A.B.N.AMRO, Bank of Saudi Arabia या बँकेत गेलो. पैसा भरपूर मिळत होता."

"मग ते क्षेत्र कां सोडलंत ?" मी विचारलं.

"खरं सांगू भाई, माझं मन रमत नव्हतं. मनाची सारखी कुतरओढ चालली होती. त्याला तळमळत ठेऊन जगणं मला कष्टाचं वाटू लागलं. आणि १९९६ साली मी सौदीबँकेच्या नोकरीचा राजीनामा दिला आणि माझ्या कलेच्या क्षेत्राला संगीताला कायमचे वाहून घेण्याचा निर्णय घेतला."

"संगीत, चित्रकला आणि बदलीच्या नोकऱ्या हे सर्व व्याप सांभाळता सांभाळता लिखाणाला तुम्हाला कसा वेळ मिळत होता ?"

"लेखन माझा व्यवसाय नव्हता. पण मला लिखाणाची आवड निर्माण झाली ती इंग्रजी वाचनामुळे. मी कॉलेजमध्ये असताना टाईम्स ऑफ इंडिया, फ्रि प्रेस, नवभारत टाईम्स मध्ये निरनिराळ्या विषयांवर स्तंभलेखन करीत असे. त्या नंतर संगीतावर मी लिहायला लागलो.

१९८८ ते १९९२ पर्यंत प्रभू तरूण मासिकांत "शास्त्रोक्त संगीतातील घराणी" या शिर्षकाखाली मी लेखमाला प्रसिध्द केली. याच मासिकांत सन १९९४ मध्ये "कॅलिफोर्नियाचा गोल्डनगेट ब्रिज" आणि १९९६ मध्ये "अमेरिका..एक सांस्कृतिक ऱ्हास " हे लेख प्रसिध्द केले. तसेच सावली मासिकासाठी, "पं. फिरोज दस्तूर एक असामान्य गवई आणि गुरू", एकता मासिकासाठी "Gomantak Today" हा लेख लिहीला. मुंबईला असताना "सामना" पत्रकासाठी किरकोळ लिखाण केले. माझे "हिंदुस्थानी शास्त्रोक्त संगीत - परदेशीय भारतीयांसाठी" हे पुस्तक प्रकाशनाच्या वाटेवर आहे."

"सुजन, संगीताची, चित्रलेची आणि लेखनाची जी तुम्ही आतापर्यंत साधना

केली ती खरोखरी अभिमानास्पद आहे. यासंदर्भात तुमच्या आता पर्यंतच्या अनुभवावरून तुम्हाला आपल्या नवीन पिढीला काही सांगावसं वाटतं कां?"

"मला पुढच्या पिढीला एवढंच सांगावस वाटतं की कोणत्याही कलेच्या क्षेत्रांत असामान्य पातळी गाठायची असेल, तर तेवढ्याच पातळीचा त्याग करायची तयारी ठेवावी लागते. संसारात पडल्यावर कोणत्याही कलेची सेवा करण्यासाठी किती वेळ मिळेल हे सांगणे कठीण आहे. त्यामुळेच प्रत्येक कलाकाराला, आपल्या पदरांत किती यश पडेल, हा विचार वेळोवेळी त्रास देत असतो. त्याची ही व्यथा त्याला शेवटपर्यंत टोचत राहात असते. परंतु हीच 'व्यथा' त्याला यशाच्या शिखरावर नेऊन पोहचवते. "हा माझा मार्ग एकला" अशी कलावंताची स्थिती असते. जसे त्याला क्लेश भोगावे लागतात, अपमान सहन करावे लागतात, तसेच क्लेश आणि अपमान त्याच्या कुटुंबियांनाही सहन करावे लागतात."

"सुजन, एक प्रश्न विचारायचा राहून गेलाय. तुम्ही रिटायर झाल्यानंतर अमेरिकेत कसे पोचलात?" मी विचारलं.

"माझी मुलगी आणि जांवई आधी इथं येऊन न्यूजर्सीला स्थाईक झाले होते. आम्ही दोघं नवराबायको मुंबईला होतो. तिनं आम्हाला sponsor केलं १९९५ सालांत. आम्ही निघालो आणि थडकलो न्यूयॉर्कला."

"इकडं अमेरिकेत आल्यानंतर तुमच्या गाण्याच्या आणि चित्रकलेच्या छंदाला काही अडसर आला का?"

"नाही.. नाही तसं बिलकुल आम्हाला वाटत नाही. इथही आपली माणसं

आहेत. चांगला मोठा रसिकवर्ग आहे. कलावंताची, मराठी साहित्याची जाण असलेली बरीच माणसं मला भेटली आहेत. आपुलकी आणि ओलावा माणसाच्या ठिकाणी असला तर त्याचं जिणं जास्त सुखकर आणि समाधानी होतं. नाही कां?" सुजन बोलले.

"अगदी खरं बोललात तुम्ही सुजन. फार थोड्यांना आयुष्याचा असा अर्थ कळतो. जाऊ द्या. सुजन, आता जवळजवळ एक वाजायला आला. आपण असेच बोलत राहिलो तर पहाटसुध्दा होईल. मला वाटतं भाई, आपण आता झोपायला जाऊ या." दादा जांभई देत म्हणाले.

"हो फारच उशीर झाला की ! पण वेळ कसा निघून गेला ते कळलं सुध्दा नाही."

"या गप्पास्टकांच सर्व श्रेय सुजन राण्यांना आहे." डॉ. ताम्हणे बैठक संपल्याची सूचना देत होते.

"नाही नाही. बैठक संपली नाही." दादा पुढे सरकून म्हणाले. "ही बैठक

भैरवी ऐकल्याशिवाय कशी संपेल. सुजन एक छान भैरवी म्हणा पाहूं !" दादांनी आग्रह केला.

आणि पं. सुजन राण्यांनी भैरवी गायला सुरवात केली.....

" अगा वैकुंठीच्या राया..... अगा विठ्ठल सखया....
अगा नारायणा..अगा वासुदेव नंदना......"

शब्दांकन : दिवाकर कारखानीस ह्युस्टन
email : dkarkhan80@gmail.com

# भारतीय संगीताचा अंतरात्मा

**भा**रतीय संगीताचा उगम हजारो वर्षापूर्वी झाला, असं आपल्या ग्रंथात नमूद केलं गेलं आहे. किंबहुना त्याची सुरवात वेदांपासून झाली असं म्हणायला हरकत नाही. ऋग्वेदातील तीन सूर सामवेदाच्या सात सुरापर्यंत विकसित झाले होते. "सप्त सुरांतू गीयन्ते. सामभीःसामर्ग बुधै." अस मांदुकीय शिक्षा या प्राचीन ग्रंथात सापडते. ऋग्वेदातील तीन सुरांत सात सुरांचा अंतर्भाव केल्याचा आणखी पुरावा पाणिनीय शिक्षा ग्रंथात पुढील श्लोकात सापडतो.

"उदाते निषाद गान्धारौ । अनुदात्ते ऋषाद धैवतः।
स्वरीत प्रभ वहिते। षड्ज , मध्यम, पंचमः ।।"

या प्रमाणे उदात्त म्हणजे निषाद (नि) व गंधार (ग), अनुदात्त म्हणजे ऋषभ (रे) व धैवत (ध) आणि स्वरीत म्हणजे षड्ज (सा) मध्यम (म) व पंचम (प) या सात सुरांचा अंतर्भाव ऋग्वेदात अशा प्रकारे आढळतो. मातंग मुनीच्या बृद्रद्देशी नावाच्या ग्रंथात रागसंगीताबद्दल पहिला उल्लेख आढळतो आणि तो ग्रंथ इ.स. सहाव्या शतकात लिहिला गेला. त्याच्यानंतर जयदेव कवीच्या गीत गोविंद या लोकप्रिय काव्यात रागांची नावे आहेत, उदाहरणार्थ बिभास, बसंत, भैरव वगैरे. हे काव्य इ.स.च्या अकराव्या शतकात प्रसिद्धीस आले. परंतु, संगीताचा आधार ग्रंथ मानलेल्या भरताच्या नाट्यशास्त्रात रागासंबंधी काहीं उल्लेख सापडत नाही. त्यांत जातीगायन किंवा लोकसंगीत याबद्दल चांगली माहिती आहे व तो ग्रंथ पंधराशे वर्षापूर्वी लिहिला गेला आहे. प्राचीन काळी संगीतात वैदिक मंत्र, भक्तिगीते, लोकगीते गायली जात. ही भारतीय संगीताची ऐतिहासिक बाजू झाली पण ती हळूहळू मनोरंजक भरताच्या नाट्यशास्त्राच्या काळापासून झाली असावी असा अंदाज करावा लागेल. तेव्हां जशी पाश्चात्य संगीताची सुरवात त्यांच्या चर्च पासून झाली, तशी आपल्या संगीताची सुरवात मंदिरांपासून म्हणजे सामान्य लोकांपासून झाली असं म्हणायला हवं. एखादं गाऱ्हाणं गोड गाण्याच्या रुपात सादर केलं तर ते अधिक रुचते, ते सामान्य माणसाला वेड लावतेच पण ते देवापर्यंत पोहचते. देवळात कीर्तनकार जेव्हां देवाच्या मूर्तीपुढे हातात टाळ घेऊन गात व नाचत असतो, तेव्हां त्याच्या समोर बसलेले भक्त एवढे रंगून जातात कि जणूंकाय ते देवाशी एकरूप होतात. हळूहळू हे संगीत धर्माच्या चौकटीच्या बाहेर गेलं व संगीताच्या उपासकांनी त्याला नियमबद्ध करून त्यावर शास्त्राचा अंगरखा

चढवला. थोडक्यांत त्या मंदिरांतल्या संगीताचं रुपांतर पद्धतशीर संगीतात, म्हणजे शास्त्रीय संगीतात झालं, जिथे त्याला, सुरांनी, तालानी व लयीनी बांधलं गेलं. कालांतराने हे संगीत राजेरजवाड्यां पर्यंत व श्रीमंतांच्या घरापर्यंत पोहचलं, कारण त्यांच्या मनोरंजनासाठी व सामाजिक प्रतिष्ठेसाठी त्याचा उपयोग करण्यात आला. पण असं संगीत पद्धतशीर असणं साहजिक होतं. संगीताच्या जाणकारांनी त्या संगीताला प्रंसगानुसार नियमबद्ध केलं, म्हणजे प्रसंग जसा असेल त्याप्रमाणे त्यांत करुणरस, शृंगाररस व भक्तीरस यांचा उपयोग करण्यात आला, पण असं करताना त्या जाणकारांनी ते संगीत श्रोत्यांच्या हृदयापर्यंत पोहचते कि नाही याची जाणीव कायम ठेवली.

मोगलांच्या व राजपुतांच्या दरबारी भारतीय शास्त्रीय संगीताला मानाचे स्थान प्राप्त झालं, कारण गाणाऱ्यांना व नाचणाऱ्यांना राजाश्रय मिळाला. त्यांच्या मनोरंजनासाठी या संगीताचा अधिक उपयोग होऊ लागला. अशा परिस्थितीत एक गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे ती म्हणजे, नुसतं नियमबद्ध व मनोरंजनाचा अभाव असलेलं संगीत सादर करण्यात आलं असतं तर ते फार काळ टिकलं नसतं. राजांचं मनोरंजन करणं हा कलाकारांचा जणूंकाय धर्मच होता. म्हणूनच स्वामी हरिदास, तानसेन आणि बिलासखान सारखे गाणारे निर्माण झाले. या संदर्भात धृपद धमार या संगीत पद्धतीचा उल्लेख करणं उचित होईल, कारण ते शास्त्रोक्त असलं तरी ते मनोरंजक नक्कीच नव्हतं, त्या संगीतातला तोचतोपणा कंटाळवाणा होता आणि म्हणूनच ते संगीत लोप पावलं. विसाव्या शतकात डागर बंधू शिवाय इतर गाणाऱ्यांनी ते संगीत लोकांपर्यंत पोहचवल्याचं ऐकिवात नाही. याचे कारण त्या संगीतात माधुर्याचा भाग किती होता हे ज्यांनी ते ऐकलं त्यांनीच ठरवलेलं बरं. तेव्हां संगीतात हृदयाला भिडण्याची ताकद नसेल तर ते संगीत किती काळ टिकणार? धृपद धमार नष्ट होऊन त्याची जागा ख्याल गायकीने दोनशे वर्षापूर्वी घेतली. ही पद्धती केवळ तिच्या बौद्धिक पातळीमुळे श्रेष्ठ ठरली नाही, तर तिच्यात श्रोत्यांना त्यांच्या जागी खिळवून ठेवण्याची जबरदस्त ताकद आहे असं खचितच म्हणावं लागेल. कारण ख्याल ह्या शब्दाचा अर्थच मुळी 'विचार' असा असल्यामुळे गाणाऱ्यांना श्रोत्यांसमोर केवळ नियमबद्ध संगीत सादर करण्यात हाशील नाही, तर त्यांना विचार करून त्यांचं गाणं किती गोड व हृदयाला भिडण्या इतपत् करता येईल यांत त्यांचं खरं कौशल्य असतं.

गवयांच्या विचारानुसार हिंदुस्तानी शास्त्रीय संगीतात घराण्यांचा अंतर्भाव झाला. निरनिराळे गवई त्यांच्या विचारशक्ती प्रमाणे तेच राग पण स्वतःच्या पद्धतीप्रमाणे सादर करू लागले. ग्वालीअर, जयपूर, आग्रा व किराणा घराणी अस्तित्वात आली.

ग्वालीअर घराण्याचे गवई जर राग बिलावल (चीज-दैया कहां गये) गाण्याचं पसंत करतील तर, किराणा घराण्याच्या गवयांनां राग शुद्ध बिलावल (चीज-प्यारा नझर नाही आये) गायला आवडेल. इतर घराण्याचे गवयी राग भूप सादर करतील, तर किराणावाले शुद्ध कल्याण पेश करतील, दोन्ही रागांत सूर जवळजवळ सारखे आहेत पण शुद्ध कल्याणात निषाद आणि मध्यम याचा स्पर्श असा काहीं केला जातो कि तो श्रोत्यांच्या मनाची पकड सोडत नाही. म्हणूनच खांसाहेब अब्दुल करीम खान यांचा शुद्ध कल्याण (चीज- मौनदर बाजो रे बाजो) आणि त्यानंतर पं. भीमसेन जोशींचा शुद्ध कल्याण (तीच चीज) श्रोत्यांना अतिशय आवडतो. तसचं इतर घराण्याच्या गवयांना बिहाग किंवा बिहागडा आवडेल तर किराणावाले मारू बिहाग पेश करायला पसंत करतील. "रसिया हो न जा" ह्या पारंपारिक चीजेचा मुखडा असा काहीं निरनिराळ्या पद्धतीने ते आळवतात कि त्यातला करुणरस श्रोत्यांच्या मनाची पकड सोडत नाही. अब्दुल करीम खान, सुरेशबाबू माने, हिराबाई बडोदेकर, सरस्वतीबाई राणे, बडे गुलाम अली, पं. भीमसेन जोशी, फिरोज दस्तूर ही सर्व मंडळी नुसत्या शास्त्राला चिकटून बसली नाहीत, तर त्यांचं गाणं किती गोड व भावपूर्ण होईल असा त्यांचा सतत प्रयत्न असे. अब्दुल करीम खांसाहेब म्हणायचे "ताल गया तो बाल गया, लेकीन सूर गया तो सिर गया." त्यांच्या ध्वनिमुद्रिका "गोपाला मेरी करुणा क्यू नहीं आवे" (राग-सरपरदा), "पियाको मिलन कि आस" (राग-जोगिया), "पियाबिन नाही आवत चैन" (राग-झिंझोटी) ऐकल्यावर वाटते कि भारतीय संगीताच्या बुडाशी कारुण्य आणि माधुर्य हे ओतप्रोत भरलेलं आहे. त्यांच्या ध्वनिमुद्रिका आज ८० वर्षानंतर सुद्धा लोक अनेकवेळा ऐकत असतात.

आता आपण मराठी नाट्यसंगीताकडे वळलो तर बाल गंधर्व आणि छोटा गंधर्व

यांच्या गाण्यात जो लाडिकपण व गोडवा आढळतो तो इतर नाट्यसंगीत गाणाऱ्यांत किंवा हल्लीच्या नाट्यसंगीत गाणाऱ्यांत आढळत नाही. बाल गंधर्वांच पद "वद जाऊ कुणाला शरणा ग" ऐकताना हृदय पिळवटून निघते. तसच् छोटा गंधर्वांची पदं "प्रेम भावे जीव जगिया नटला" व "देहाता या शरणागता" (नाटक-मानापमान) "प्रिये पहा रात्रीचा समय" व "कोण तुझ सम सांग गुरुराया" (नाटक-सौभद्र) "दिलरुबा मधुर हा दिलाचा" (नाटक-देवमाणूस) अशी त्यांची अनेक पदं ऐकल्यावर वाटते की आपल्या गाण्यात ते असा काहीं गोडवा निर्माण करत की त्याला सीमा नव्हती. त्यांच्या ध्वनिमुद्रिका गेली ५० ते ६० वर्ष लोक अजून तेवढ्याच् आवडीने ऐकतात. याचं मुख्य कारण ते नुसतं शास्त्राला चिकटून बसले नाहीत, आपलं गाणं गोड कसं करावं इथे त्यांचा कायमचा मानस असायचा. बाल गंधर्व राग भीमपलास ऐकल्यावर भर नाट्यगृहानं उभं राहून त्यांना मानवंदना केली हा किस्सा पुस्तकात

लिहिला गेला आहे.

छोटा गंधर्वांच्या नंतरच्या काळातल्या नाटकात ती तीव्रता आढळत नाही, जरी काहीं संगीतकारांनी त्यांत सर्व सामान्यांना परिचित नसलेले राग घुसवण्याचा प्रयत्न केला तरी. सालगविराली, गावती व कलावती या रागांचा १०० ते १५० वर्षं रंगभूमीवर चालत आलेल्या शुद्ध सारंग, मुलतानी, भीमपलास, बागेश्री, मालकंस व दरबारी सारख्या रागांच्या बरोबर मुकाबला कसा होणार ?

१९३१ साली भारतीय चित्रपटसृष्टीच रुपांतर बोलपटांत झालं. त्या काळातले विशेष गाजलेले गायक होते कुंदनलाल सैगल. त्यांच्या आवाजात असा काही करुणरस (दर्द) होता की त्यांच्या गाण्यावर श्रोते बेहद्द खुश असून त्यांचे बोलपट आवडीने बघायचे, उदाहरणार्थ "देवदास". "चाह बरबाद करेगी हमे" (संगीत-नौशाद १९४५) "जब दिल ही तूट गया" (संगीत-मधोक १९४५) "बाबुल मोरा नैहर छुटो जाय"(संगीत-बोराल) या भैरवीने उच्चांक गाठला. ही गाणी ऐकल्यावर असं वाटते की ईश्वराने त्यांच्या गळ्यात करूण रसाचा असा भरणा केला होता की त्याची तुलना करणं अशक्य आहे. खुद्द अब्दुल करीम खान सारख्या श्रेष्ठ गवयांनी सैगलना त्यांची गाजलेली ठुमरी "पिया बिन आवत चैन" गाताना ऐकल्यावर त्यांना मानाचा मुजरा केला. त्यानंतर आले मोहम्मद रफी, त्यांच्या आवाजाची फेक व गाण्यातली तीव्रता या दोन गुणांमुळे त्यांच गाणं अत्यंत प्रभावी झालं. "सुहानी रात ढल चुकी" (चित्रपट-दुलारी, संगीत-नौशाद) "ओ दुनिया के रखवाले" (चित्रपट-बैजू बावरा, संगीत-नौशाद), "चौदविका चांद" (चित्रपट -चौहदविका चांद, संगीत रवी) "मेरे मेहबूब तुझे" (चित्रपट-मेरे मेहबूब, संगीत-नौशाद), बहारों फुल बरसावो" (चित्रपट-सुरज, संगीत-शंकर-जयकिशन). अनेक पार्श्वगायकांनी रफींची नक्कल करण्याचा प्रयत्न केला पण रफींच्या गाण्यातला घुमार व गोडवा त्यांना जमला का ? रफींचे समकालीन पार्श्वगायक तलत मेहमूद यांचा आवाज अतिशय मखमली व मधुर होता, इतका की सुरवातीला त्यांना अनेक संगीत दिग्दर्शकांनी पसंत केलं नाही; पण संगीत दिग्दर्शक अनिल बिश्वास यांनी तलतना "ऐ दिल मुझे ऐसी जगा ले चल" (चित्रपट-आरझू, संगीत-अनिल बिश्वास १९५०) या गाण्यापासून प्रसिद्धीस आणलं. त्यांची गाणी "सिनेमे सुलगते है अरमान" (चित्रपट-तराना, संगीत-अनिल बिश्वास) "मेरी यादमे तु ना आसू बहाना" (चित्रपट-मदहोश, संगीत-मदन मोहन), "शुक्रिया है प्यार तेरा" (चित्रपट-आराम, संगीत-अनिल बिश्वास), "मै दिल हूं एक अरमान भरा" (चित्रपट-अनहोनी, संगीत-रोशन). ही सर्व गाणी गेली ५० ते ६० वर्षं आपल्या कानावर सतत पडतात, तरी ती एकसारखी ऐकावीशी वाटतात, कारण त्यांच्यात एक प्रकारची अजब तन्मयता, तीव्रता, गोडवा आणि

माधुर्य आपल्याला सापडते. या काळातल्या दोन स्त्री पार्श्वगायिका नूर जहान आणि लता मंगेशकर यांनी भारतीय चित्रपट संगीतात अमोल भर घातली, त्या दोघींनी हिंदी गाण्यात आपल्या सुरेल आवाजांनी माधुर्याचा उच्चांक गाठला. अर्थात त्यांची गाणी अमर होण्यात नौशाद, गुलाम हैदर, गुलाम मोहमद, खेमचंद प्रकाश, अनिल बिश्वास यांच्या सारखे मात्तबर संगीत दिग्दर्शकांचा हात होता हे मान्य करावं लागेल. त्यांच्या गाण्यांची यादी एवढी लांब आहे की ती इथे देणं कठीण आहे.

भारतीय संगीताचा वरीलप्रमाणे आढावा घेण्यात मुख्य हेतू एवढाच की कारुण्य व माधुर्य हे दोन घटक या संगीताचे आधारस्तंभ आहेत. जर ह्या स्तंभाला धक्का दिला तर आपलं संगीत किती टिकेल हा विचार मनाला फार त्रास देतो. हल्लीचं संगीत म्हणजे गती आणि गोंगाट या दोन अवगुणांचा बाजार वाटतो. शास्त्रोक्त संगीतात जलद, ताना घेणं, जलद सितार, सारंगी व तबला वाजवणं हे प्राविण्याचं द्योतक समजलं जातं आणि ऐकणारे, समजो अगर न समजो, त्याला टाळ्या वाजवून प्रतिसाद देतात. अहमदजान तिरसवानचा तबला, विलायतखांची सितार व बिस्मिल्लाखांची सनई ऐकल्यावर या गोष्टींचा तुलनात्मक विचार करावा लागेल. चित्रपट संगीतात, दूरदर्शन संगीतात, तसाच मंचावरच्या संगीतात, संगीत किती मोठ्यानं किंवा जलद गतीनं सादर करता येईल याची जणुकाय शर्यत असते. ह्या सर्व खटाटोपात खऱ्याखुऱ्या संगीताचा भाग किती आहे याचा पुष्कळदा प्रश्न पडतो. कॉम्प्युटर टेक्नोलॉजी व इलेक्ट्रॉनिकच्या साधनामुळे लोकांपर्यंत असं संगीत किती लवकर पोहचवता येईल असा सतत प्रयत्न चालू असतो. त्याचं पाश्चात्य संगीतात मिश्रण (Fusion) करून लोकांना पचवायला लावायचं हा नवा प्रकार आहे. भारतीय संगीत हे मेलोडीवर आधारलेलं आहे तर पाश्चात्य संगीत हार्मनीवर आधारलेलं आहे, ह्या दोन वेगळ्या पद्धतीचा मेळ कानाला खरोखर सुखकर वाटतो का? जेव्हां कारुण्य व माधुर्य हे पूर्वीपासून चालत आलेले भारतीय संगीतातले मुख्य घटक दुय्यम मानू जाऊ लागतील तेव्हां हे संगीत नष्ट होण्याच्या मार्गावर जाईल कां अशी भीती वाटणं साहजिक आहे. परंतु ही भीती अवास्तव आहे असं वाटतं, कारण जोपर्यंत माणसाच्या कानावर ह्या दोन घटकांचे कर्णमधूर स्वर थांबत नाहीत तो पर्यंत हे संगीत अमर राहील.

पं. सुजन राणे
१४९ क्रांबरी नेक रोड,
क्रांबरी, न्यू जर्सी ०८५१२ - यु.एस.ए.
**email - sujanrane@yahoo.com.**

************

# प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा सहकारी : प्रमोद तेंडुलकर



**'सा**वली' मासिकाच्या सात वर्षाच्या कामांत माझा अनेक लेखकांशी जसा संबंध आला तसाच संबंध मराठीची जाण असणाऱ्या आणि अभिमान बाळगणाऱ्या लोकांशी आला. यांतील बरेच लोक माझ्यापेक्षा वयाने लहान होते पण स्वतःच्या क्षेत्रांत ते अग्रेसर होते. प्रकाश लोथे, शिरीष कीर्तने, सौ.ललीता गंडभीर ही माणसे डॉक्टरकीच्या व्यवसायांत अग्रेसर आहेत, तर अशोक सबनीस, श्रीनिवास माटे या सारखे आर्किटेक्चरच्या व्यवसायांत नाव कमावून आहेत. अशीच एक कॅलिफोर्नियांत रहाणारी व्यक्ती म्हणजे आमचे सहसंपादक, श्री. प्रमोद तेंडुलकर.

"मायबोलीचा विश्वसेतू" या पुस्तकासंबंधाने मी, सौ. मोनाली फाटक यांचेशी बोलणी करीत होतो. जेव्हां आमची पुस्तकाची रूपरेषा तयार झाली आणि आम्ही निरनिराळ्या लेखकांशी संपर्क साधू लागलो तेव्हां, आम्हाला पुस्तकाच्या संकलनाचे काम किती जिकीरीचे आणि वेळ काढणारे आहे याची कल्पना येऊ लागली. यावेळी मी प्रमोदला पुस्तकाच्या कामांत मदत करणार कां? म्हणून विचारले. त्यांना कामाची रूपरेषा सांगितली आणि प्रमोदनी लगेच आपला होकार कळविला.

पुस्तकाच्या संकलनांत ज्यावेळी एकापेक्षां जास्त व्यक्ती असतात त्यावेळी, सगळ्यांचं एकमत होणे जरा कठीण असते. व्यक्ती तशा प्रकृती या म्हणी प्रमाणे मतांमतांमध्ये फरक पडतो. असं असून सुद्धां जे इप्सीत (goal) असते, ते साध्य करण्यासाठी सर्वांना एकजुटीने काम करणे आवश्यक असते. तसेच दुसऱ्याचे म्हणणे ऐकून घेणे आवश्यक असते. दुसऱ्यांच्या मतालाही काही किंमत असते हे मान्य करणे स्वाभाविक असते. यातूनच नवीन विचार, नव्या कल्पना निर्माण होत असतात. तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे तुम्ही इतरांबरोबर सहकार्याने काम करू शकता कां? (Team Player) अथवा तुम्हाला स्वतःला एकट्याने काम करणे आवडते?

वरील तीन प्रमुख उद्देशांनुसार विचार करताना मला प्रमोदची निवड स्वागतार्ह वाटली. प्रमोदला मराठी वाङमयाची आवड आहे... नव्हे जाज्वल्य अभिमान आहे.

इंग्रजी भाषेबद्दल जरी आकस नसला तरी इंग्रजीमुळे मराठीची कशी गळचेपी होऊ शकते याचा प्रत्यय अमेरिकेतच नव्हे तर, भारतांतही येत आहे. याचेच वैषम्य त्यांना सदैव वाटतं.

सहकाऱ्यामध्ये आणखी काही गुण असावे लागतात. तुम्ही विश्वासाला पात्र आहांत कां? आणि तुमच्यावर टाकलेली जबाबदारी तुम्ही पार करणार याची खात्री तुमच्याबरोबर काम करणाऱ्यांना आहे कां? अथवा 'हम करेसो कायदा' या उक्ती प्रमाणे किंवा 'हा माझा मार्ग वेगळा' म्हणून 'एकांडेपणाने' जाण्याचा मार्ग तुम्हाला जास्त पसंत आहे?

प्रमोद तेंडुलकर मध्यम वयांत, भारतांतून सहकुटुंब अमेरिकेत आले. त्यावेळी स्थलांतरीत होणाऱ्यांचे एकच उद्दीष्ट होते. जास्तीत जास्त शिक्षण मुलांना देणे आणि आपण भोगत असलेल्य धकाधकीच्या आयुष्यांपेक्षा आपल्या मुलाबाळांचे आयुष्य जास्त सुखाचे व्हावे असाच मूळ हेतू असतो. प्रमोद त्याला अपवाद नव्हते. त्यामुळे हा गृहस्थ सोशिक तर होताच पण त्याचबरोबर विचारी पण होता. अनुभवांचे क्षेत्र विस्तारीत होते. दुसऱ्यांना बरोबर घेऊन काम करण्याची पात्रता त्यांनी मिळविली होती. त्यांची काम करण्याची पद्धत नेकीची होती व अत्यंत विश्वासाने आणि प्रांजळपणे वागण्याची त्यांची पद्धत मला जास्त भावली.

प्रमोदचे वाचन सखोल आहे. मराठी लेखकांत त्यांचे आवडते लेखक फडके, खांडेकर, शिवाजी सावंत, इंद्रायणी सावकार, सुमती क्षेत्रमाडे इत्यादी होत. या लेखकांच्या निरनिराळ्या शैली त्यांना भावतात.

त्यांनी एकता, इंडिया वेस्ट, ई सकाळ, ई महाराष्ट्र टाइम्स मध्ये काही संकीर्ण लिखाण व पत्रलेखन प्रसिद्ध केले आहे. परंतु लेखक म्हणून मिरविण्याची त्यांची मनापासून इच्छा नाही.

असा हा आमचा साधासुधा, विश्वासू सहकारी. त्यांचा दुर्दम्य आशावाद, उत्साह आणि उदंड प्रोत्साहन यामुळेच आम्ही हे काम तडीस नेले आहे. त्यांच्या सहकार्यामुळेच आज अमेरिकेत आणि कॅनडांत स्थायिक झालेले काही लेखक आम्ही प्रकाशांत आणू शकलो.

अशा या माझ्या सोबत्याला आणि सहकाऱ्याला हा माझा मानाचा मुजरा..!

शब्दांकन : दिवाकर कारखानीस ह्युस्टन
email : dkarkhan80@gmail.com

## लेखकांना विचारलेले काही प्रश्न

१. मला तुमच्या लहानपणाचं काही सांगाल कां? तुमचं लहानपण कुठं गेलं, कसं गेलं, खेळगडी कोण कोण होते आणि काही आठवणी सांगू शकाल कां?

२. वयांत आल्या नंतर कसली स्वप्ने पाहिलीत आणि कोणती स्वप्ने जपलीत?

३. आयुष्याबद्दलची समज केव्हां यायला लागली? (When did you start getting perception of Life?)

४. आयुष्याची खरी जाण केव्हां यायला लागली? (When did you feel the reality of life?)

५. तुमच्या लिखाणाचा मूलभूत हेतू ... उद्देश काय?

६. तुमच्या लिखाणापासून तुम्हाला कोणता संदेश द्यायचा आहे?

७. मनोरंजन - स्वतःचे कां इतरांचे? तत्त्वचिंतन : प्रचार, साधना, सामजिक जागृती अथवा समाजसुधारणा?

८. बदलत्या जगाबद्दल आपले मत काय? पिढ्यांपिढ्या मध्ये होणारा बदल आयुष्याला चांगले वळण लावतो कां?

९. तुमच्या आणि तुमच्या मुलांच्या संस्कृतीमधे फरक पडला आहे कां? आणि झाला असला तर तो कोणता?

१०. वडिलधाऱ्या मंडळीबद्दल असलेल्या मानापमानाच्या कल्पना आणि त्यांत झालेली स्थित्यंतरे समाजाला पोषक आहेत कां?

११. इंटरनेट, कॉम्प्युटरगेमस् या सुविधांचा मुलांच्या जीवनावर होणारा परिणाम इष्ट की अनिष्ट? या सुविधांचा अतिरेक आणि दुरूपयोग होऊ शकतो कां? होत असल्यास त्यांतून काही मार्ग काढता येईल कां?

१२. जग जवळ आलंय पण माणूस मात्र लांब गेलाय असं तुम्हाला वाटतं कां?

१३. जग जरी बदलत असलं तरी मूळांत माणूस बदलला आहे कां?

१४. अमेरिकेत, कॅनडात येण्याचं कसं ठरवलंत?

१५. तुमचे व्यवसायाचे क्षेत्र कोणते?

१६. मराठी साहित्याची आवड कशी, कुणामुळे आणि केव्हां लागली?

१७. लिखाणाचे कोणते व कां क्षेत्र निवडले?

१८. अमेरिकेत, कॅनडांत राहिल्यामुळे मराठी लिखाणाचे विषय वेगळे झाले कां?

१९. तुमचे आवडते लेखक कोणते व कां ?

२०. लिखाणा व्यतिरिक्त दुसरे छंद कोणते ?

२१. लिखाणामुळे व्यावसायिक जीवनात अथवा सांसारिक जीवनांत व्यत्यय आला कां ?

२२. जीवनांतील यशापयशाचा तुमच्या लिखाणावर परिणाम झाला कां ?

२३. कुटुंबात बाप आणि नवरा किंवा आई आणि बायको म्हणून भूमिका पार पाडायच्या असतात. या भूमिका पार पाडताना लिखाणावर काही परिणाम झाला कां ?

२४. स्त्रीमुक्ती चळवळीबद्दल आपले मत काय ? आजची स्त्री कोणत्या क्षेत्रांत स्वतंत्र झाली आहे आणि कोणत्या क्षेत्रांत अद्याप बंदिवासांत आहे असं तुम्हाला वाटतं ?

२५. वरील अर्थाने अमेरिकन स्त्री आणि भारतीय स्त्री यांतील फरक काय ?

२६. समलिंगी स्त्री-पुरुषांनी एकत्र रहाणे योग्य आहे कां ? समाजावर त्याचे कसे परिणाम होतात ?

२७. समलिंगी विवाहाला कायद्याने मान्यता मिळायला हवी कां ?

२८. मराठी लिखाणामुळे आपलं मन मायदेशाकडे ओढ घेतं असं तुम्हाला वाटतं कां ?

२९. लिखाणांत आशयापेक्षा भाषेला दुय्यम स्थान आहे असं तुम्हाला वाटतं कां ?

३०. आपल्या लिखाणांत सत्य, शिव आणि सौंदर्य यांत महत्त्वाचे कोण असावे असं आपणास वाटते ?

३१. दुसरी आणि तिसरी पिढी : येथे वाढणाऱ्या तुमच्या नंतरच्या पिढीमधील मुलांसाठी धर्म, संस्कृती, भाषा, साहित्य, रीतीरिवाज, सण यांची माहिती करवून देण्यासाठी तुम्ही सातत्याने काही प्रयत्न केले आहेत कां ? केले असल्यास कोणते ?

३२. मिश्र विवाहाबद्दल आपले मत काय ? येथे रहणाऱ्या कुटुंबात आंतरदेशीय आणि आंतरवर्णीय विवाह सर्रास होत रहाणार आहेत. अशा लग्नसंबंधामुळे जन्मणाऱ्या संततीवर कोणते आणि कुणी संस्कार करायला हवेत ?

************

भाग १

# मायबोलीचा विश्वसेतू

गेली चाळीस वर्षे उत्तरअमेरिका आणि कॅनडा येथील मराठी लोकांनी ‘मराठी’ तील ‘म’ देखील न जाणणाऱ्या लोकांमध्ये वास्तव्य केले आहे. त्यांच्या उपजीविकेचे विश्वही वेगवेगळे आहे; कोणी डॉक्टर, इंजिनिअर, अकाऊंटंट, प्रोफेसर तर कोणी सामाजिक कार्यात गुंतले आहेत. पण तरीदेखील त्यातल्या या सर्व व्यक्तींनी आपले मन मात्र मराठी भाषेतच मोकळे केले आहे.

ज्या काळात संगणक (Computers) नव्हते, सेल फोन्स नव्हते, अहो, जेव्हा मराठीत टाईप देखील करणे शक्य नव्हते तेव्हापासून त्यांनी ‘हस्तलिखित’ मासिके काढली. अनेक हौशी लेखकांना एकत्र आणून मराठी भाषेत पुस्तके छापली. इथे परदेशात आलेले अनुभव मराठी लोकांपर्यंत पोहोचवले. त्यात बरंच काही मिळवल्याचा अभिमान आहे, बऱ्याचदा आलेलं वैफल्य आहे, अडचणींवर केलेली मात आहे, आपले ‘मराठी’पण जपण्याची धडपड आहे. आपले विचार, आपली संस्कृती पुढच्या पिढ्यांपर्यंत पोहोचवण्याची तळमळ आहे. कधी ते न जमल्याची खंतही आहे. कधी हे लेखन स्वांत:सुखाय आहे तर कधी आपल्या लोकांना संदेश देणारंही आहे. बऱ्याचदा हे अनुभव अगदी खाजगी आहेत पण खूपदा ते सर्वांना ‘आपलेच’ वाटणारे ही आहेत.

हे लेखन केले गेले आहे ते केवळ ‘मायबोली’ च्या जवळिकीतूनच ! त्यात ना पैशाची आस आहे ना स्वत:चे नाव होण्याचा ध्यास ! हे आहे एक ‘हितगुज’ ! मराठी मनाने ... मराठी मनाशी केलेले !

महाराष्ट्राबाहेर ३०-४० वर्षे राहून देखील या लेखकांनी जी मायबोलीची सेवा केली आहे त्याचे संकलन आम्ही या पुस्तकात केले आहे. त्यांनी केलेली ही धडपड आपणा सर्वांपर्यंत पोहोचवण्याचा हा एक प्रांजळ प्रयत्न आहे आणि त्याचबरोबर आमची कृतज्ञताही व्यक्त करायची आहे... अमेरिकेच्या स्वातंत्र्यदेवतेच्या पायापासून सुरवात करुन ज्ञानेश्वरांच्या महाराष्ट्रापर्यंत उभारलेल्या या ‘मायबोलीच्या विश्वसेतू’ बद्दल या सर्वच लेखकांचे अनेक अनेक आभार मानायचे आहेत.

दादा, मोनाली आणि प्रमोद



अमोल पब्लिशिंग हाऊस, पुणे
ISBN 978-81-920124-4-5